


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'तपशील' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (द्वैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे प्रकाशक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादकमंडळातील सदस्य ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी तसेच संपादक-मंडळ ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'तपशील' ह्या नियतकालिकाच्या (द्वैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि तपशील संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका



संपादक :
डॉ. मीना वैशंपायन
डॉ. मंगला सरदेशपांडे
डॉ. आनंद जोशी
श्री. नाना जोशी

रचना :
हेमचंद्र कराडकर

मुद्रण व्यवस्था :
पुष्पम प्रिंटर्स
भायखळा, मुंबई – २७.
☎ ३७२ ७३००

मालक, मुद्रक, प्रकाशक
आणि पत्रव्यवहार
**श्री. नाना जोशी**
४-अ, सोमणनगर,
क्रांतिवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई ४०० ०१२.

अंक दुसरा, वर्ष पहिले

# अनुक्रमणिका



**'तपशील'चा तपशील :**
★ सुट्या अंकाची किंमत रुपये १००/–
★ (६ अंकाची) वार्षिक वर्गणी रुपये २०१/–
★ प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १२० ते १२५
★ वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात दुसऱ्या अंकाला वर्गणी पाठवली तरी पहिल्या अंकापासूनच अंक देण्यात येतील.





# संपादकीय

रसिक वाचकहो,

'तपशील'चा हा दुसरा अंक आज आम्ही आपल्याहाती ठेवत आहोत. भारताबाहेरील साहित्यसंबंधित, नवनवीन, मनोरंजक माहिती देण्याचा प्रयत्न याही अंकात आम्ही केला आहे.

मानवी समाजाला, ज्ञानग्रहण आणि ज्ञानरक्षण यासाठी अपरिहार्य आणि उपयुक्त असणारी गोष्ट म्हणजे भाषा! मनातील भावभावनांचे, विचारांचे प्रकटीकरण करून, परस्परांशी संवाद साधण्यासाठी महत्त्वपूर्ण असणारी ही भाषा बऱ्याचदा निष्काळजीपणे वापरली जाते. भाषेचे अपार सामर्थ्य ओळखून तिचा वापर, जतन व वृद्धी कशी करावी यासंबंधी अनेक विद्वानांनी आपली मते व्यक्त केलेली आहेत. नोबेल पारितोषिकविजेत्या, कृष्णवर्णीय अमेरिकन लेखिका टोनी मॉरिसन यांनी भाषेसंबंधीचे आपले विचार एका रूपकाद्वारे मांडले आहेत. नोबेल पारितोषिक वितरणसोहळ्यात होणारी पारितोषिकविजेत्यांची भाषणे ही त्यांच्या चिंतन-मननाचा प्रकट आविष्कार असतात आणि म्हणून महत्त्वपूर्ण ठरतात. पण सहसा ती आपल्यापर्यंत पोचत नाहीत. त्यामुळे या अंकात टोनी मॉरिसनने नोबेल पारितोषिक वितरणसोहळ्यात केलेल्या भाषणाचा श्रीमती प्रतिमा टिळू यांनी केलेला मुक्त अनुवाद दिला आहे. तो वाचकास आवडेल याची खात्री आहे.

सत्ताधाऱ्यांनाही गदागदा हलविण्याचे सामर्थ्य प्रतिभावंताच्या विचारात व लेखकांच्या लेखणीत असते. हा नियम अविकसित राष्ट्रे, हुकूमशाही राष्ट्रे व लोकशाही अस्तित्वात नसलेल्या राष्ट्रांना खास करून लागू पडतो. सत्ताधाऱ्यांचा अन्याय जगापुढे मांडण्याचे काम करणाऱ्या केन-सारो-विवा या प्रख्यात नायजेरीयन लेखकावर खटला करून त्यांना फाशी देण्यात आले. त्यांना फाशी देणे हा एक प्रकारचा राजकीय खूनच होता. त्या संबंधात त्यांचे स्नेही प्रख्यात इंग्रजी लेखक विल्यम बॉईड यांनी लिहिलेला 'एका लेखकाचा मृत्यू' हा लेख देण्यात आला आहे.

कोणतीही जिवंत प्रवाही भाषा आपोआपच संकरित होते. या संकराबद्दल नाके मुरडून अनेक भाषाभिमानी तिच्या शुद्धीकरणाचा आग्रह धरतात, चळवळी उभारतात. 'मराठी वाचवा' प्रमाणे 'फ्रेंच 'वाचवा' अशी हाकाटी फ्रान्समध्ये चालू आहे. त्याविषयी माहिती देणारे टिपण या अंकात आहे. एखाद्या भाषेला 'राज्य भाषा', 'राष्ट्रभाषा' हा दर्जा कसा प्राप्त होतो, अनेक बोलीभाषांमधून प्रमाणभाषा कशी होते, यासंबंधी एक टिपण आहे. वरवर यशस्वी भासणाऱ्या इंग्रजी भाषेचे भवितव्य काय याबद्दल ऊहापोह आणखी एका टिपणात आहे.

'असा हा लेखनछंद' या लेखमालेत कुकसन या प्रख्यात कादंबरी लेखिकेचे अनुभव वाचावयास मिळतील. प्रमोएद्या या इंडोनेशियन लेखकाचा परिचय व 'डोस्टोएव्हस्कीचा कारावास' या लेखाचा दुसरा भाग, 'दोन लेखक' या सदरात वाचावयास मिळेल. प्रमोएद्या यांना मॅगसेसे पारितोषक मिळाल्यानंतर इंडोनेशियन लेखकांच्या व विचारवंतांच्या प्रतीक्रिया 'नोंदवहीत' आढळतील.

पहिल्या अंकाचे स्वागत वृत्तपत्रांनी केले, तसेच रसिक वाचकांनीही केले. त्याबद्दल आम्ही कृतज्ञ आहोत. हे द्वैमासिक आपणा सर्वांचे आहे. त्यामुळे अंकाबाबतचे आपले अभिप्राय व सूचना यांचे स्वागतच होईल. जाहिरातींचा विक्षेप वाचनानंदात येऊ नये आणि अधिकाधिक मजकूर प्रत्येक अंकात देता यावा म्हणून जाहिरातींची मदत न घेण्याचे आमचे धोरण आहे. अर्थात त्यामुळे आपण आपल्या परिवारातील मंडळींनाही वर्गणीदार करून घ्यावे अशी विनंती!

'तपशील'च्या वाचकास व वर्गणीदारास १९९६ साल सुखाचे व भरभराटीचे जावो.

कळावे लोभ असावा.

जानेवारी १९९६ — संपादक



# भाषा आणि साहित्य

## भाषेचे विविध पैलू

प्रतिभा टिल्लू

*(नोबेल पारितोषिक स्वीकारताना श्रीमती टोनी मॉरिसन यांनी केलेल्या भाषणाचा मुक्त अनुवाद)*

कोणे एके काळी एक वृद्धा होती. आंधळी पण शहाणी. का तो एक वृद्ध होता? कदाचित गुरूही असेल. की चळवळ्या मुलांची समजूत काढणारा होता? ही किंवा हुवेहूब अशीच कथा मी ऐकलेली आहे. अनेक संस्कृतींच्या परंपरातून ती आलेली आहे.

कोणे एके काळी एक वृद्धा होती. आंधळी, शहाणी. मला ठाऊक असलेल्या कथेत शहराच्या बाहेर एका लहानशा घरात ती एकटीच राहात असे. ती होती गुलामकन्या, कृष्णवर्णीय अमेरिकन! तिच्या बिनतोड वादातीत शहाणपणाबद्दल तिचा लौकिक होता. समाजनियम म्हणजे काय हे तिला माहीत होते व त्या समाजनियमांपलीकडे काय असते ह्याची तिला जाण होती. तिला जो मान दिला जात असे, तिच्याकडे ज्या भीतियुक्त आदराने पाहिले जात असे त्याची कीर्ती ती राहात होती त्या समूहाच्या पलीकडे अगदी पार दूरवर शहरापर्यंत पोचली होती. अर्थात शहरात ग्रामीण भविष्यवेत्त्यांचा शहाणपणा ही बऱ्याच करमणुकीची गंगोत्री असते.

एके दिवशी काही तरुण मंडळी तिला भेटायला आली. तिची अलौकिक अंतर्दृष्टी ही एक लबाडी व ठकबाजी आहे या आपल्या समजुतीवर भरवसा ठेवून ते ढोंग उघड करून दाखविण्याच्या निश्चयाने ती मंडळी आलेली होती. यासाठी त्यांची योजना सोपी व साधी होती. तिच्या घरात ते शिरणार आणि तिला एकच प्रश्न विचारणार. या प्रश्नाच्या उत्तरासाठी तिच्यात आणि त्यांच्यात जो फरक होता त्यावरच ते भिस्त ठेवून होते. तिचे अंधत्व त्यांच्या दृष्टीने अगदी हुकुमी परिणाम करणारे व्यंग होते. तिच्या उत्तराविषयी त्यांना कुतूहल होते. तिच्यासमोर उभा राहून त्यांच्यापैकी एकजण म्हणाला, 'अग म्हातारे, माझ्या हातात एक पक्षी आहे, तो जिवंत की मृत तेवढेच सांग.' तिने तोंडच उघडले नाही. प्रश्न पुन्हा एकदा विचारण्यात आला. "माझ्या हाती असलेला पक्षी जिवंत की मृत?"

तरीही ती मूकच राहिली. आंधळेपणामुळे तिला भेटायला येणारे पाहुणे तिला दिसत नव्हते किंवा त्यांच्यापाशी असलेल्या वस्तूही दिसत नव्हत्या. त्या तरुण

मंडळींचा वर्ण कोणता, लिंग कोणते अगर मातृभूमी कोणती ह्याविषयी काहीही तिला ठाऊक नव्हते. पण तिला त्यांचा अंतस्थ हेतू फक्त दिसत होता.

तिचा निःशब्दपणा इतका काळ टिकला की त्या तरुणांना हसू आवरणे मुश्कील झाले.

सरतेशेवटी मृदू पण अधिकारवाणीने ती म्हणाली, "जो पक्षी तुमच्या हातात आहे तो जिवंत की मृत हे मला ठाऊक नाही, पण मला हे मात्र नक्की ठाऊक आहे की जे तुमच्या हातात आहे, ते तुमच्याच हाती आहे.

तिच्या उत्तराचा अर्थ असाही करता येईल की तो मेलेला असेल तर एकतर तो तुम्हाला मेलेलाच मिळाला असेल किंवा तुम्ही त्याला मारले असेल. जर तो जिवंत असेल तर तुम्हाला अजूनही त्याला मारता येईल. त्याने जिवंत राहावे की नाही हा तुमचा निर्णय आहे. ते काहीही असो, ती तुमची जबाबदारी आहे.

त्या तरुणांनी स्वतःच्या शक्तीचे केलेले प्रदर्शन व तिच्यां असहायतेचे इतरांना घडविलेले दर्शन ह्याबद्दल त्यांची कानउघाडणी झाली. त्यांना असे सांगण्यात आले की त्यांनी जे विदूषकी स्वरूपाचे कृत्य केले त्याची जबाबदारी त्यांच्यावर आहे. त्याचबरोबर आपले हे ईप्सित साध्य करण्यासाठी एका छोटया जिवाचा बळी दिल्याबद्दलही ते जबाबदार आहेत, हेही त्यांना सुनावण्यात आले. मनुष्यमात्रांजवळ शक्ती म्हणजे सत्ता असते. ती सत्ता तो प्रस्थापित करतो. त्या आंधळ्या म्हातारीने आपले लक्ष हळुवारपणे या सत्तेच्या प्रस्थापनेकडून त्यासाठी उपयोगात आणल्या जाणाऱ्या साधनाकडे वळविले आहे.

त्या पक्षाचे शरीर अत्यंत कृश आहे ही गोष्ट वगळता तो हातातला पक्षी कशाचे प्रतीक असेल, तो नेमके काय सुचवीत असेल, ह्याचे मला नेहमीच कुतूहल वाटत आले आहे. ज्या माझ्या कार्यामुळे मी आज ह्या सन्माननीय मंचावर येऊन बसले आहे त्या कार्याचा जेव्हा मी विचार करते तेव्हा तर माझे कुतूहल अधिकच वाढते. असो. आपण आता मुख्य विषयाकडे वळू. आपण त्या पक्षाला भाषा मानू या. आणि अंध, शहाण्या वृद्धेला कसलेली, निष्णात आणि प्रथितयश लेखिका मानू या. जी भाषा तिला जन्मतःच मिळालेली आहे, ज्या भाषेत तिला स्वप्ने पडतात, त्या भाषेचा वापर करण्यावर, ती उपयोगात आणण्यावर, वेळप्रसंगी निश्चितपणे कुविख्यात ठरतील अशा कृती या भाषेच्या साहाय्याने करण्यावर तिला बंदी येते. या सर्व गोष्टींसंबंधी ती चिंताग्रस्त आहे, अस्वस्थ आहे. लेखिका असल्यामुळे तिच्या दृष्टीने भाषा ही काही प्रमाणात एक व्यवस्था आहे. काही प्रमाणात जिच्यावर आपले नियंत्रण आहे अशी सजीव वस्तू आहे, परंतु ज्याचे परिणाम बहुतांशाने होणारच असे एक साधन, अशी एक कृती आहे. म्हणूनच मुलांनी विचारलेला प्रश्न तो जिवंत आहे की मृत? हा अवास्तव नाही. कारण मृत्यूला, नाशाला चटकन बळी पडू शकणाऱ्या, निश्चितपणे धोकादायक परिस्थितीत असलेल्या ह्या भाषेचे अस्तित्व सहज पुसून जाईल ह्याची तिला खात्री आहे. मात्र तिला वाचवायचेच असेल तर जबरदस्त इच्छाशक्तीने आटोकाट प्रयत्न करावे

लागतील. तरुणांच्या हातातील हा पक्षी जर मेलेला असेल तर त्या पक्ष्याच्या राखणदारावरच त्या पक्षाच्या मृतदेहाची जबाबदारी आहे. तिच्या मते लिहिण्या-बोलण्यातून वजा झालेली भाषा म्हणजे काही मृत भाषा नव्हे. अर्धांगवायूमुळे नाकर्त्या झालेल्या शरीराचे कौतुक करण्यात समाधान मानणारी भाषा हीच खरी मृतभाषा आहे. ही अर्धांगवायूपीडित भाषा एखाद्या मध्यवर्ती सत्तेच्या भाषेसारखी स्वतःची तपासणी करून घेते व दुसऱ्याची तपासणी करते. ही भाषा मग कोरडी होते. आपल्या कोतवाली कर्तव्यात अत्यंत कठोर असा दृष्टिकोन बाळगणारी ही भाषा आपल्या धुंद करणाऱ्या आत्मरतीला रान मोकळे करून देते. त्याखेरीज तिला उद्दिष्ट नाही. आपण कोणीतरी खास आहोत म्हणून आपल्या प्रभुत्वाच्या कल्पनेत रमण्यापलीकडे त्या भाषेला काही हेतूही नाही, इच्छाही नाही. तथापि मरणाच्या दारी असली तरी ती परिणाम करीत नाही असे नाही. उलट बुद्धी भ्रष्ट करण्यासाठी, जाणिवा बोथट करण्यासाठी, मानवी सुप्त शक्तींची पायमल्ली करण्यासाठी ती अधिकाधिक प्रयत्नशील असते. तिला प्रश्न आवडत नाहीत. नव्या कल्पना सुचत नाहीत. सुचल्यास स्वीकाराव्याशा वाटत नाहीत. तिला नव्या कल्पनांना घाट देता येत नाही, त्यांच्याकडे सहानुभूतीने पाहून त्या खपवून घेता येत नाहीत. वेगळे प्रतिपादन करता येत नाही. चक्रावून टाकणारी शांतता भरूनही काढता येत नाही. सरकारी भाषेने अज्ञानाला शिष्टसंमत करण्यासाठी हलकल्लोळ केला. खास हक्क टिकवून धरण्यासाठी जणू ते चिलखतच होते. ते चिलखत इतके चकचकीत करण्यात आले की ते पाहून धक्काच बसावा. पण ह्या चिलखताच्या आवरणातून, एखाद्या टरफलातून अर्थरूपी सरदार केव्हाच निघून गेलेला असतो. तरीही भाषा तिथे आहेच – मुकी, बुभुक्षित आणि हळवी देखील. शाळकरी मुलांना आदरणीय वाटणारी, हुकूमशहांना पदराखाली घेणारी, स्थैर्याच्या खोट्या आठवणींना उजाळा देणारी. जनतेत एकोपा व सुसंवाद ह्यांच्या खोट्या आठवणी जागवणारी.

निष्काळजीपणामुळे, बेदरकारपणामुळे, उपयोगात न आणल्यामुळे, आत्मसन्मानाची जाणीव नसल्यामुळे, दुर्लक्ष केल्याकारणाने किंवा हुकुमावरून मुस्कटदाबी केल्यामुळे जर भाषा मृत झाली, तर केवळ तीच नव्हे तर त्या भाषेचा उपयोग करणारे व ती घडविणारे सारेच तिच्या नाशाला कारणीभूत आहेत ह्याची तिला खात्री पटली आहे. तिच्या देशातील मुलांनी आपल्या जीभेचे चावून तुकडे केले आहेत. वास्तविक भाषेचा वापर वाचाहीनांना वाचा फुटावी म्हणून आणि माणसाच्या मनांना अपंग बनविणाऱ्या भाषेला पुन्हा आवाज फुटावा म्हणून करायला हवा. त्या ऐवजी ते बंदुकीच्या गोळ्या वापरतात. अर्थनिष्पत्तीसाठी मार्गदर्शक म्हणून किंवा प्रेमाच्या अभिव्यक्तीचा एक मार्ग म्हणून ह्या भाषेचा उपयोग करणे प्रौढांनी केव्हाच सोडून दिले आहे. परंतु वाचेची आत्महत्या ही त्या मुलांनीच निवडलेली गोष्ट आहे असे नाही हेही तिला ठाऊक आहे. अनेक शासनप्रमुखांची आणि सत्तेच्या दलालांची डोकी पोरकट असणे हे त्यांचे एक व्यवच्छेदक लक्षण आहे. ह्या सर्वांची भाषा ही अर्थहीन भाषा असते त्यामुळे उपजत मानवी प्रवृत्तीतील जो भाग शिल्लक राहिलेला असतो त्याच्याजवळ पोचण्याचा त्यांचा मार्गच बंद होतो.

याचे कारण ते आपल्या हुजऱ्यांशीच बोलतात आणि आज्ञापालन लादण्यासाठी बोलतात.

भाषेची चाललेली पद्धतशीर लूटमार आपल्यालाही ओळखता येते, ती भाषेचा वापर करणाऱ्यांच्या प्रवृत्तीवरून. सूक्ष्म अर्थछटा दाखवणे व मनातील भावभावना लोकांपर्यंत सुईणीच्या कौशल्याने पोहोचवणे हे भाषेचे गुणधर्म! या महत्त्वाच्या गुणधर्मांचा त्याग करून भयनिर्मिती व सत्तेसाठी भाषा वापरणे ह्या त्या प्रवृत्ती होत. ह्या प्रवृत्तींवरून भाषेची लूटमार लक्षात येते.

दडपशाही करणारी भाषा ही हिंसेपेक्षाही अधिक कशाचे तरी प्रतिनिधित्व करते. ती भाषा म्हणजे हिंसाच आहे. ज्ञानाच्या मर्यादांचे प्रतिनिधित्व करण्यापेक्षा ती भाषा अधिक काहीतरी करते. ती ज्ञानावरच बंधने घालते. मुद्दाम लपाछपी करणारी, गोंधळ जवळ करणारी, सरकारी भाषा असो अथवा मुर्दाड संपर्क-माध्यमांची विचूक विधाने करणारी भाषा असो, विद्यापीठे किंवा अत्युच्च स्तरावरचे शिक्षण देणाऱ्या संस्थांमधून वापरली जाणारी, शीलावस्था प्राप्त झालेली पण दुराभिमानी भाषा असो, मागणी तसा पुरवठा या पद्धतीने तयार झालेली विज्ञानाची वस्तू-प्रामाण्यवादी भाषा असो, नैतिकतेची चाड नसलेली बदनामीकारक अशी कायद्याची भाषा असो, अल्पसंख्यांक अलग पडावेत, मूळ समाजापासून दुरावले जावेत ह्यासाठी योजनापूर्वक तयार केलेली भाषा असो, आपली वांशिकस्वरूपाची लूटमार मुलायम साहित्याच्या आवरणाखाली झाकून ठेवणारी भाषा असो, या सर्वप्रकारच्या भाषेचा त्याग केलाच पाहिजे. तिच्यात सुधारणा केल्या पाहिजेत. तिचे स्वरूप उघडकीस आणले पाहिजे. ही भाषा रक्तपिपासू आहे, स्वतःच्या त्रुटींचाही मोठ्या प्रेमाने स्वीकार करते, आपल्या देशभक्तीच्या आणि प्रतिष्ठेच्या कडक स्टार्चच्या झग्याखाली आपले तानाशाही बूट झाकून टाकते. ही भाषा हा प्रवास अथकपणे शेवटपर्यंत रित्या मनांच्या दिशेने करीत असते. लिंगवर्चस्व, वंशवर्चस्व, ईश्वरनिष्ठ या तशा प्रतीकात्मक भाषा आहेत. म्हणजेच प्रभुत्व गाजवणाऱ्या सर्व कोतवाली भाषांचे त्या प्रतिनिधित्व करतात. म्हणूनच त्या नवीन ज्ञान किंवा कल्पनांची देवघेव करण्याला परवानगी देत नाहीत.

भाडोत्री बुद्धिमंत, वखवखलेला हुकूमशहा, कोणाच्याही चाकरीत नसलेला चळवळ्या राजकारणी, भाषणबाजीने आपल्याकडे आकृष्ट करून घेणारा नेता, तकलुपी बनावट पत्रकार, ह्यातल्या एकाही व्यक्तीचे आपल्या विचारांच्या प्रभावामुळे परिवर्तन होणार नाही; त्या वृद्धेला ह्या सर्व गोष्टींची तीव्रतेने जाणीव होत होती. लोकांना चेव आणणारी भाषा सध्याही आहे आणि पुढेही असेल. नागरिकांनी शस्त्रे धारण करावीत, पुढेही ते धोरण चालू ठेवावे, बाजारपेठेत, न्यायालये व त्यांच्या परिसरात, टपाल कचेऱ्यात, मैदानी खेळाच्या जागेत, शयनगृहात आणि महामार्गावरदेखील मारा आणि मरा अशा प्रकारची भाषा वापरावी. या सर्व गोष्टींकरिता आम जनतेच्या भावनांचे उद्दीपन व्हावे ह्या उद्देशाने भाषेचा वापर होतो. गदगदा हलविणाऱ्या, स्मारके निर्माण करणाऱ्या भाषेच्या साहाय्याने, फुकाफुकी

जे मृत्यू पावलेले असतात त्यांच्या मृत्यूची व्यर्थता पटवून त्यातील आर्द्रतेवरही पडदा टाकण्यात येतो. बलात्कार, छळ आणि हत्या या सर्वांना प्रोत्साहन देणारी अधिक दरवारी व फसवी भाषा असेलच आणि भविष्यातही असेल. स्त्रियांचा गळा दाबणारी भाषा, पाटे हा खास रुचकर पदार्थ ज्या बदकांच्या यकृतापासून तयार होतो, त्या बदकांच्या गळ्यांप्रमाणे स्त्रियांचे गळे आवळून तयार झालेली भाषा, अधिक धुंदी आणणारी व परिवर्तनीय भाषा जी आता आहे व पुढेही असेल, ह्या भाषेत न उच्चारण्यासारख्या शद्बांची, कायदा व संकेत यांचा भंग करून त्या पलीकडे जाणाऱ्या शद्बांची लयलूट आहे. या अशा प्रकारची मूळ भाषेला अवनत अशी भाषा. ही भाषा अधिक फुसलावी असते. ती अधिक फुसलावी होणार आहे. दुसऱ्यावर पाळत ठेवणे हा हेतू असला तरी संशोधनाचे सोंग घेणारी भाषा. लाखो लोकांच्या हालअपेष्टांना वाचा फुटू नये अशा हिशेबाने राजकारण आणि इतिहास यांचे आवरण घेणारी भाषा, असंतुष्टांना रोमांचकारी अनुभव यावा यासाठी झगमगाट धारण करणारी भाषा, या अशा प्रकारच्या भाषा दिवसेंदिवस अधिक असतील. आपल्या शेजाऱ्यावर हल्ला करून लुटालूट करणारी, उर्मट प्रतिभावंतांना नैराश्य आणि न्यूनगंड यांच्या पिंजऱ्यात कोंडण्याच्या हेतूने तयार झालेली खोट्या अनुभवजन्य ज्ञानाची भाषा जास्त उपलब्ध असेल.

या सर्व वाक्पांडित्याच्या मागे, झगमगाटामागे, विद्वज्जनांच्या सहकार्यामागे, मग ते कितीही हेलावणारे वा हवेहवेसे वाटणारे असो, या अशा भाषेचे हृदय कदाचित ते थांबलेले/मृत झालेले असेल – जर अगोदरच तो पक्षी मृत झालेला असेल तर!

कोणत्याही ज्ञानशाखेचा बौद्धिक इतिहास कसा असण्याची शक्यता आहे यासंबंधी त्या म्हातारीने विचार केला होता. अर्थात त्यावद्दल आग्रह धरला गेला नसता तर किंवा त्यावर सक्ती करण्यात आली नसती तरच विचार करता आला असता. प्रभुत्व, जुलूम–जबरदस्ती यांना प्रतिनिधित्व देणे आणि हे प्रभुत्वच कसे योग्य आहे हे पटविण्यासाठी तर्कशास्त्र तयार करणे ह्या दोन्ही गोष्टी वेळेचा व जीवनाचा अपव्यय करणाऱ्या आहेत, त्यासंबंधीही तिने विचार केला होता. जो कोणी एखाद्याला वगळू पाहातो आणि जो कोणी वगळला जातो या दोहोंबद्दल जाणीव व ज्ञान होणे ह्यासाठी जे मार्ग उपलब्ध असतात, ते रोखून धरणे आणि त्यावर कडी म्हणजे त्यावर जीवघेणी ठरतील अशी प्रवचने देणे, हे सारे प्रभुत्व प्रस्थापित करण्याच्या प्रयत्नांमध्ये अनुस्यूत आहे, याचाही विचार तिने केला होता.

बायबलमध्ये टॉवर ऑफ बबेलची गोष्ट आहे. स्वर्गात जाण्यासाठी बांधायला घेतलेला हा मनोरा जेहोवामुळे अपुरा राहिला. मात्र त्याचेसंबंधी बोध असा सांगितला जातो की मनोरा पडणे हे दुर्दैव होते. खरे म्हणजे त्या मनोऱ्याचे स्थापत्य फसलेलेच होते. विचलित चित्तामुळे ही दुर्दैवी घटना घडली असावी अथवा भाषांच्या भाराखाली तो इमला कोसळला असावा. या दोन्ही कारणांमुळे अथवा त्यातल्या एखाद्यामुळे मनोऱ्याची इतिश्री होण्याचा क्षण जवळ आला होता एवढेच!

एकच सलग आणि अखंड भाषा अस्तित्वात असती तर मनोरा पूर्ण झाला असता, मनोऱ्याची उभारणी झटकन होण्यास मदत झाली असती, स्वर्गप्राप्तीचे ध्येय पुरे झाले असते. कोणाचा बरे स्वर्ग? कशा प्रकारचा? त्याचे तिला कुतूहल होते. जोपर्यंत दुसऱ्याची भाषा, विचार, म्हणणे, दृष्टिकोन आपण समजून घेत नाही तोपर्यंत स्वर्गाला हात लावू पाहाणे जरा घाईचेच वाटते. तसे त्यांनी केले असते तर ज्या स्वर्गाची त्यांनी कल्पना केली होती तो त्यांच्या पायाशीच आहे असे त्यांना आढळले असते. गुंतागुंतीचा, सतत मागण्या करणारा पण 'याची देही याचि डोळा' दिसणारा स्वर्ग इथे असेल, मृत्यूनंतरचा नव्हे!

तिच्या तरुण मित्रांना असेही वाटू नये की केवळ अस्तित्वासाठीच भाषेवर जिवंत राहाण्याची सक्ती करावी. असा समज करून घेऊन आपल्या तरुण मित्रांनी आपली रजा घ्यावी अशी तिची इच्छा नव्हती. भाषेच्या जिवंतपणाचे लक्षण म्हणजे वास्तवतेचे चित्रण, कल्पनारम्यतेचे चित्रण आणि तिच्या वक्त्यांची, वाचकांची आणि लेखकांची शक्य तेवढी वास्तव आणि कल्पनारम्य जीवनचित्रे रेखाटणे. काही वेळा तिचा डौल अनुभवाला खो देत असला तरी तो अनुभवाची जागा घेऊ शकत नाही. अर्थ ज्या ठिकाणी असण्याची शक्यता आहे, त्या ठिकाणी भाषा झेप घेते. जेव्हा अमेरिकेच्या राष्ट्राध्यक्षांना वाटते की त्यांचा देश स्मशानवत झाला आहे, तेव्हा ते म्हणतात 'त्या ठिकाणी आम्ही काय बोललो हे जगाच्या लक्षात राहाणार नाही व त्याची नोंदही कदाचित होणार नाही. आम्ही काय केले हे मात्र ते कदापीही विसरणार नाहीत.' त्यांचे साधे शब्द उल्हसित करणारे होते. विशेषतः त्यांच्या जीवनदायी प्रेरक गुणांमुळे! सामाजिक व राजकीय उलथापालथ करणाऱ्या वांशिक युद्धात सहा लक्ष लोक मारले गेले या वास्तवावर ते आवरण घालण्यास नकार देतात हे तिच्या उल्हसितपणाचे कारण होते. स्मारक करायचे नाकारतात. अखेरचा शब्द उच्चारण्याविषयी तुच्छता दाखवतात. नेमका समारोप करतात. या शब्दांच्याकडे बेरीजवजावाकी करण्याची ताकद तोकडी आहे हे ते कबूल करतात. ज्या जीवनाबद्दल ते शोक व्यक्त करीत होते ते जीवन शब्दात पकडण्याची असमर्थता ते व्यक्त करतात. त्या सगळ्या आख्यानातल्या आदराच्या भावनेने ती हेलावून गेली. भाषा चिरकाल टिकू शकेलच असे नाही हे ही तिला उमगले. भाषेने तसले काही करूच नये. गुलामगिरी, वांशिक हत्या करण्यासाठी झालेल्या युद्धांचे नेमकेपणाने वर्णन करणे, अथवा एकदा नव्हे तर केव्हाही भाषेला जीवनाचे मोजमाप घेणे शक्य नाही हेही त्या म्हातारीने जाणले. आपणास हे काम करणे शक्य होईल अशा प्रकारच्या उर्मटपणापाठीमागे भाषेने धावणे हेही उचित नाही. जे उच्चारता येत नाही, जे शब्दात पकडता न येण्याइतके मोठे आहे, त्याच्याजवळ जाऊन पोहोचण्यातच भाषेची ताकद आहे, तो तिचा मनस्वी आनंद आहे.

भाषा संपन्न असो की विपन्न असो, गुहेत दडून राहाणारी असो की स्फोटक ज्वालाग्राही असो, पावित्र्य मानण्यास नकार देणारी असो, मोकळं ढाकळं हसणारी असो, जादा मुळाक्षरेही नाहीत अशा आवाजात मूक रुदन करणारी असो,

पारखून घेतलेला शद्व असो की नीरक्षीर न्यायाने पत्करलेले मौन असो, अवलात्कारित भाषा ज्ञानाकडेच धाव घेते, तिच्या विनाशाकडे नव्हे. पण प्रश्न विचारल्यावद्दल बंदी आलेले साहित्य, टीकात्मक असल्यामुळे अपकीर्त झालेले साहित्य, विशिष्ट बदल घडवून आणण्याचा आग्रह धरल्यामुळे नाहीसे केलेले साहित्य कुणाला ठाऊक नाही? आपण स्वतःच ओरबाडलेल्या, लूटमार केलेल्या भाषेसंबंधीच्या विचाराने किती लोक क्रुद्ध होतात?

निर्मितीक्षम असल्यामुळे शद्वशक्ती ही परतत्वाजवळ पोहोचणारी आहे, अतर्क्य आहे असे त्या वृद्ध स्त्रीला वाटते. दुसऱ्या कोणत्याही प्राणीजगतातील जीवापेक्षा आपल्यामध्ये असणारे मानवी वैविध्य सुरक्षित करून भाषा त्याला अर्थ प्राप्त करून देते.

आम्ही मर्त्य आहोत. तो कदाचित जीवनाचा अर्थ असेलही. पण आम्ही भाषा निर्माण करतो, घडवतो, तिचे संवर्धन करतो हा आमच्या जीवनाचा मापदंड आहे.

कोणे एके काळी पाहुण्यांनी एका वृद्धेला प्रश्न विचारला. कोण होती ती मुले? ह्या आदान-प्रदानाचा त्यांना काय लाभ झाला? 'पक्षी तुमच्या हातात आहे,' ह्या शद्वात त्यांना काय सापडले? भेटीची सूचना देणारे की ठामपणे दरवाजा बंद करणारे ते वाक्य आहे? कदाचित मुलांना ऐकू आले असेल की 'ही माझी समस्या नाही. मी वृद्ध आहे, स्त्री आहे, कृष्णवर्णीय आहे, आंधळी आहे. माझी तुम्हाला मदत होणार नाही, हे जाणण्यातच शहाणपणा आहे. भाषेचे भवितव्य अखेर तुमच्याच हाती आहे.'

ते तिथे तसेच उभे राहिले. समजा त्यांच्या हाती काहीच नसले तर? ती भेट म्हणजे त्या स्त्रीला बोलते करण्यासाठी केलेली लबाडी नव्हती ना? समजा, आपण आजवर जे काही बोललो ते कोणी फारसे गंभीरपणे घेत नव्हते, ते आता घ्यावे यासाठी वापरलेला मार्ग नव्हता ना? ज्येष्ठ लोकांच्या जगात चाललेल्या गोष्टींना अटकाव करणे, ते ढवळून काढणे यासाठी ते संधीचा उपयोग करीत होते का? त्यांच्यासाठी असणारे पण जे त्यांना कधीही ऐकवले जाणार नाही याची त्यांना खात्री होती ते त्यांच्यावद्दलचे निरूपण – एखाद्या संसर्गजन्य रोगासारखे असणारे – ते ऐकावे म्हणून ते ती संधी घेत होते का? निकडीच्या प्रश्नांची बाजी लागलेली आहे, ज्यात त्यांनी विचारलेला प्रश्नही अंतर्भूत आहे. आपल्या हातात जो पक्षी आहे तो जिवंत आहे की मेलेला आहे? कदाचित ह्या प्रश्नाचा अर्थ असाही असेल की आम्हाला कुणी जीवन म्हणजे काय, मृत्यू म्हणजे काय हे सांगेल का? प्रश्न लबाडीचा नाही, मूर्खपणाचाही नाही. फक्त एक सरळसोट प्रश्न की जो शहाण्यांनी विचारात घेण्याच्या लायकीचा आहे. जुनाच प्रश्न. ज्यांनी आयुष्य भोगले आहे, मृत्यूशी सामना केला आहे अशी शहाणी आणि वृद्ध मंडळी जर त्याचे वर्णन करायला असमर्थ असतील तर मग ह्याचे स्पष्टीकरण मागावे तरी कुणाकडे?



अनुक्रमणिका

पण ती उत्तर देत नाही, ती आपले रहस्य स्वतःजवळच ठेवते. तिचे स्वतःबद्दलचे चांगले मत, भूगर्भातील छोट्या देवता जसे आदेश देतात त्याप्रकारचे तिचे आदेश, बांधिलकी नसलेली तिची कला, या सर्वांबद्दल ती मौन बाळगून बसते. ती अंतर राखून राहाते. ती त्याबद्दल आग्रही आहे, सक्तीही करते. एकाकीपणात जे एकमेवत्व असते त्याचा आसरा ती घेते. अगदी तरल व खास हक्काचा असा जो तिचा पैस आहे त्यात आसरा घेते.

परिवर्तनासंबंधी तिच्या घोषणांच्या पाठोपाठ कोणताही शद्ब येत नाही, काहीच येत नाही. ते मौन अगदी खोलवर पोचणारे! तिने जे शद्ब उच्चारले होते त्या शद्बात गर्भित असलेल्या अर्थापेक्षाही अधिक खोलवर पोचणारे! हे मौन गारठले आहे. तिच्या त्या अलिप्त थंडपणामुळे ती मुले गारठून गेल्यासारखी त्रासली आणि त्यांनी तिथल्या तिथेच जसे सुचेल त्या भाषेत बोलून ते मौन भरून काढायचा प्रयत्न केला.

त्यांनी तिला विचारले, "तुला आम्हाला काहीच सांगता येत नाही का? तुझ्या अपयशाची जी पूर्वपीठिका आहे ती भेदण्यासाठी मदत व्हावी म्हणून आम्हाला सांगण्याजोगा तुझ्याकडे एकही शद्ब नाही? जे शिक्षण तुम्ही आम्हाला आता दिले आहे, देत आहात, ते शिक्षणच नव्हे असे आम्हाला वाटते कारण तुमची उक्ती आणि कृती ह्याकडे आमचे पूर्ण लक्ष आहे. तुमचे औदार्य आणि शहाणपणा यामध्ये तुम्ही जे काटेरी कुंपण उभारले आहे त्याबद्दलही आम्ही चांगलेच जागरूक आहोत.

आमच्या हातात जीवित किंवा मृत असा कोणताच पक्षी नाही. उलट समोर तू आहेस आणि आम्ही उपस्थित केलेले महत्त्वाचे प्रश्न आहेत. जे आमच्या हातात नाही त्यासंबंधी नुसता विचारही तू करू शकत नाहीस का? अंदाजही नाही करता येत? तुझ्या तारुण्यातली निरर्थक भाषा तुला आठवत नाही का? त्यावेळेला तू बोलत होतीस त्याला अर्थ होता का तेही तुला आठवत नाही का? तारुण्यावस्थेत अदृश्य गोष्टी दिसाव्यात म्हणून कल्पनाशक्ती अधिकच आटापिटा करीत होती. प्रश्न आणि त्यांच्या उत्तरांची मागणी जेव्हा प्रखरपणे धगधगत होती, तेव्हा तू स्वतः अज्ञानी होतीस आणि अज्ञानामुळे जळफळत होतीस.

तुझ्यासारख्या रणरागिण्या आणि योद्धे जी लढाई अंगावर घेऊन लढले व पराजित झाले; तियपासूनच आम्ही आमच्या जाणून घेण्याच्या प्रक्रियेला सुरुवात करणे आवश्यकच आहे का? ही लढाई करून तुम्ही आम्हाला कसला वारसा दिलात? तुम्ही त्या ठिकाणी जे काही आहे त्याचीच कल्पना केलीत. त्या व्यतिरिक्त तुम्ही आमच्याकडे काहीही सुपूर्द करून गेला नाहीत. तुझे उत्तर हुषारीचे आहे खरे, पण ती हुषारी आम्हाला पेचात टाकते आणि तिने तुम्हालाही पेचात टाकायला हवे. आत्मगौरव असल्यामुळे ते उत्तर अनुचित आहे. दूरचित्रवाणीसाठी लिहिलेला तो एक चटपटीत लेख होईल. पण आम्हाला त्यामुळे काही प्राप्त होणार नसेल तर त्याला अर्थ तरी काय?

तू आमच्यापर्यंत पोहोचून तुझ्या कोमल हाताने आम्हाला स्पर्श करून का पाहिलं नाहीस? आम्ही कोण होतो हे समजेपर्यंत तरी स्वतःच्या शब्दांचे बोचकारे काढणे किंवा आम्हाला धडे देणे का थांबवले नाहीस? तुला आमच्या चलाखीची, कार्यपद्धतीची इतकी घृणा आहे की आम्ही तुझे लक्ष आमच्याकडे वेधून घेण्याबाबतीत किती गोंधळलेले आहोत हे तुला दिसलेच नाही. मान्य आहे आम्ही तरुण आहोत, अपरिपक्व आहोत; एवढ्याशा आयुष्यात सुद्धा आम्ही जबाबदारीने वागायला पाहिजे हे सारखेच ऐकत आलो आहोत. एकतर हे जग एक महाभयानक संकट बनले आहे, अशा जगात त्याचा अर्थ काय असणे शक्य आहे? एक कवी म्हणाला तसे, या जगात "सगळेच उघडेनागडे असल्याने कशाचेही वस्त्रहरण करण्याची जरूरीच नाही." आमचा वारसा हा उघडउघड एक अपमान आहे. तुझी अशी इच्छा आहे का की तुझे थकलेले, निस्तेज, थिजलेले डोळे आम्हाला प्राप्त व्हावेत – आम्ही तुझ्या दृष्टीने बघावे. अशी दृष्टी एकदा प्राप्त झाल्यानंतर फक्त क्रौर्य आणि अगदी सामान्य गोष्टी पाहाव्यात हेच तुझ्या मनात आहे का? राष्ट्रीयत्वाच्या कल्पित कथेने भारून जाऊन, पुन्हा पुन्हा खोट्या शपथा घेण्याइतके आम्ही मूर्ख आहोत असे तुला वाटते का? तुझ्या भूतकाळाच्या कर्दमात आम्ही गळ्यापर्यंत बुडलेले असताना कर्तव्याच्या गोष्टी आम्हाला सांगण्याचे धैर्य तुला होते तरी कसे?

तू आम्हाला आणि आमच्या हातात नसलेल्या पक्षाला अगदीच क्षुल्लक करून टाकलेस. आमच्या आयुष्याला काहीच संदर्भ नाही का? तुझ्यापाशी एखादे गाणे, एखादी साहित्यकृती, एखादी जोशपूर्ण कविता, एखादा अनुभवाधिष्ठित इतिहास नाही का, की जो वारसा तू आमच्याकडे सुपूर्द करशील आणि त्याच्या मदतीने आम्ही घट्ट, मजबूत, ताकदवान बनून आयुष्याला सुरुवात करू? तू प्रौढ आहेस, बुजुर्ग आणि ज्ञानीही आहेस. स्वतःचीच प्रतिमा सांभाळणे आता पुरे झाले की! आता जरा आमच्या आयुष्याचा विचार कर. ज्या जगाशी तू परिचित आहेस त्या वैशिष्ट्यपूर्ण जगताबद्दल आम्हाला काही सांग. एखादे कथानक रच, कथानक हे जहालच असते. ते ज्याक्षणी निर्माण होत असते त्याचक्षणी आमचीही निर्मिती होत असते. तुझी ग्रहणशक्ती कमी पडली तर आम्ही तुला दोष देणार नाही. प्रेमाच्या भावनेने तुझे शब्द पेटून उठले आणि त्या प्रेमाच्या ज्वाळातच भस्मसात झाले; अगदी चिमटीभर राख उरण्यापुरतेच, तरीही आम्ही तुला दोषी धरणार नाही. शल्यविशारद आपले ज्ञान व भावना मुळीच व्यक्त न करता जियून भळभळ रक्त वाहू शकेल ती जखमेची दोन टोके शांतपणे शिवतो. तुझे शब्द त्या शल्य-विशारदाचेच काम करतील. ते काम तुला एकदम नीट जमणार नाही हेही आम्ही जाणून आहोत. या कामासाठी नुसता भावनोद्रेक पुरत नाही किंवा हस्तकौशल्यही पुरत नाही. परंतु तू प्रयत्न तर कर. तू तुझे मीपण विसरून जा आमच्यासाठी, आणि हो, तुझ्यासाठी सुद्धा! आता सांग की जग तुझ्याशी उघडपणे व लपून छपून कसे वागले? कशावर श्रद्धा ठेवावी आणि कशाला घाबरावे हे तर तू सांगूच नकोस. विश्वासाच्या रुंद झग्याची ती शिवण दाखव. ती भीतीचे आवरण उघडे करील. हे वृद्ध स्त्रिये, अंधत्वाचे तुला वरदान आहे. चित्राशिवाय (दृष्याशिवाय)

कसे पाहायचे हे आम्हाला सांगणारी भाषा तुला बोलता येते. ज्यांना नावगाव नाही अशा वस्तूंच्या भीतीपासून केवळ भाषाच आमचे संरक्षण करील. भाषा हीच केवळ चिंतन आहे.

स्त्री असणे म्हणजे काय हे तू आम्हाला सांग म्हणजे पुरुष असणे म्हणजे काय ते कदाचित आम्हाला समजून घेता येईल. या दोघांच्या सीमांवर कशाची हालचाल होते? या जागेवर स्वतःचे घरच नसणे म्हणजे नेमके काय? तुला जे घर ठाऊक होते त्यापासून दूर जायचे म्हणजे नेमके काय? ज्या शहराला तुमची संगतही नको आहे, त्या शहराच्या सीमेवर, काठावर राहाणे म्हणजे नेमके काय?

शेतातील नाळेसंबंधी तू आम्हाला सांग. इस्टरच्यावेळी समुद्रकिनाऱ्यावरून परतविलेल्या जहाजासंबंधी तू आम्हाला सांग.

गुलामांनी भरलेल्या वाघिणींबद्दल तू आम्हाला सांग. हिमवृष्टीसारखा ज्यांचा श्वासोच्छ्वास मंद आहे ते गुलाम इतक्या खालच्या आवाजात कसे गात होते, याबद्दल आम्हाला सांग. येणारा थांबा हा आपला शेवटचा थांबा आहे हे आपल्या शेजाऱ्याच्या खांद्याला आलेल्या बाकावरून त्यांनी कसे जाणले असावे?

ते एका खाणावळीशी थांबले. अंधारातच गुणगुणत असणाऱ्या त्या गुलामांना बाहेर ठेवून ड्रायव्हर आणि त्याचा सहकारी आत गेले. घोडे लीद टाकतात त्यामुळे त्यांच्या टापांखालच्या बर्फामधून वाफा येतात, तिचा हिऽस्स असा आवाज आणि बर्फाचे वितळणे याबद्दल त्या गारठलेल्या गुलामांना असूया वाटते.

खणावळीचा दरवाजा उघडला. एक मुलगा व एक मुलगी आतून बाहेर आले. ते गाडीत चढले. मुलाला तीन वर्षात बंदूक मिळेल. आता मात्र त्याच्या हातात दिवा आणि सायडरचा मग आहे. प्रत्येकजण पाळीपाळीने ते सायडर पितो. ती मुलगी ब्रेड आणि मांसाचे तुकडे या बरोबर अधिक काही देऊ पाहाते – ती ज्यांना वाढीत असते त्यांच्या डोळ्यात पाहाते. प्रत्येक पुरुषाला एकदा वाढप, प्रत्येक स्त्रीला दोनदा वाढप आणि एक दृष्टिक्षेप! ते मागे पाहातात. येणारा थांबा हा त्यांचा अखेरचा थांबा – पण हा नाही. हा थांबा उबदार होता.

मुले बोलायची थांबली तेव्हा पुन्हा एकदा शांतता पसरली. त्या शांततेचा भंग त्या स्त्रीने करीपर्यंत शांतता टिकली. ती म्हणाली –

"सरतेशेवटी आता मी तुमच्यावर विश्वास ठेवते. तुमच्या हातात जो पक्षी नाही, तो पक्षी तुमच्या हातात देण्यावर माझा विश्वास आहे. कारण, आता तुम्ही तो खरोखरच पकडला आहात. पाहा, तुम्ही आणि मी मिळून जी गोष्ट केली ती किती सुरेख आहे.

*स्टॉक होम*
*८ डिसेंबर १९९३*

# प्रासंगिक लेख

## एका लेखकाचा मृत्यू

### विल्यम बॉईड

केन सारो विवा हा माझा मित्र होता. १० नोव्हेंबर १९९५ रोजी सकाळी साडेअकरा वाजता पूर्व नायजेरियातील पोर्ट हारकोर्ट येथील तुरुंगात त्याला फाशी देण्यात आले. त्याला फाशी देण्याचा हुकूम नायजेरियातील सेनाधिकारी 'सानी आबाचा' (Sani Abacha) यांनी दिला होता. केन सारो विवा हा चौप्पन्न वर्षांचा होता व तो निरपराधी होता.

केंब्रिज विद्यापीठात ब्रिटिश कौन्सिलने एक परिसंवाद आयोजित केला होता. त्या ठिकाणी १९८६ च्या उन्हाळयात केन मला प्रथम भेटला. तो नायजेरियातून इंग्लंडला एक प्रकाशक म्हणून आला होता. त्याने ब्रिटिश कौन्सिलला त्याची व माझी भेट घडवून आणण्यासाठी विनंती केली होती. त्याने माझी पहिली कादंबरी 'ए गुड मॅन इन आफ्रिका' (आफ्रिकेत एक चांगला माणूस) ही वाचलेली होती. त्या कादंबरीतली सर्वच नावे कपोलकल्पित होती. त्या कादंबरीतल्या घटना कोठच्या आफ्रिकन देशात घडल्या हेही मी लपविण्याचा प्रयत्न केला होता. हे सारे होते तरी ती नायजेरियन पार्श्वभूमी घेऊन रचलेली कादंबरी आहे हे त्याने झटकन ओळखले होते. ती कादंबरी नायजेरियन पार्श्वभूमीवरचीच होती; कारण वयाच्या तेराव्या वर्षापासून तो पंचवीस वर्षापर्यंतच्या काळात नायजेरिया हा देश हेच माझे घर होते.

पश्चिम नायजेरियातील युनिव्हर्सिटी ऑफ इबादानमध्ये केन एक विद्यार्थी होता तो १९६५ च्या सुमारास! माझे वडील कै. डॉ. अॅलेक्झांडर बॉइड हे त्या विद्यापीठातील आरोग्यसेवांचे प्रमुख होते. त्यांनी केनवर औषधोपचार केले होते. त्यांचा व केनचा चांगला परिचय होता. माझ्या कादंबरीत डॉ. मरे (Murray) नावाचे एक पात्र आहे. ते डॉ. बॉईड यांचे शब्द-चित्र आहे, हे केनने ओळखले होते. म्हणूनच डॉ. बॉईडच्या चिरंजीवास भेटण्याची उत्सुकता व कुतूहल त्याच्या मनी असावे.

मला आठवतेय, आमच्या भेटीचा तो पहिला दिवस! उन्हाळ्यातील, बिन-ढगाचा सूर्यप्रकाशी दिवस होता तो! असा तो दिवस की इंग्लंडलाही तो खरोखरच ऊष्मा असलेला दिवस वाटावा. केन आणि मी, आम्ही दोघे कोट न घालता, केंब्रिजमधल्या एका कॉलेजच्या अत्यंत प्रसन्न व देखण्या चौकातून रमत-गमत चाललो होतो. बोलायला विषय होता नायजेरिया. केन हा तसा बुटकाच. उंचीला

फारतर पाच फूट दोन किंवा तीन इंच. त्यापेक्षा अधिक उंची नक्कीच नाही. तसा तो सगिन गडी. कधीही थकवा येणार नाही, दमछाक होणार नाही अशा ताकदीचा.... त्याची ताकद खरे म्हणजे सर्व शरीरातून ओसंडून जाते आहे असे वाटे. त्याचे हास्यही चांगले मोठे-लांब-रुंद; बाक असलेल्या टोकाचा पाईप तो ओढत होता. मला मागाहून समजले की पाईप ही त्याची खूण मुद्रा होती. नायजेरियातले लोक त्याच्या 'त्या पाईपवरून' त्याला ओळखत. केन-खटल्याचे जे फार्सवजा नाटक चालू होते, त्या खटल्याच्या अखेरच्या दिवसात नायजेरियन सेनाधिकाऱ्यांनी काही वार्तापट प्रसिद्ध केले होते. त्यात एक दृष्य, केन न्यायालयाच्या इमारतीकडे चालत जातो असे आहे. चालताना तो आपल्या हातातील काठीचा आधार घेतो आहे असे दिसले. तो चांगलाच कृश झाला होता आणि अठरा महिन्यांच्या तुरुंगवासामुळे त्याला अकाली वृद्धत्व प्राप्त झाले होते. असे होते तरी, ती सर्वपरिचित मुद्र-पाईप त्याने आपल्या दातात गच्चपणे पकडून ठेवलेली त्या दृष्यात पाहावयास मिळत होती.

केन हा केवळ प्रकाशक नव्हता. तो किराणा-भुसार मालाचा यशस्वी व्यापारी होता. मान्यवर असा राजकीय पत्रकारही होता. त्याच्या वृत्तपत्रीय लिखाणाची शैली मर्मभेदी, अणकुचीदार आणि वाचकांच्या मनाचा ठाव घेणारी होती. हे सारे त्याच्या वृत्तपत्रीय लिखाणाचे खास विशेष म्हणून नायजेरियात सांगितले जातात. मला मागाहून आणखी एक शोध लागला. केन हा अनेक साहित्य-प्रकार हाताळणारा चतुरस्त्र लेखक होता. त्याने कादंबऱ्या, नाटके, काव्यसंग्रह हे तर लिहिले होतेच. या शिवाय त्याने लिहिलेले बालवाङ्मयही लोकप्रिय ठरलेले होते. सगळ्यात महत्त्वाची गोष्ट, म्हणजे हे सारे साहित्य त्याने स्वतःच प्रकाशित केले होते. दूरचित्रवाणीच्या क्षेत्रातली त्याची कामगिरी उल्लेखनीय अशीच आहे. दूरचित्रवाणीवरच्या अत्यंत लोकप्रिय अशा मालिकेचा तो लेखक व निर्माताही. या मालिकेचे नाव आहे 'बासी ॲण्ड को' (Basi & Co). सर्वच आफ्रिकेतल्या देशात कमालीचा लोकप्रिय असा हा सोप ऑपेरा. तीन कोटीहून अधिक प्रेक्षक या मालिकेने आकर्षित केले होते. मालिकेचे कथासूत्र थोडक्यात असे आहे : बासी आणि त्याचे चमचे म्हणजे नायजेरियातील एका शहरातील, अधू मेंदूचा, आळशी, पैशाने दरिद्री अशा तरुणांचा संच! ते तसे पोटापाण्याचा उद्योग म्हणून, एरवीही कसलेही काम करीत नाहीत. फक्त श्रीमंत होण्यासाठी मूर्ख ठरतील अशा योजना ते सदैव आखीत असतात. ही मालिका तशी विनोदी होती पण काही प्रमाणत क्लेशदायक होती. तसे असले तरी नायजेरियातील परिस्थिती अचूकपणे टिपणारी आहे. काही वरच्या दर्जाची कलामूल्ये नजरेसमोर ठेऊन या मालिकेची निर्मिती वा लेखन झालेले नाही. हे खुद्द केननेच अनेक वेळा मला सांगितले. म्हणूनच ही मालिका अत्यंत निर्भयपणे व कोणतीही (साहित्य आणि समीक्षात्मक टीका-टिप्पणीची) लाज न बाळगता, प्रचारी व लोकशिक्षणात्मक आहे. बासी आणि त्याचे मित्र-चमचे यांच्याबाबतीत जे जे काही चुकीचे होते, ते ते सारे नायजेरिया या राष्ट्राबाबतीतही चुकीचे होते. हा

सारा बनावच मोठा गमतीदार आहे. बासी ॲण्ड को ला श्रीमंत होण्याची जरूर इच्छा आहे. पण बासी ॲण्ड को या टोळीचा सदस्य असलेल्या कोणालाही कसलेही शारीरिक, मानसिक काम करण्याची इच्छा नाही. परंतु ते सारेजण अशा दिमाखात वावरतात की बाह्य जगाने, त्यांना त्यांचा रोजगार मिळवून दिलाच पाहिजे. समाजाने वैध ठरविलेल्या मार्गांनी मिळाला नाही तर अर्थातच अवैध मार्ग पत्करण्याचीही त्यांची तयारी आहे. आपल्या स्वतःचा योगक्षेम अत्यंत उत्तम प्रकारे चालला पाहिजे, हे त्या सर्वांच्या विचारामागचे प्रधान सूत्र. थोडक्यात केन यांनी हा 'सोप ऑपेरा' लोकशिक्षण व्हावे याकरताच लिहिला व त्याची निर्मिती केली.

यानंतर, जेव्हा जेव्हा केन लंडनला येत असे, तेव्हा आम्ही दोघे दुपारचे जेवण एकत्रित घेत होतो. सामान्यपणे आम्ही 'चेलसी आर्ट क्लब'मध्ये जेवण घेत असू. त्याची पत्नी व चारही मुले इंग्लंडमध्येच राहात होती, म्हणून त्याची इंग्लंड-वारी ही अगदी नियमितपणे व वारंवार होत होती. केन आपल्या पुस्तकांचे वितरण ब्रिटनमध्ये व्हावे यासाठी प्रयत्न करीत होता. या त्याच्या कामात त्याला मदत व्हावी, या हेतूने मी लंडन टाईम्समध्ये त्याचे एक शब्दचित्र लिहिले. आम्ही दोघेही लेखक होतो. त्याच नात्याने आमच्या भेटी-गाठी होत. आम्हा दोघात समान असे बरेच काही होते. म्हणूनच मद्यपान करीत चांगल्या तासभर, काही वेळा चांगल्या तीन तासही अगदी तब्येतीत गप्पा होत असत. केनच्या लिखाणात लक्षणीय अशी विविधता आहे. तो सर्वच साहित्यप्रकार हाताळीत असे याचा उल्लेख मी या पूर्वीच केला आहे. माझ्या मते 'Sozaboy' सोझाबॉय ही त्यांच्या सर्व साहित्यकृतीतील सर्वश्रेष्ठ अशी साहित्यकृती. या साहित्यकृतीचे – कादंबरीचे उपनाव आहे. 'A Novel in Rotten English' (अत्यंत गचाळ इंग्रजीत लिहिलेली कादंबरी). ही कादंबरी एका अनोख्या भाषेत लिहिलेली आहे. ब्रिटिश साम्राज्यात पूर्वी वेस्ट आफ्रिकन कॉलनीज म्हणून जे देश ओळखले जात, त्यांची भाषा पिडगिन इंग्लिश. ही भाषा आणि तिच्या जोडीला अभिजात इंग्लिश भाषेतील काव्यमय असे वाक्प्रयोग, वाक्ये या दोघांचे मिश्रण करून जी भाषा तयार होईल त्या भाषेत ही कादंबरी लिहिलेली आहे. ही अशा प्रकारे तयार केलेली भाषा म्हणजे एक प्रकारची गावरान भाषा होती. इंग्लिश भाषेवर मोठ्या आदवशीरपणे मारलेला तो डल्ला होता. या कादंबरीतले कथानक सांगण्याकरता केनने तयार केलेली ही भाषा अगदी योग्य असे माध्यम होते. या कादंबरीतल्या कथानकाचे सूत्र येणे-प्रमाणे : नायजेरियन यादवी युद्ध चालू असताना एका साधाभोळ्या मुलाची विआफ्रान (BIAFRAN) सैन्यात भरती होते. त्या मुलानेही सैनिक (सोझा) होण्याची स्वप्ने पाहिलेली असतात. परंतु त्या यादवीयुद्धातील प्रकार फारच रानटी व क्रूर होते. या अशा प्रकारच्या संघर्षातील त्या कठोर वस्तुस्थितीमुळे, त्या मुलाचा भ्रमनिरास झाला. अत्यंत क्रूर अशा भ्रम-निराशेच्या आवर्तात तो सापडतो. सोझाबॉय ही केवळ एक महान आफ्रिकन कादंबरी नाही. ती एक महान युद्ध-विरोधी कादंबरी आहे.

केन यांना त्या यादवी युद्धात जे विआफ्रान यादवी युद्ध म्हणून ओळखले

जाते, जो अनुभव आला, त्यात त्या सोझाबॉय या कादंबरीचे मूळ आहे. त्या यादवीयुद्धाच्या अनुभवातूनच ती कादंबरी जन्मास आली. हेच विधान केन यांच्या इतर लिखाणाबाबतही करता येईल. त्याही लिखाणाची पार्श्वभूमी बिआफ्रान यादवी-युद्ध हीच होती. नायजेरिया या देशात, पूर्वेला वसती करून असलेल्या काही वांशिक गटांना बिआफ्रा हे नाव देण्यात आले होते. या वांशिक गटांचे संघटन तसे विसविशीत होते. नायजेरियातील पूर्वेकडच्या प्रदेशात इबो या टोळीचे प्राबल्य जास्त करून होते आणि म्हणूनच त्या टोळीच्या प्रभावाखाली तो भाग होता. या इबो टोळीचा नेता, कर्नल चुकवुएमेका ओड्मेगवू ओजूकैवू (CHUKWEEMEKA ODUMEGWE OJUKWU) याने नायजेरिया राष्ट्रातून विभक्त होण्याचे ठरविले. त्याने नायजेरियात, ज्या ठिकाणी तेलखाणी आहेत, त्या प्रदेशावरही आपला हक्क आहे असे सांगितले. यानंतर मुळातल्या नायजेरियन राष्ट्रापासून या विभक्त झालेल्या राष्ट्राबरोबर जे युद्ध झाले तेच बिआफ्रान यादवीयुद्ध – त्यात किमान दहा लाख मृत्यू पावले. यातल्या बहुतेकांना लढाईत झालेल्या जखमांनी मृत्यू आला नव्हता, तर तो उपासमारीमुळे आला होता.

ओजूकवू यांनी मूळ नायजेरियापासून विभक्त होऊन नवे राष्ट्र उभारण्याचे जे स्वप्न पाहिले होते त्यात नायजेरियातले जे वांशिक गट सामील झाले होते, ते सारे त्यात राजी-खुषीने सामील झाले नव्हते. उदा. केन हा ओगोनी वांशिक टोळीतला. ही टोळी त्या युद्धात खुषीने सामील झाली नव्हती. या यादवीयुद्धाला १९६७ साली तोंड फुटले. त्यावेळी केन सुट्टीवर होता. बिआफ्रा राज्याच्या ज्या सीमा होत्या त्यात तो अडकून पडला. आपण दुसऱ्या कोणाच्या तरी युद्धात सामील होणे हे किती मूर्खपणाचे हे त्याच्या लगेच लक्षात आले. मोठ्या हिकमतीने ओजूकवूच्या सैन्याला हुलकावणी देऊन, मूळ नायजेरियन संघराज्याच्या बाजूला जाऊन त्याने आपली सुटका करून घेतली. नायजर नदीचा जो त्रिभुज प्रदेश आहे त्यात बॉनी (BONNY) नावाचे बंदर आहे. नायजेरियन तेलाची निर्यात करण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे व मोक्याचे बंदर. त्या बंदराच्या मुलकी शासनाचा प्रमुख म्हणून केनची नेमणूक झाली. बिआफ्रा सैन्याने १९७० साली शस्त्र खाली ठेवले. त्या दिवसापर्यंत केन त्या स्थानावर काम करत होता. केनने या यादवीयुद्धासंबंधीच्या आपल्या अनुभवांवर आधारलेले एक आठवणीवजा चांगले पुस्तक लिहिले. त्या आठवणीच्या पुस्तकाचे नाव 'ON A DARKLING PLAIN'.

केनने काही वर्षानंतर नायजेरियन सैन्याच्या विरुद्ध जो लढा दिला त्या मागच्या प्रेरणेची बीजे त्या अनुभवात आहेत. एखाद्या बलदंड व सर्वंकष सैनिकी हुकूमशहापुढे, बिआफ्रान युद्धात अल्पसंख्य वांशिक गट कसे हतबल झाले होते हे केनला चांगले समजले होते. तेल आणि तेलातून निर्माण होणारी संपत्ती, ही समाजाचा नाश करणार, तसेच समाजाला भ्रष्ट करण्याचे ते साधन आहे याचाही अनुभव त्यांना आला होता. म्हणूनच एखाद्याने आपल्या सदसदविवेकबुद्धीशी इमान राखण्याची किती गरज आहे, याचे महत्त्वही त्याच्या लक्षात आले होते.

केन यांच्या राजकीय पत्रकारितेतही या अनुभवाच्या खुणा आहेत. त्याने जे राजकीय लिखाण केले ते खास करून उपहासात्मक आहे. त्यातून नैतिक जोष व त्याबद्दल आग्रह व्यक्त झालेला आपणास स्पष्टपणे दिसतो. अनेक वर्षे लागोस (LAGOS) येथून प्रसिद्ध होणाऱ्या पंच व्हॅंगार्ड आणि डेली टाईम्स या दैनिकांचा केन हा स्तंभलेखक होता. गलीव्हर्स ट्रॅव्हल्स या पुस्तकाचे जगप्रसिद्ध लेखक स्विफ्ट ज्या प्रकारचे उपहासात्मक लिखाण करीत, त्या स्वरूपाचे लिखाण केन याने केले. नायजेरियातील जीवन, वांशिक-टोळीवाद, अल्पसंख्यांकांच्या हक्काबद्दलचे अज्ञान, बोकाळलेला चंगळवाद, अकार्यक्षमता, लाचलुचपत हे रोग नायजेरियन समाजात कायमचे घर करून राहिले आहेत हेही त्याने पाहिले होते. त्या विरुद्ध त्याने आपली लेखणी सातत्याने झिजवली. 'बासी ॲंड को' या दूरचित्रवाणीवरच्या मालिकेने, तो लोकप्रिय झाला होता हे खरे. परंतु सर्वसामान्य जनतेत त्याला जास्तकरून कीर्ती, मान, लोकप्रियता मिळाली असेल ती त्यांच्या या राजकीय पत्रकारितेने.

१९८० नंतर, केन याच्या बोलण्यात, त्याच्या टोळीने व्यापलेल्या प्रदेशाचा उल्लेख वारंवार येऊ लागल्याचे मला स्मरते. ओगोनी ही फारच छोटी वांशिक टोळी आहे. नायजेरियात तशा सुमारे दोनशेपन्नास वांशिक-टोळ्या आहेत. नायजर नदीचा दुआब हा सुपीक भाग आहे. त्या भागात ओगोनी या वांशिक-टोळीचे सुमारे पाचलाख लोक राहातात. या भागाव्यतिरिक्त त्यांची वस्ती नायजेरियात अन्य कोठेही नाही. या टोळीचे दुर्दैव हे आहे की, त्यांची मातृभूमी ही नायजेरियातील तेलखाणी असलेला जो प्रदेश आहे त्या भागातच आहे. १९५४-५५ सालापासून, ही ओगोनीची मातृभूमी, तेलनिर्मितीच्या प्रक्रियेने जे प्रदूषण होते त्याने पार उध्वस्त झाली आहे. एकेकाळी ओगोनीची ही मातृभूमी हा सधन शेतकरी आणि मासेमारीचा धंदा करणारे सधन कोळी यांचे वास्तव्य असलेला अत्यंत शांत असा ग्रामीण भाग होता. हा एकेकाळचा शांत ग्रामीण भाग प्रदूषणामुळे उजाड व वैराण झाला आहे. या भागातील हवा गंधकाने कायमची भरलेली. खाणीतून तेल बाहेर काढत असताना जे तेल सांडते व ते सर्वत्र इतस्ततः पसरते. त्या तेलाने, त्या भागातील खाड्या व झरे यातील पाणी दूषित होऊन, ते विषारी झाले आहे. एवढ्यावरच हे थांबत नाही. या पसरलेल्या तेलातून जे वायू निर्माण होतात ते पेट घेतात. पेटलेल्या वायुतून निर्माण झालेल्या भगव्या ज्वाळा, रात्रीच्या वेळी नृत्य करतात. प्रेतावर गुजराण करणाऱ्या भुतांनी केलेले ते नृत्य आहे असे वाटते.

केनला आपल्या मातृभूमीबद्दल सदैव चिंता वाटत असे. ती चिंता दिवसें-दिवस वाढतच चालली. त्याने आजवर जो लेखनव्यवसाय केला होता तो सोडला. त्याने ओगोनी टोळीतल्या लोकांच्या ज्या समस्या आहेत, त्या सोडविण्यासाठी जो संघर्ष चालू होता व करावा लागणार होता, त्यात स्वतःस झोकून दिले. यासाठी नायजेरियात व परदेशात प्रचारदौरे करून जनजागरण करण्यास त्याने सुरुवात केली. Movement for the survival of Ogoni People – ओगोनी जमात टिकून राहावी यासाठी आंदोलन, MOSOP मोसोप ही संघटना स्थापन होण्यामागे

केनचीच प्रेरणा होती. या संघटनेच्या स्थापनेनंतर थोड्याच दिवसांनी तो त्या संघटनेचा प्रमुख प्रवक्ता झाला. ओगोनी जमात जिवंत ठेवण्यासाठी चाललेला हा संघर्ष हा खरे म्हणजे राजकीय मागण्यांपेक्षाही पर्यावरणाशी संबंधित असलेल्या मागण्यांशी निगडीत होता. केनने आपली मातृभूमी उध्वस्त केल्याबद्दल नायजेरियन सरकारकडे आणि तेल खाणी असलेल्या प्रदेशात काम करणाऱ्या आंतरराष्ट्रीय कंपन्या, विशेष करून 'शेल' या कंपनीकडे नुकसानभरपाईची मागणी केली. विशेषतः शेल या कंपनीने केनचा आपल्यावर राग ओढवून घेतला होता. केनला या कंपनीबद्दल हा जो राग होता, तो त्याच्या मनात चांगलाच खोलवर गेलेला होता. ओगोनी या केनच्या मातृभूमीवर जी पर्यावरणाच्या स्वरूपात आपत्ती आली होती त्याला शेल कंपनी जबाबदार आहे असे केनचे सांगणे होते. हे त्याचे सांगणे चांगलेच संयुक्तिक व बुद्धीला पटणारे होते. केनने असे ठासून सांगितले की, माझ्या ओगोनी जमातीतील माझे बांधव हे संथ गतीने होणाऱ्या सरकारी वांशिक उच्छेदात सापडले आहेत. त्यांचा हा वांशिक उच्छेद व नार्यनाट बुद्धिपुरस्सर करण्यात येत आहे. आणखी एक महत्त्वाचा मुद्दा या ठिकाणी लक्षात घेतला पाहिजे. या संघर्षात व आंदोलनात निषेध व्यक्त करण्यासाठी अनेक प्रकारच्या कृती होतीलच. पण त्या सर्व कृती या शांततामय व अहिंसात्मक असल्याच पाहिजेत, या संबंधी केनचा कटाक्ष होता व तो त्यासंबंधी फारच जागरूक असे. आजचा विधमान नायजेरिया हा अत्यंत भ्रष्ट व लाचलुचपतीने सडलेला देश आहे. (भारतालाही त्याने याबाबतीत केव्हाच मागे टाकले आहे. आपण भारतीय त्या मानाने नशीबवान!) त्याजबरोबर हे राष्ट्र अत्यंत धोकादायकपणे, हिंसेने आकंठ भरलेले राष्ट्र आहे. मी या ठिकाणी आणखी एक मुद्दा खासकरून नमूद करतो. ओगोनी आंदोलनाने, आपली मतदर्शके तत्त्वे म्हणून जी घोषित केली, त्यांच्याशी कमालीचे इमान कायम राखले होते. ही त्या आंदोलनाची फारच प्रचंड अशी जमेची बाजू आहे. ओगोनी जमातीची जी जी जनता-निदर्शने संघटित करण्यात आली, ती सारी कोणतीही हिंसा, धाकदपटशा, बळजोरी, अशा प्रकारची कोणतीही कृती न होता पार पडली हा इतिहास आहे. नायजेरियाबाहेरच्या देशातील ग्रीनपीस आणि इतर पर्यावरणवादी गटांनी ओगोनीच्या ज्या समस्या व प्रश्न होते त्या सर्वांबरोबर आपण आहोत असे ठासून सांगितले. हे सारे बरोबर आहे, परंतु या सर्व घटनातही एक दुर्देवी असा उपरोध आहे. केन याने जे आंदोलन उभे केले होते, त्याचे मोजमाप घ्यायचे झाले तर? हा प्रश्न राहातोच. या प्रश्नाचे उत्तरही लगेच मिळाले. इ.स. १९९२ साली नायजेरियन सैन्याने त्याला अटक केली आणि तुरुंगात रवानगी केली. अनेक महिने, त्यांच्यावर खटला न भरताही त्यांना तुरुंगात डांबून ठेवण्यात आले होते. दुसरा महत्त्वाचा मुद्दा हा आहे की, केनच्या अटकेनंतर इ.स. १९९३ साली 'शेल' या आंतरराष्ट्रीय कंपनीने, आपला ओगोनी या वांशिक-टोळीच्या प्रदेशातील धंदा आपण बंद केला आहे असे स्वतःच जाहीर केले!

या घटना घडत होत्या. त्यावेळी जनरल इब्राहिम बाबानगिडा

(BABANGIDA) हे नायजेरियन सैन्याच्या प्रमुखपदी होते. ब्रिटिश वर्तमानपत्रांनी (भारतीय लेखकांना या सर्व प्रकरणाची गंधवार्ताही नव्हती) केन यांची सुटका व्हावी म्हणून आंदोलन उभे केले होते. त्याचा परिणाम होऊन सरतेशेवटी केनची तुरुंगवासातून मुक्तता झाली. यानंतर थोड्याच दिवसांनी बाबानगिडा यांनी स्वखुषीने सत्तात्याग केला. आणि आपल्या एका चमच्याच्या हाती – जनरल आबाचा – सत्ता सुपूर्द केली. जनरल आबाचा यांना सार्वजनिक निवडणूक घ्यायची होती. ही निवडणूक सैनिकी राजवटीचे, मुलकी राजवटीत संक्रमण होण्याच्या प्रक्रियेतील एक महत्त्वाचा भाग होता. या प्रक्रियेवर जनरल आबाचा यांनी देखरेख करावी अशी अपेक्षा होती. त्यानुसार १९९३ साली सार्वजनिक निवडणूक झालीही. सर्व राष्ट्राने मतदानात उत्साहाने भाग घेतला आणि या लोकशाही मार्गाने चिफ मोशूद आबीओला (Chief Moshood Abiola) यांची राष्ट्राध्यक्ष म्हणून निवड झाली. हा निवडणुकीचा निकाल पाहून सैनिकीवळावर जनरल आबाचा यांनी ही सार्वत्रिक निवडणूकच रद्द ठरविली आणि यानंतर थोड्याच दिवसात त्या विजयी उमेदवाराची रवानगी तुरुंगात करण्यात आली. नायजेरियात एका सर्वंकष हुकूमशाही आणि जवळजवळ अराजकच म्हटले पाहिजे अशा राजवटीस सुरुवात झाली. नायजेरिया या राष्ट्राच्या दृष्टीने भविष्यकाळ तसा वाईटच आहे, पण ओगोनी जमात आणि त्या जमातीचे जे कोणी नेते असतील त्यांच्या दृष्टीने भविष्यकाळ हा अती वाईट व अगदी काळाकुट्ट आहे.

या मध्यंतरीच्या काळात, केन ज्या ज्या वेळी लंडनमध्ये असे त्यावेळी दुपारच्या जेवणासाठी, मी आणि केन, चेलसी आर्टस क्लबमध्ये भेटतच होतो. इ.स. १९९२ साली केनच्या आयुष्यातील एक मोठी दुर्दैवी व दुःखदायक अशी कौटुंबिक घटना घडली. त्या घटनेने, त्याला स्वतःला फार दुःख झालेच, पण मोठाच मानसिक असा हादरा बसला होता. त्याचा चौदा वर्षांचा सगळ्यात धाकटा मुलगा हा इटन या प्रख्यात ब्रिटिश पब्लिक स्कूलमध्ये शिक्षण घेत होता. एक दिवस रग्बीचा खेळ चालू असताना, एकाएकी हृदयक्रिया बंद पडून त्या मुलाचे मैदानावरच प्राणोत्क्रमण झाले. केन या वैयक्तिक स्वरूपाच्या दुःखाच्या महासागरात पार बुडाला हे तर खरेच. तसे झाले नसते तर नवल. पण त्याची आणखी एक वरवर चमत्कारिक दिसेल अशी प्रतिक्रिया झाली. त्याला आपल्या ओगोनी जमातीच्या हक्कासाठी झगडण्यासाठी, या अतीव दुःखाने एक नवी ताकद मिळवून दिली होती.

तो नायजेरियाला परतण्यापूर्वी – त्याची ती इंग्लंडला शेवटचीच भेट होती – आम्ही थोडेच दिवस अगोदर भेटलो होतो. मला स्वतःला नायजेरियाचा जो काही अनुभव होता त्यावरून त्या देशातले राजकीय जीवन कसलीही तडजोड, दयामाया न दाखविणारे, कमालीचे असहिष्णू व क्रूर आहे हे मला माहीत होते. केन हा आता काही तरुण नव्हता. त्याची तब्येतही तशी उत्तम स्थितीत होती असेही नाही. त्यालाही हृदयविकाराचा त्रास होताच. आम्ही जेव्हा एकमेकांचा निरोप

घेतला, तेव्हा हस्तांदोलन करताना मी त्याला म्हटले, "केन, गड्या काळजीपूर्वक वाग, जपून राहा. ठीक आहे? यावर तो हसला – त्याचे ते शुष्क पण आनंददायी हास्य – आणि म्हणाला 'होय रे, मी फार काळजी घेईन. तू काळजी करू नकोस' हे तो म्हणाला होता. तरी मला माहीत होते, तो त्यातले काहीही करणार नव्हता.

नायजेरियात गेली अनेक वर्षे एका पाठोपाठ एक अनेक सैनिकी सरकारे आली व गेली. पण त्यातले प्रत्येक सरकार, तेल विकून जो प्रचंड पैसा मिळे त्यावर तग धरून कसेबसे दिवस काढीत असे. तसेच या तेलाच्या पैशातून स्वतःच्या तुंबड्या भरून घेणे हे सैन्यातल्या पदाधिकाऱ्यांनाही, अगदी अंगवळणी पडल्यासारखे झाले होते. त्या सर्वांनी अक्षरशः कोट्यावधी डॉलर्सची कमाई केलेली आहे. याचाच अर्थ जर कोठची चळवळ वा आंदोलन या वहात्या पैशाच्या ओघात अडथळा निर्माण करील वा त्याला धोका उत्पन्न करील, तर मग त्या चळवळीच्या मुसक्या बांधल्या जाणारच अथवा तिचा नायनाट होणारच हे ओघानेच आले. आबाचा यांचे नायजेरियन गादीवरचे स्थान आता तसे काहीकाळ तरी अगदी मजबूत आहे. त्यांच्या अवतीभोवतीचे टोळके अगदी उघडउघडपणे निर्लज्ज आहे. या दोघांच्याही दृष्टीने केन हा त्या सर्वांच्याच हितसंबंधांच्या दृष्टीने धोकादायक मनुष्य होता. हे सर्व केनलाही चांगले माहीत होते, तरी तो आपले आंदोलन चालू ठेवण्यासाठी नायजेरियात परतला. मला स्वतःला जो नायजेरिया परिचित होता, त्यापेक्षा विद्यमान नायजेरिया हा अधिक प्रमाणात फारच काळीकुट्ट अशी कारस्थाने व खून यांनी अगदी ओतप्रत भरलेला देश आहे. सरकारी दहशतवाद, हे सरकारने बुद्धिपुरस्सर पत्करलेले धोरण आहे. या दहशतवादाचा अवलंब करून उभी खेडी जाळून भस्मसात करणे, कसलीही दिक्कत न बाळगता खून करणे आणि स्त्रियांवर राजरोस बलात्कार करणे, हे सारे त्या देशात रोजचेच झालेले आहे. आजवर दोनहजार ओगोनी (एकंदर लोकसंख्या पाच लाख) या हत्याकांडाला बळी पडलेले आहेत. या अशा परिस्थितीत आंदोलन चालू ठेवण्यासाठी केन परतला होता.

मे १९९४ या महिन्यात ओगोनी जमातीच्या प्रदेशातील एका शहरातील मेळाव्यासमोर भाषण करण्यासाठी म्हणून केन मार्गस्थ होता. सैन्याने या वाटेवर नाकेबंदी केलेली होती, त्यामुळे केनला वाटेतूनच परतावे लागले. अगदी नाइलाजाने तो परतला होता. अनिच्छेने तो आपल्या स्वतःच्या घरी परत गेला. तो मेळावा, ठरल्या दिवशी, ठरल्या वेळी, ठरल्या ठिकाणीच झाला. या मेळाव्याच्या ठिकाणी दंगल झाली. अशा दंगलीत नायजेरियात होते त्याप्रमाणेच चार ओगोनी प्रतिष्ठित मारले गेले. हे चारही प्रतिष्ठित विद्यमान नायजेरियन सैनिकी सरकारबद्दल सहानुभूती बाळगणारे होते असा समज आहे.

केनला अटक झाली. त्याच्याबरोबर दुसऱ्याही अनेकांना पकडण्यात आले. केन व त्या सर्वांवर खून करण्यास प्रोत्साहन देणे, हा आरोप ठेवण्यात आला. वास्तविक केन, ती घटना घडली, त्या जागेपासून काही किलोमीटर अंतरावर,

आपल्या गाडीतून घरी परत जात होता. तो जात होता ती जागेची दिशाही या घटनास्थळाच्या अगदी विरुद्ध दिशेला होता. या दोन्हीही गोष्टींची सैनिकी नायजेरियन सरकारने बुद्धिपुरस्सर दखल घेतली नाही व त्याला अटक केली. तो एका वर्षाहून अधिक काळ तसाच तुरुंगात होता. सरतेशेवटी केन व त्याच्याबरोबर अटक झालेले जे कोणी होते, त्यांचा खटला चालविण्यासाठी म्हणून खास न्यायालयाची नेमणूक करण्यात आली. या न्यायालयासमोर केनचा खटला चालला. हे न्यायालय देईल तो निर्णय अंतिम होता. या न्यायालयाने दिलेल्या निर्णयाला आव्हान देण्यासाठी दुसऱ्या कोणत्याही न्यायालयासमोर जाता आले नसते. हा मुद्दा अधोरेखित करून सांगण्याचे एकच कारण आहे. या खटल्यासाठी निर्माण केलेले म्हणून जे खास न्यायालय होते, त्या न्यायालयाने दिलेल्या निर्णयाविरुद्ध नायजेरियातल्या सुप्रीम कोर्टात कोणासही जाता आले नसते, कारण 'कायदाच' तसा केलेला होता (या ठिकाणी इंदिरा गांधींनी केलेल्या कायद्यांचे स्मरण व्हावे). थोडक्यात, फेरतपासणी व फेरनिर्णय हे जे कोणत्याही आरोपीचे हक्क सर्वसमान्यपणे कोठल्याही लोकशाही देशात – भारतातही इंदिरा गांधींचा आणीबाणीचा काळ वगळता – असतात तेच हक्क केनला नाकारण्यात आलेले होते. ही या खास न्यायालयातील तथाकथित अशी जी 'कायदेशीर प्रक्रिया' होती तिचा आंतरराष्ट्रीय पातळीवर ती अत्यंत दिखाऊ व खोटी अशी प्रक्रिया आहे, असे नमूद करून धिक्कार करण्यात आलेला आहे. थोडक्यात हा खटला दिखावटीचा खटला होता. तो नायजेरियन सरकारने निर्माण केलेल्या न्यायालयात चालला. या न्यायालयातले न्यायाधीश हे नायजेरियन सैनिकी सरकारचे बगलबच्चे वा चमचे होते. एवंच हे न्यायालय नायजेरियन सैनिकी सरकारला जो निर्णय हवा होता तोच मिळावा या हेतूने निर्माण केलेले न्यायालय होते.

गुरुवार २ नोव्हेंबर १९९५ रोजी केन आणि त्याच्याबरोबरच्या इतर आरोपींना दोषी ठरविण्यात आले आणि त्या सर्वांना फाशीची शिक्षा देण्यात आली. एकाएकी सर्व जगाला नायजेरिया या राष्ट्राची अवनती कोठच्या थराला जाऊन पोचली आहे याची क्षणार्धात कल्पना आली.

एकंदरीत चिन्हे काही चांगली नव्हती. एका अत्यंत प्रतिकूल आणि वाईट परिस्थितीत जास्तीत जास्त चांगले आपल्या पदरात कसे पडेल याच्या शोधात मी होतो. हे सारे मी कसलाही सारासार विचार न करता केवळ उपजत बुद्धीनेच करीत होतो. केनचा जो खटला होता त्याला जर चांगली विस्तृत अशी प्रसिद्धी मिळाली, तर त्याचा उपयोग होईल असे मला वाटले. त्याचवेळी न्यूझीलंड येथे कॉमनवेल्थ परिषद भरणार होती. ब्रिटिश साम्राज्यात जे देश पूर्वी होते, त्या देशांच्या प्रमुखांची ही बैठक दर दोन वर्षांनी होते. वृत्तपत्रातली प्रसिद्धी आणि राष्ट्रप्रमुखांची ही बैठक, या दोघांचा परिणाम होऊन – सर्वात वाईट गोष्ट म्हणजे केन फाशी जाणे – घडणार नाही, अशी मी आशा बाळगून होतो. मी माझ्या मनाशी पुढीलप्रमाणे युक्तिवाद करीत होतो. कॉमनवेल्थ परिषदेत सहभागी झालेल्या

राष्ट्रांनी मानवी हक्कांची तत्त्वे शिरोधार्य मानलेली आहेत. तीव तत्त्वे आपल्यातला एक सभासद इतक्या बेमुर्वतपणे व जाहीरपणे वाऱ्यावर कसा सोडून देईल? तसे काही तो देश करू लागला, तर बाकीचे सारे देश त्याला प्रतिबंध करतील. माझा हा युक्तिवाद चुकीचा ठरला, पण ते नंतर. जनरल आबाचा यांना अंधाराच्या गर्तेत फेकला गेलेला आपला नायजेरिया सोडून या परिषदेला हजर राहाण्याचे धैर्य झाले नाही. त्यांच्या परराष्ट्रमंत्र्यांनी त्या परिषदेत नायजेरियाचे प्रतिनिधित्व केले.

नेल्सन मंडेला हेही त्या परिषदेला हजर होते. त्यांची त्या परिषदेतली हजेरी ही खासकरून प्रोत्साहित करणारी होती. केवळ मला नव्हे, तर गेले काही महिने केनची सुटका व्हावी यासाठी, जे जे कोणी संघर्ष करीत होते, ते सारेच प्रोत्साहित झाले होते. केनच्या मुक्ततेसाठी अनेक व्यक्तींचा व संघटनांचा एक गट बांधण्यात आला होता. त्यात 'इंटरनॅशनल पेन', 'दि ओगोनी फाउंडेशन', 'ग्रीनपीस' आणि इतर अनेकजण होते. नेल्सन मंडेला यांचा नैतिक अधिकार मोठा आहे. नायजेरियन सैनिकी राज्यकर्त्यांनी आपल्या निर्णयाचा फेरविचार करावा यासाठी या नैतिकतेचा वापर होईल, नेल्सन मंडेला त्या अधिकाराच्या जोरावर राज्यकर्त्यांचे मन वळविण्यात यशस्वी होतील असे आम्हास वाटत होते. आम्हास हे असे वाटण्याचे कारण एकच होते, ते म्हणजे नायजेरियन सैनिकी राज्यकर्त्यांचा हृदयपालट झाला, तर तो फक्त नैतिक अधिकाराच्या जोरावरच होईल याबद्दल आमची खात्री होती. नेल्सन मंडेला यांनी आम्हा सर्वांस धीर धरण्यास सांगितले. ते आम्हास सातत्याने तेच सांगत होते. त्यांचे सांगणे असे होते की सावकाश, अत्यंत खालच्या पातळीवर केलेल्या राजकीय वाटाघाटीतून या प्रश्नाची सोडवणूक होईल. त्यापेक्षा त्यांनी अधिक काहीही केले नाही. या त्यांच्या वागणुकीने आम्ही सारेच चांगलेच चक्रावून गेलो होतो व गोंधळातही पडलो होतो.

मंडेला यांनी सबुरीचा सल्ला दिला होता तरीही सर्वच वृत्तपत्रांनी नायजेरियन सैन्याचा एकमुखी निषेध केला. याला प्रत्युत्तर म्हणून, आबाचाच्या हस्तकांनी केन खटला दाखविणारे काही वार्तापट प्रसिद्ध केले. 'न्यायालयीन प्रक्रिया' ही कायदेशीर होती, हे या वार्तापटांच्या द्वारा त्यांना प्रस्थापित करायचे होते. या वार्तापटातून कैद्यांची रांग दाखविण्यात आली होती. त्यांचे चेहरे ओढलेले, मान खाली, त्यांच्यासमोर तीन बलदंड अधिकारी आव्हानात्मक पवित्र्यात उभे! त्यांच्या गणवेषावर सोन्याच्या साखळ्या व पट्ट्या. हे अधिकारी इकडून – तिकडे जाताना दिसत होते. मोठ्या दिमाखात एक अधिकारी दुसऱ्याला कसले तरी कागद देत होता. या पार्श्वभूमीवर एक शिपाई येरझारा घालीत होता. केनने न्यायालयाला उद्देशून भाषण केले. त्याचा आवाज खणखणीत होता. त्याने आव्हानात्मक पवित्रा घेतला होता याबद्दल काहीही शंका नाही. त्याच्यात भीतीचा लवलेशही असल्याचे जाणवत नव्हते. आपण जे काही केले व जे सांगत आहोत ते अगदी योग्य असेच आहे याविषयी त्याची खात्री होती.

या वार्तापटातून आबाचा यांची जी प्रतिमा प्रक्षेपित होते, ती विश्वास बसू नये अशीच आहे. त्याजबरोबर ती अत्यंत अस्वस्थ करणारी होती. केनचा खटला चालविण्यासाठी नेमलेले ट्रायबूनल हे या वार्तापटांच्या मदतीने जगातील लोकांना स्वीकारार्ह वाटेल असे त्यांना वाटले असण्याची शक्यता नाकारता येत नाही. पण त्यांना जर खरोखरच तसे वाटले असेल तर त्यात अनुस्यूत असलेला खुळचटपणा किंवा आंधळे अज्ञान यांची पातळी ही कोणासही आश्चर्यचकीत करील. परंतु या वार्तापटाद्वारे, एक भयसूचक सूचनाही देण्यात आली होती. एखादा मनुष्य इतके बेमुर्वत व इजा पोचविणारे वर्तन करतो याचा अर्थ तो आता समजूत, युक्तिवाद, शहाणपण यांच्या आवाक्या पलीकडे गेलेला आहे असे मला वाटते. मला केनबद्दल अधिकच काळजी वाटू लागली.

जागतिक लोकमत, आंतरराष्ट्रीय पातळीवरचा निषेध, तीव्र नापसंती, दयेसाठी करण्यात आलेले आवाहन, अर्जविनंत्या, यातल्या कशाचाही आता काहीही उपयोग नाही असे मला वाटू लागले. आबाचा यांनी स्वतःचीच कोंडी करून घेतली होती. आपली स्वतःची मानखंडना होऊ न देता, आपल्या प्रचंड बढाईखोरीला धक्का न लावता, एक प्रकारचा त्यांचा जो सैनिकी अभिमान होता तो कायम ठेऊन, या प्रसंगातून सुटका कशी करून घ्यावयाची हा प्रश्न आबाचापुढे होता. मला त्या रात्री झोप आली नाही.

दुसऱ्या दिवशी १० नोव्हेंबर १९९५ रोजी माझ्या दुपारच्या जेवणानंतर 'रायटर्स इन प्रिझन कमिटी ऑफ इंटरनॅशनल पेन' (इंटरनॅशनल पेन या संघटनेची – तुरुंगात असलेले लेखक – या नावाची समिती) कडून मला टेलिफोन आला. त्या संघटनेला पोर्ट हारकोर्ट येथून असे समजले होते की, त्या दिवशी सकाळी साखळदंड-बेड्या घालून कैद्यांना तुरुंगात आणल्याचे कोणीतरी पाहिले होते. हा निरोप मला त्या टेलिफोन संभाषणाद्वारे मिळाला. पोर्ट हारकोर्ट येथून ज्या व्यक्तीने ही बातमी दिली तिने पुढे असे सांगितले की, या कैद्यांना ठार मारण्याची कामगिरी ज्यांच्यावर सोपविण्यात आली होती, ते तुरुंगात लगेच हजरही झाले. अत्यंत काळयाकुट्ट फार्समधला तो गंभीर असा क्षण. या माणसांना परत पाठविण्यात आले, कारण त्यांच्याजवळचे कागदपत्र त्यांच्यावरोबर नव्हते. याच बातमीदाराने, असेही सांगितले की, काही वेळाने, केन आणि त्याच्या बरोबरच्या बाकीच्या कैद्यांना ठार मारण्यात आले आहे याविषयी त्याची 'एकशे एक टक्के' खात्री आहे. काही तासानंतर त्या बातमीदाराच्या खात्रीला नायजेरियन सैन्याने दुजोरा दिला.

मला खिन्नतेने व्यापले. मी कमालीचा दुःखी झालो. केन सारोविवा हा माझ्या आजवरच्या ओळखीच्या माणसातली सर्वात शूर अशी व्यक्ती. तो आता नाही. वेळोवेळी केन तुरुंगातून एखादे पत्र चोरून पाठविण्यात यशस्वी होई. मला आलेल्या एका पत्राचा शेवट असा आहे : 'मी अगदी मजेत आहे.... कालांतराने माझी कल्पना यशस्वी होईल, याविषयी मला अजिबात शंका नाही. परंतु या

क्षणी मला जो त्रास होतो आहे, शारीरिक व मानसिक दुःख होते आहे ते मला सहन केलेच पाहिजे. माझ्या दृष्टीने सर्वात महत्त्वाची गोष्ट एकच. ती म्हणजे, ओगोनी टोळीतील जनतेत आपला छळ करणाऱ्या लोकांना आव्हान देण्याची ताकद यावी. यासाठी एक लेखक म्हणून माझी अक्कल, हुषारी व बुद्धी मी खर्च केली आहे. एक राजकारणी अथवा व्यापारी म्हणून मला जे काम करणे शक्य नव्हते, ते माझ्या लेखनाने केले आणि त्यामुळेच मी चांगलाच समाधानी आहे हे नक्की. वाईटात वाईट असे जे काही होणार आहे त्यासाठी माझी मानसिक तयारी झालेली आहे. पण अत्युत्तम गोष्ट होईल अशी मी आशा बाळगून आहे. नैतिक विजय माझा आहे असे मला वाटते'. "केन, होय. नैतिक विजय तुझाच आहे. शांततेने चिरनिद्रा घे."

× × × × × ×

(विल्यम बॉईड यांचा जन्म आफ्रिकेतील घाना या राष्ट्राची राजधानी आक्रा येथे १९५२ साली झाला. त्यांचे बालपण घाना आणि त्यानंतर नायजेरियात गेले. त्यांचे प्राथमिक व शालेय शिक्षण गॉरडोनस टाउन (GORDONS TOWN) या शाळेत, विश्वविद्यालयीन शिक्षण युनिव्हर्सिटी ऑफ नीस (UNIVERSITY OF NICE) ग्लॅसगो आणि त्यानंतर ऑक्सफर्ड या विद्यापीठातून झाले. त्यांचा विवाह झालेला असून त्यांचे वास्तव्य लंडन येथे असते. ऑक्सफर्डमधील सेंट विल्डा या कॉलेजात इंग्लिश वाङ्मय या विषयाचे प्राध्यापक म्हणून १९८१ ते १९८३ च्या दरम्यान त्यांनी काम केले. पेनग्विनने त्यांची ('A Good Man In Africa') 'ए गुड मॅन इन आफ्रिका' ही कादंबरी प्रकाशित केलेली आहे. या कादंबरीस १९८१ सालातली उत्कृष्ट कादंबरी म्हणून 'व्हीटब्रेड लिटररी ॲवॉर्ड' हे पारितोषिक मिळाले. 'ऑन दि यांकी स्टेशन' या कथासंग्रहास १९८२ साली 'सॉमरसेट मॉम ॲवॉर्ड' प्राप्त झाले. 'ॲन आईसक्रीम वॉर', या कादंबरीस १९८२ सालचे 'जॉन लेलवेदीन मेमोरियल प्राईज' मिळाले. 'स्टार्स ऑन बार्स – दि न्यू कन्फेशन्स' या कादंबरीचा अंतर्भाव बुकर प्राईजच्या यादीत झाला होता. त्यांनी लिहिलेल्या चित्रकथापैकी सहा चित्रकथांवरून बोलपट तयार करण्यात आलेले आहेत. यात जॉईस करेच्या मिस्टर जॉनसन, आणि मारियो ल्लोसा (MARIO LLOSA) 'ऑट ज्युलिया दि स्क्रिप्ट रायटर' या दोन्हीचा समावेश आहे. पब्लिक स्कूलमधील जीवनावर आधारलेल्या दोन दूरचित्रवाणी चित्रपटांची कथानके व संवाद त्यांनी लिहिलेले आहेत. गुड ॲंड बॅड ॲट गेम्स (१९८३) आणि डच गर्ल (१९८५) ही त्या दोन दूरचित्रवाणी बोलपटाची नावे. पेनाग्विन या चित्रपटांचे संवाद स्कूल टाईज (१९८५) या नावाने प्रसिद्ध केले. १९९१ साली विल्यम बॉईड यांना 'मॅकव्हिटी प्राईज फॉर स्कॉटिश रायटर्स', हे त्या वर्षातील उत्तम लेखक म्हणून देण्यात आले. त्यांच्या 'ब्राझ्झाव्हिल बिच' या कादंबरीस १९९० सालचे जेम्स टेट ब्लॅक मेमोरियल प्राईज देण्यात आले.)

# प्रासंगिक टिपणे

## १) फ्रँकोफोनी अडचणीत

एकेकाळी 'फ्रेंच' ही जागतिक भाषा समजली जात होती. युरोपमधील सर्व राजदरबारात त्या भाषेला मान होता. आंतरराष्ट्रीय बोलणी त्याच भाषेत होत. युरोपमधील सर्व राजघराण्यात, मातृभाषेनंतर फ्रेंचला स्थान होते. फ्रेंच बोलता येणे हे सुसंस्कृतपणाचे लक्षण समजले जाई. रशियासारख्या दूरच्या देशातही सरदार, अमीर-उमराव रशियनपेक्षा फ्रेंचमध्ये संभाषण करणे पसंत करीत. इंग्रजांचे साम्राज्य जगात सर्वत्र पसरले होते तरी फ्रेंच भाषेला असलेल्या मानाच्या स्थानाला धक्का लागला नाही. दुसऱ्या महायुद्धानंतर मात्र ही परिस्थिती फारच झपाट्याने बदलली. अमेरिकेचा वरचष्मा सर्वत्र प्रस्थापित झाला असल्याकारणाने, 'अमेरिकन इंग्रजीने' आज फ्रेंच भाषेचे स्थान घेतले आहे. थोडक्यात आधुनिक जगात फ्रेंच भाषेची परिस्थिती फारच विकट झाली आहे. परिणामी प्रत्येक फ्रेंच विचारवंत आणि साहित्यिक त्या परिस्थितीचा विचार करणार हे ओघानेच आले. आजवर त्या प्रश्नाची चर्चा करण्यासाठी अनेक ग्रंथ लिहण्यात आले आहेत. त्यातले काही फ्रेंच देशभक्तीने ओतप्रोत भरलेले आहेत. अनेकजण, या प्रश्नाबद्दल वस्तुनिष्ठ दृष्टिकोनातून विचार करतात. फ्रेंच भाषेला आधुनिक जगात कोणते स्थान असावे? ती एक प्रमुख भाषा आहे, की एक सर्वसामान्य भाषा आहे? तिची पीछेहाट कशी थांबविता येईल? फ्रेंच भाषा 'अमेरिकन इंग्रजीच्या प्रभावाने भ्रष्ट होते आहे का? तसे होत असले तर ते कसे थांबविता येईल? या संबंधी काहीच करता येणार नसेल, तर प्राप्त परिस्थिती अटळ आहे असे मानून स्वस्थ बसायचे का? एक प्रमुख भाषा म्हणून फ्रेंच भाषेचे जे जगात स्थान होते ते तिने आता गमाविले आहे व ते पुन्हा परत मिळणार नाही हा विचार कितीही कडू वाटत असला, तर तो मनात ठेवून हताश व्हायचे का? इत्यादी अनेक प्रश्नांवर फ्रेंच विचारवंत, साहित्यिक, भाषाशास्त्रज्ञ यांत गेली अनेक वर्षे चर्चा चालू आहे.

एटीआमब्ल (ETIEMBLE) या फ्रेंच भाषाशास्त्रज्ञाने १९६० साली या विषयावर एक पुस्तिका लिहून या चर्चेला सुरुवात केली. त्या पुस्तिकेचे नाव आहे PARLE-VOUS FRANGLAIS (पार्ले-व्हू फ्राँगले – तुम्ही फ्रेंच-इंग्लिश बोलता का?) एटीआमब्ल हे भाषाशास्त्रज्ञ असले तरी ते कडवे फ्रेंच भाषाभिमानी आहेत. ते भाषाशास्त्रज्ञ असल्याकारणाने त्यांचे सर्वच भाषांवर प्रेम आहे. याला अपवाद फक्त 'अमेरिकन इंग्रजी' भाषेचा. या भाषेकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टीकोन नकारात्मक आहे. फ्रँको-अमेरिकन ठोकळेबाज परिभाषा (जार्गन) – LE SABIR ATLANTIQUE याचे फ्रेंच संस्कृतीवर आक्रमण होत आहे, असा त्यांचा आरोप

आहे. म्हणून ते फ्रँको-अमेरिकन जार्गनचा निषेध करतात आणि तोही अत्यंत प्रखर आणि हिंसक वाटावा अशा भाषेत. इतर अनेक फ्रेंच लेखकांनी एटीआमब्ल यांना वाटत असलेली भीती रास्त आहे असेच सांगितले आहे. वेगवेगळया प्रकारे त्यांनी एटीआमब्ल यांच्या विचारांना पाठिंबा दिला. तसे करताना आपापल्या क्षेत्रातला अनुभव व ज्ञान त्या कामी उपयोगात आणले. एकंदरीत या प्रश्नाबद्दल फ्रान्समध्ये वातावरण चांगलेच तापलेले आहे. या तप्त वातावरणात थोडा बदल व्हावा, तापमान अधिक वाढू नये असा प्रयत्न करणारेही काही विचारवंत आहेत. क्लोद आजेज (CLAUDE HAGEGE) हे त्यापैकी एक. ते भाषाशास्त्र या विषयाचे प्राध्यापक आहेत. त्यांनी ही चर्चा तारस्वरात न होता ती जरा खालच्या पट्टीत व्हावी यासाठी काही प्रश्न उपस्थित केले आहेत. उदा., फ्रान्स या देशातील फ्रेंच भाषेवर अँग्लो-अमेरिकन इंग्रजीने फार गंभीर असे आक्रमण केले आहे का? फ्रेंच भाषेचे ती भाषा विघटन करते आहे हे म्हणणे बरोबर आहे का? आधुनिक जगात फ्रेंच भाषेने स्थान गमाविले आहे असे म्हणून त्याबद्दल हताश झालेच पाहिजे का?

या प्रश्नांची संगतवार चर्चा करण्यासाठी आजेज यांनी नुकताच एक ग्रंथ लिहून प्रसिद्ध केला. त्याचे नाव आहे LE FRANCAIS ET LES SIECLES ल फ्रान्से ए लेसिएक्ल (फ्रेंच भाषा आणि आजवरची शतके). फ्रेंच भाषेवर खरोखरच आक्रमण झाले आहे का? या प्रश्नाला उत्तर देताना, त्यांनी असे म्हटले आहे की, हे आक्रमण फक्त शब्दापुरतेच मर्यादित आहे. त्यामुळे फ्रेंच भाषेतील काही शब्द बदलतील, काही नवे येतील, इतकीच त्या आक्रमणाची व्याप्ती आहे. फ्रेंच भाषेचे व्याकरण आणि वाक्यरचना यावर अमेरिकन-इंग्रजीच्या आक्रमणाचा फारसा परिणाम झालेला नाही. वाक्यरचना आणि व्याकरण हा तर कोठल्याही भाषेचा कणा आहे. त्यावर जर फारसा परिणाम झालेला नसेल तर आक्रमण झाले आहे, होत आहे, असा आरडा-ओरडा करणे हे तितकेसे बरोबर नाही. गेल्या काही शतकात फ्रेंच भाषेत किती नवीन शब्द आले व ते कसे आले, यासंबंधी तपास केला असता काय आढळते? परिस्थिती होती त्यानुसार फ्रेंच भाषेने इतर भाषांकडून नेहमीच, अगदी मुक्त हस्ताने, प्रचंड प्रमाणात, उसनवारी केलेली आहे, असे गेल्या काही शतकांचा फ्रेंच भाषेचा इतिहास सांगतो. परक्या भाषेतील अनेक शब्दांना फ्रेंच भाषेने आपलेसे केलेले आहे. पण तसे केल्याने फ्रेंच भाषेचे वैशिष्ट्य व खासियत नाहीशी झालेली नाही. त्या भाषेची वैयक्तिक प्रकृती जी पूर्वी होती, तशीच ती उसनवारीनंतरही राहिलेली आहे. आजवरच्या इतिहासात, काही वेळा असेही घडलेले आहे की, फ्रेंच भाषेने इंग्रजीतून जितके शब्द घेतले, त्यापेक्षा अधिक प्रमाणात इंग्रजीभाषेने फ्रेंच भाषेकडून उसनवारी केलेली आहे. थोडक्यात इंग्रजी व फ्रेंच या दोन्ही भाषांच्या आजवरच्या इतिहासात या उसनवारीचे प्रमाण एकाच प्रकारचे आढळते. काही शब्दांची उसनवारी ही तात्कालिक स्वरूपाची असते. ती कायम स्वरूपाची नसते. विशेषतः जाहिरातीच्या क्षेत्रात. जाहिरात ही तशी क्षणभंगुर असते अथवा तिचे स्वरूप तात्कालिक असते. म्हणूनच या क्षेत्रात एका भाषेने,

दुसऱ्या भाषेतून घेतलेले शद्ध, थोड्याच दिवसांनी मागे पडतात. विस्मृतीत जातात व मग ते कोणी वापरीतही नाही. इंग्रजीत ज्याला SLANG (स्लँग) म्हणतात, अशा प्रकारच्या शद्धांची लोकप्रियता व अस्तित्व हे फारच थोड्या काळापुरते मर्यादित असते. कालांतराने ते स्लँग शद्ध मागे पडतात. तसेच या जाहिरातीच्या क्षेत्रात ज्या शद्धांची उसनवारी होते त्याचे आहे. इतर क्षेत्रात उसनवारी केलेल्या शद्धांची वाटचाल वेगळ्या प्रकारची असते. ते शद्ध मागे पडत नाहीत. असे शद्ध फ्रेंच भाषेत कायमचे स्थान मिळवितात. परंतु तसे करताना त्यांचे स्वरूप इतके बदलून जाते की, मुळात हे शद्ध परकीय आहेत याचा विसर सर्वांना पडतो. या संदर्भात एटीआमब्ल यांनी ब्रेव्हो हा शद्ध अस्सल फ्रेंच शद्ध आहे असे सांगितले. वास्तविक मुळात तो इटालियन शद्ध आहे. एटीआमब्ल सारख्या भाषाशास्त्रज्ञालाही त्या शद्धाचे मूळ विसरायला झाले. आजेज यांचा मुद्दा किती बरोबर आहे हे सांगण्यासाठी हे उदाहरण. काही शद्धांना कालौघात, नव्या संदर्भात, नव्या सांस्कृतिक वातावरणात नवा अर्थ प्राप्त होतो. मुळातला अर्थ पार मागे पडून नवीन अर्थछटा त्या शद्धाद्वारे व्यक्त होऊ लागतात. शद्धांची उसनवारी करणारी भाषा ही तेवढ्या प्रमाणात अधिक 'श्रीमंत' होते.

फ्रेंच भाषेतही हे सध्या घडत आहे. उदा. LE GADGET ल गाजे, LE LOOK ल. लुक हे मुळातले इंग्रजी शद्ध. उसनवारीने ते फ्रेंच भाषेत आले. त्यांना मुळात इंग्रजी भाषेत जो अर्थ होता तो जाऊन फ्रेंच भाषेत नवीनच अर्थ प्राप्त झाला आहे. इंग्रजीत गॅजेट या शद्धाचा अर्थ एक उपकरण असा आहे. सुरुवाती सुरुवातीला फ्रेंच भाषेतही त्याच अर्थाने तो शद्ध वापरला जात होता. आता त्याला आणखी एक अर्थ प्राप्त झालेला आहे. क्लृप्ती या अर्थाने तो आता वापरला जातो. लुक या शद्धाचा अर्थ रूप असा आहे. त्याच अर्थाने तो फ्रेंचमध्ये प्रथम तो गेला, पण आता वैशिष्ट्यपूर्ण रूप हा अर्थ त्याला आला आहे.

इतर भाषांचे एखाद्या भाषेवरील आक्रमण आणि भाषेचे विघटन या दोन्ही मुद्यांबद्दल आणखी एका बाजूने विचार करता येईल. भाषा ही अगदी 'शुद्ध' असू शकते ही एक रम्य कल्पना आहे. त्या कल्पनेला वस्तुस्थितीचा काहीही आधार नाही. गेली अनेक शतके, आपण ज्यांना सुसंस्कृत अशा भाषा समजतो, त्या साऱ्याच भाषांनी एकमेकींना मदत केलेली आहे. सर्वच भाषा तशा संकरीत आहेत. त्यातली एकही भाषा 'शुद्ध' नाही. भाषेत जे बदल होत असतात, त्यावर एका मर्यादित कक्षेतच नियंत्रण ठेवता येते. कोणाला आवडो वा न आवडो, ही वस्तुस्थिती आहे, हे मान्य करायला हवे. सरतेशेवटी भाषेच्या बाबतीत तरी आम जनतेला जे मंजूर तेच होणार हाच नियम आहे. या संबंधात फ्रेंच भाषेतील दोन अगदी अलीकडची उदाहरणे त्यांनी दिली आहेत. या LE SPONSOR आणि LE SPONSORING (ल स्पॉनसोर आणि ल स्पॉनसोरिंग) या शद्धांचे आहे. या दोन्ही शद्धांनाही अस्सल फ्रेंच प्रतिशद्ध तयार करण्यात आले. PARRAIN आणि PARRAINAGE (पारेनाज आणि पॅरॉं). पण फ्रेंच जनतेला हे शद्ध मान्य नाहीत.

त्याचे एक कारण असे असावे की पारेनाज या शद्वास गॉडफादर-प्रतिपरमेश्वर असा अर्थ असल्याकारणाने, त्या शद्वात परमेश्वरसारख्या असलेल्या या अर्थछटेला पैशासारख्या मलीन गोष्टीचा स्पर्श असू नये असे फ्रेंच जनतेला वाटत असावे.

आजेज यांनी असेही सुचविले आहे की भाषा अंतर्गत टापटीप व व्यवस्था या दृष्टीने, विचार करता फ्रेंच भाषेची परिस्थिती इतर भाषांसारखीच आहे. निदान इतर भाषांशी तुलना करता, या बाबतीत तरी वाईट नक्कीच नाही. जे कोणी फ्रेंचभाषिक नाहीत, त्यातले फ्रेंच भाषेचे जाणकार असेही सांगतील की एक वैशिष्ट्यपूर्ण आविष्कार आणि गंभीर अशा संस्कृतीचे फ्रेंच भाषा हे माध्यम आहे; ही त्या भाषेची मोठीच जमेची बाजू आहे. परंतु फ्रान्सबाहेर इतःपर राजनैतिक वाटाघाटी फ्रेंच भाषेत होणार नाहीत. दुसऱ्या महायुद्धापूर्वी त्या होत असत, आता त्या 'अमेरिकन इंग्रजी'त होण्याचा संभव अधिक. तसेच ती विज्ञानाचीही भाषा राहिलेली नाही. आजेज यांचे हे दोन्ही मुद्दे रास्त असेच आहेत. इंग्रजी भाषेत सर्व वैज्ञानिक क्षेत्रातील शोधनिबंध, प्रबंध सातत्याने प्रसिद्ध होतात. त्यांची संख्याही फार प्रचंड असते. जगातील सर्व देशांचा त्यात वाटा आहे. शिवाय हे प्रसिद्ध होणारे शोधनिबंध व प्रबंध, हे त्या-त्या क्षेत्रातील वैज्ञानिकाला लवकरात लवकर आपणास उपलब्ध व्हावेत असे वाटत असते. दुसरे असे की शोधनिबंध व प्रबंध या दोघांच्या साहाय्याने, एका देशातील वैज्ञानिक, हा दुसऱ्या देशातील वैज्ञानिकाशी संपर्क साधतो व संवाद करतो. याच कारणामुळे फ्रेंच वैज्ञानिक हे इतर देशातील वैज्ञानिकांप्रमाणे, इंग्रजी भाषेत आपले संशोधन – शोधनिबंध लिहिण्यास प्रवृत्त होत आहेत, हे असे होणे क्रमप्राप्तच आहे. विज्ञान जागतिक असल्याकारणाने विज्ञानाने, आपली स्वतःची अशी परिभाषा विकसित करावयासच हवी हेही तर्काला धरून आहे. एकदा ही स्पष्ट अशी वस्तुस्थिती ध्यानात घेतली की मग या क्षेत्रात फ्रेंच भाषेची पीछेहाट होणेही क्रमप्राप्तच होते. उदाहरणादाखल गणित हा विषय घेऊ या. जगातले सर्व गणिती एकाच परिभाषेत 'बोलतात'. त्यांच्या विषयाची परिभाषा सर्व जगात एकच आहे. गणिताच्या क्षेत्रात जे घडले ते विज्ञानाच्या इतर क्षेत्रात व शाखांतही घडणार. विशेषतः विज्ञानाचा व्याप ज्या झपाट्याने वाढतो आहे, ते लक्षात घेतल्यानंतर, विज्ञानाची म्हणून एकच भाषा तयार होणार हेही ओघानेच आले. न्यूटन, लायबनिझ या शास्त्रज्ञांच्या काळात युरोपीय वैज्ञानिक लॅटिनमध्येच लिहीत असल्याकारणाने, त्यावेळी हा प्रश्न उपस्थितही झाला नाही. मध्यंतरीच्या काळात, लॅटिनची जागा युरोपमधल्या स्थानिक भाषांनी घेतली. विज्ञान जोवर त्यामानाने संथ गतीने आगेकूच करीत होते, तोवर विज्ञानाची एकच भाषा असावी, हा प्रश्न निकडीचा नव्हता. म्हणूनच वैज्ञानिक आपल्या मातृभाषेत लिहीत. आज विज्ञानाची वाढ फारच झपाट्याने होत असल्याकारणाने, एकाच (वैज्ञानिक) भाषेची गरज उत्पन्न झाली आणि अँग्लो-अमेरिकन इंग्रजीने, ते स्थान झपाट्याने आपलेसे केले. थोडक्यात अँग्लो-अमेरिकन ही आता 'नवी लॅटीन' बनली आहे. जागतिक विज्ञाननगरीची ती भाषा. अमेरिकेचा जागतिक वरचष्मा

हा मुद्दा तितकासा महत्त्वाचा नाही, निदान या बाबतीत तरी नाही. विज्ञानच इतक्या प्रचंड वेगाने विकसित होत आहे की त्यापुढे कोठचाही राजकीय अडसर अथवा जागतिक राजकारण किंवा हे दोनही अडथळे, एकत्रितरीत्या विज्ञानाचा विकास थोपविणे शक्य नाही. आजेज हे वस्तुनिष्ठ दृष्टिकोन पत्करणारे असल्याकारणाने, त्यांना ही वस्तुस्थिती मान्य आहे.

इतका वस्तुनिष्ठ दृष्टिकोन असूनही आजेज यांच्या आशावादी वृत्तीने त्यांना एका बाबतीत चकविले आहे. ते या सर्व प्रश्नाकडे अगदी काटेकोर अशा भाषाशास्त्रीय दृष्टिकोनातून पाहातात. तसे असले तरी ते जेव्हा असे प्रतिपादन करतात की फ्रेंच भाषेला अजूनही आंतरराष्ट्रीय पातळीवर भविष्यकाळ आहे, तेव्हा ते तसे आशावादीच आहेत असे म्हणावे लागते. फ्रेंच साम्राज्यात जे देश होते, ते सर्व जगभर पसरलेले आहेत. या सर्व देशांना एकत्र आणणारी फ्रेंच ही जोडभाषा आहे. त्यामुळे सारा आंतरराष्ट्रीय व्यवहार याच जोडभाषेतून होणार. हा मुद्दा लक्षात घेऊन, फ्रेंच भाषेला अजूनही आंतरराष्ट्रीय भवितव्य आहे हे मान्य करण्यास हरकत नाही. या मुद्यांवरच आजेज भर देतात. FRANCOPHONIE फ्रॉंकोफोनी नावाची फ्रान्समध्ये एक संघटना आहे. त्या संघटनेच्या एकंदर व्यवहारात खूप सुधारणा करण्यास वाव आहे असे आजेज यांचे मत आहे. फ्रेंच सरकारने या बाबतीत खरोखरीच अगदी गंभरपणे लक्ष घालावयास हवे. फ्रेंच सरकारने एकीकडे सर्व ठिकाणची फ्रेंच भाषा ही अखेरीस 'आपलीच फ्रेंच' भाषा आहे असे सांगायचे, पण प्रत्यक्षात फ्रेंच भाषेच्या अभ्युदयासाठी अंदाजपत्रकातील रकमेत कपात करावयाची असे करून चालणार नाही, असे आजेज सांगतात. फ्रेंच भाषेच्या ऐक्यासाठी उगीचच अवास्तव कल्पनाविलास करू नये किंवा हवेत मनोरे बांधू नयेत असेही ते सांगतात. यापुढे जाऊन त्यांनी असे म्हटले आहे की फ्रेंच भाषेच्या दृष्टीने केंद्र असलेल्या पॅरिससारख्या शहरांनी जास्त उदार दृष्टिकोन पत्करला पाहिजे. ग्रामिण बोली (PATOIS) पाटुआ आणि क्रेओलसारखी बोली यांचा त्यांनी – पॅरिसमधील विद्वानांनी आदर करण्यास शिकले पाहिजे. त्यांना त्या स्वतंत्र भाषा आहेत असे समजून योग्य तो मान दिला पाहिजे. खुद्द फ्रान्समध्येही अशाच प्रकारच्या बोलीभाषा व स्थानिक भाषा आढळतातच. त्या सर्वच बोलीभाषांतील व स्थानिक भाषेतले बोलणे, शद्बरचना व वाक्यरचना याचा ढंग वेगवेगळा असतो. आपण त्या सर्वांचा योग्य तो आदर केला पाहिजे, त्याचा तो हक्कच आहे असे आजेज अगदी ठासून सांगतात. खुद्द फ्रान्समध्ये बास्क, ब्रटॉ, प्रोव्हॅसिआल आणि काटालॉं या प्रमुख स्थानिक बोलीभाषा आहेत. आपापल्या स्थानिक अशा लोकसमूहात परस्परांशी संपर्क साधण्यासाठी, जिवाभावाच्या गोष्टी करण्यासाठी, एक प्राथमिक स्तरावरील भाषा या स्वरूपात या बोलीभाषांच्या अस्तित्वास मान्यता देणे अगदी स्वाभाविक व आवश्यक असेच आहे. फ्रॉंकोफोनी ही चांगलाच प्रचंड घेर असलेली छत्री आहे. तिच्या छायेत, अनेक बोलीभाषा, अनेक स्थानिक भाषा, उपभाषा (DIALETES) आणि अनेक संलग्न भाषाही सुखेनैव राहू शकतील. फक्त या सर्वांना पायाभूत

म्हणून 'प्रमाण फ्रेंच' भाषा मान्य केली म्हणजे झाले. अशी व्यवस्था एकदा शिष्टसंमत झाली की मग अनेक व्यक्तींना एकाच वेळी दोन तीन बोलीभाषा, विभागीय भाषा, स्थानिक भाषा, अशा प्रकारच्या भाषासमूहातून सहज संचार करता येईल. भारतात राहणाऱ्या लोकांना आजेज यांचा हा मुद्दा व त्याबद्दलचे विवेचन पटण्यास अडचण पडणार नाही. मराठी भाषेचेच उदाहरण घ्या. या 'प्रमाणभाषे'च्या छत्राखाली अनेक बोलीभाषा, स्थानिक भाषा आहेत. या साऱ्या स्थानिक भाषा आपले अस्तित्व अगदी जोरदारपणे प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करीत असल्या तरी 'प्रमाण मराठी' अशा स्वरूपात मराठी भाषेचे स्थान या बोलीभाषांचे व स्थानिक भाषांचे पुरस्कर्ते नाकारीत नाहीत. म्हणून 'मालवणी नाटके' – महाराष्ट्रातील एका जिल्ह्याची भाषा – ही साऱ्या महाराष्ट्रात लोकप्रिय होतात. हे खरे असले तरी आजेज यांचे सारे प्रतिपादनच तसे आशावादावरती आधारित आहे हे कोणीही सूज्ञ मनुष्य नाकारणार नाही. काही युरोपीय विद्वानांच्या मते आजेज यांच्या युक्तिवादात अनेक त्रुटी आहेत.

आजेज यांचा हा युक्तिवाद एकतर काहीसा स्वप्नाळू आहे. फ्रॉंकोफोनी ही संघटना अनेक वर्षे तग धरून राहील यात शंका नाही, अथवा त्यासंबंधी वादही नाही. परंतु अँग्लो-अमेरिकन इंग्रजीचा दबाव, त्या संघटनेवर दिवसेंदिवस अधिक प्रमाणात वाढणार हेही स्पष्ट आहे. विशेषतः तिसऱ्या जगतातील राष्ट्रे जसजशी विकसित होतील, तस तसे त्या राष्ट्रातील शास्त्रज्ञ, मुत्सद्दी, फ्रान्स सोडून इतर देशांशीही व्यापार करू इच्छिणारा आहेरे वर्ग, थोडक्यात त्या देशातील धुरीण वर्गाला फ्रेंचबरोबरच दुसऱ्या भाषेचे – अँग्लो-अमेरिकन इंग्रजीचे – ज्ञान करून घ्यावेच लागेल. कारण त्यांना एकंदर जागतिक अर्थव्यवस्थेत व समाजव्यवस्थेत आपले स्थान प्राप्त करून घ्यायचे आहे. आणखीही एक मुद्दा येथे लक्षात ठेवला पाहिजे. कोणीही माणूस आपली मातृभाषा व स्थानिक भाषा अगदी सहजपणे बोलतो व आत्मसात करतो हे म्हणणे बरोबर आहे. परंतु या अशा सर्वसामान्य माणसाला द्वैभाषिक होणे हे तितकेसे सोपे नसते. मग त्रैभाषिक होण्याचे सोडाच. अशा प्रकारचे द्वैभाषिक व त्रैभाषिक लोक अधिक अधिक प्रमाणात तयार झाले तर ते हवेच आहेत. पण प्रत्यक्ष व्यवहारात ते तितकेसे शक्य नाही हेही तितकेच खरे. एखाद्या भाषेला आपले आरोग्य निकोप राखण्यासाठी, तीच भाषा बोलणारांचा व लिहिणारांचा, एकभाषिक मानवी समूहाचा आधार लागतो. जितका हा एकभाषिक गट मोठा तितके त्या भाषेचे आरोग्य अधिक निकोप. कोठच्याही भाषेला तीच भाषा बोलणाऱ्या व लिहिणाऱ्या एकभाषिक समूहाचा पाठिंबा असणे आवश्यक असते. नेहमी ज्याचा संदर्भ घेता येईल असे काही साधन उपलब्ध नसेल, वादातीत असा भाषिक मानदंड नसेल, तर द्वैभाषिक व्यक्तीला, आपण ज्या प्रकारे व पद्धतीने, आपली मातृभाषा बोलतो, लिहितो ते प्रमाण भाषेच्या दृष्टीने कितपत बरोबर आहे हेच समजणार नाही. दोन भाषांचा जेव्हा संबंध येतो तेव्हा त्यातली फक्त एकच भाषा बहुसंख्य लोक बोलतात. दोन भाषा बोलणारे त्या मानाने कमी. त्यातही बहुसंख्य जी भाषा बोलत नाहीत तीच फक्त हे द्वैभाषिक बोलतात. याचा अर्थ

एकभाषिक लोक हे भाषेच्या संदर्भात संख्येच्या दृष्टीने अधिक बलवान. कालांतराने द्वैभाषिक त्या बलवान एकभाषिक गटात हळूहळू सामील होतात. त्यांना येत असलेली दुसरी भाषा ते विसरतात किंवा तिच्याकडे दुर्लक्ष करतात. ही दुसरी अल्पसंख्यांकांची भाषा संथगतीने नामशेष होत असते. एक दोन उदाहरणे घेऊन हा मुद्दा अधिक स्पष्ट करून घेण्याचा प्रयत्न करू या. आयर्लंड या देशाचे मध्यवर्ती सरकार राजकीय जोश व भावना यांच्या मदतीने अगदी मोठ्या जिद्दीने EIRE आयर भाषेचे आयर्लंडमध्ये पुनरुज्जीवन करण्यात कायम प्रयत्नशील असते. इतकी वर्षे झाली तरी त्यांच्या प्रयत्नांना यश आलेले नाही. दुसरे उदाहरण भारतातले. पाकिस्तानची निर्मिती झाल्यानंतर लाखो सिंधी हिंदू भारतात स्थलांतर करून आले. ते भारतातल्या अनेक राज्यात जाऊन स्थायिक झाले. थोड्याच दिवसात ते द्वैभाषिक झाले. पण आज सिंधी भाषेची खुद्द सिंधी घरात काय परिस्थिती आहे? ती फक्त बोलीभाषा या स्वरूपातच कशीवशी तग धरून आहे. उदा. महाराष्ट्रात आलेले सिंधी द्वैभाषिकच नाहीत तर त्रैभाषिक, वेळ प्रसंगी चौभाषिक झाले. मराठी - हिंदी - सिंधी - इंग्रजी. ते रोजचा दैनंदिन घरगुती व्यवहार सिंधीत करतात. आज ज्यांचे वय, ८० च्या आसपास आहे त्यांना 'अस्सल' सिंधी बोलता व लिहिताही येते. ७० च्या आसपास असलेल्या व्यक्तींना 'अस्सल' सिंधी फक्त बोलता येते. ६० च्या आसपासच्या सर्वसामान्य सिंधी व्यक्तींना फक्त कामचलाऊ सिंधी बोलता येते. वीस ते तीस वर्षांच्या दरम्यानचे सिंधीभाषिक ती भाषा जेमतेम बोलतात. त्याही पेक्षा तरूण असलेल्यांना ती नीट बोलताही येत नाही. ते फक्त हिंदी - इंग्रजी वेळप्रसंगी मराठी अथवा जी कोठची स्थानिक भाषा असेल तीच बोलतात. विवेचनासाठी, आयर्लंडचे आणि सिंधी यांचे उदाहरण मुद्दामच घेतलेले आहे. भारतात असे सांगण्यात येते की सिंधी भाषेला तिची आपली अशी भूमी नसल्याकारणाने सिंधी भारतातून जवळजवळ नाहीशी होण्याच्या मार्गावर आहे. आयर्लंडमधील आयरिश भाषेला स्वतःची भूमी आहे. त्या भूमीवर राज्य करणारे सरकार, आयर या भाषेला प्रोत्साहन देण्यासाठी सदैव तयार व उत्सुक आहे. असे असूनही त्या भाषेने धरावे तसे मूळ धरलेले नाही. मुद्दा एकच, विशिष्ट भाषा असलेल्या एखाद्या प्रदेशात द्वैभाषिक अल्पसंख्य म्हणून राहात असले, तर त्या प्रदेशात जो एकभाषिक गट बहुसंख्य असतो, त्याचाच वरचष्मा तेथे असतो. जी भाषा बोलणारे लोक एखाद्या प्रदेशात अल्पसंख्येत असतात, ती भाषा, त्या प्रदेशातील द्वैभाषिक लोकांना हळूहळू विसरणे भाग पडते.

काही विचारवंतांच्या मते, सर्वसामान्य मनुष्याची प्रवृत्ती एकभाषिक होण्याकडेच असते. मानवी मेंदूची – अर्थात सर्वसामान्यांची – एकच भाषा आपलीशी करण्याची प्रवृत्ती असते. अगदी फारच जरुरी असली, तर कसल्यातरी दबावाखाली, तो दुसरी भाषा पत्करतो. एकदा बाळपण संपले, की दुसरी भाषा शिकणे फार कष्टाचे असते. त्यासाठी फारच परिश्रम करावे लागतात. वेळप्रसंगी पीडा होईल अशा प्रकारे तडजोडी करणे भाग पडते. द्वैभाषिक घरातील बहुसंख्य

मुले तारुण्यात प्रवेश करताना, ते ज्या समाजात राहातात त्या समाजाची जी भाषा असेल, तीच भाषा सामान्यपणे पसंत करतात. याचे कारण आपल्या स्वतःच्या घराच्याबाहेर, त्यांनी आदर्श मानावे, असे जे त्यांच्याच वयाच्या मुलांचे व तरुणांचे गट असतात, त्यांच्याकडून या द्वैभाषिक मुलांना, तरुणांना पसंती हवी असते. त्यांच्याकडून आपली पाठ थोपटून घेण्याची इच्छा असते. पसंती, हंशा, टाळ्या मिळविणे ही बहुसंख्यांची सहज प्रवृत्ती असते. तिचाच हे द्वैभाषिक तरुण बळी ठरतात. सरतेशेवटी आपले व्यक्तित्व संपूर्ण होण्यासाठी आपण आपले द्वैभाषिक सोडून दिले पाहिजे हे या द्वैभाषिक मुलांना-तरूणांना पटते. अर्थात विचारवंतांच्या या विवेचनाला प्रत्यक्ष प्रयोगांचा आधार नाही हे खरे आहे. पण प्रत्यक्ष व्यवहारात अशी उदाहरणे अनेक आढळतील. भारतातील सिंधी भाषिकांनी आपली सिंधी भाषा विसरावी किंवा त्यांनी ती शिकावी याबद्दल त्यांच्यावर कोणीही सक्ती करीत नाही. मग ते तसे का होते याचे एक संभाव्य उत्तर वरील विवेचनात आहेत. म्हणून दोन भाषा एकत्र आल्या – अगदी भारतीय रूपक वापरावयाचे झाल्यास अगदी सख्ख्या बहिणीप्रमाणे एकत्र आल्या – अथवा त्या एकत्र येऊन राम-लक्ष्मणांप्रमाणे गुण्यागोविंदाने राहातील, एकमेकांस पूरक होतील, त्यांच्यात सुसंवाद असेल अशी अपेक्षा करणेही चुकीचे आहे. त्या ऐवजी बाहेरच्या जगात जीवनसंघर्षाचे जे काही नियम आहेत, तेच नियम जेव्हा दोन भाषा काही कारणाने एकेठिकाणी येतात, तेव्हा विचारात घ्यावे लागतात.

बोली भाषा जी अल्पसंख्य समाजाची भाषा आहे, ज्या भाषेकडे बहुसंख्या नाही, या अशा भाषांचा, प्रवाही अशा आधुनिक जीवनात टिकाव लागणे कठिण आहे. हे वाक्य लिहिणे फारच सोपे आहे. तथापि ही वस्तुस्थिती दुःखदायक आहे, हा नुसता विचारही क्लेशकारक आहे, याबद्दल वादच नाही. अनेक झाडे, पक्षी, प्राणी या साऱ्यांचे राहाण्याचे ठिकाण बदलले अथवा ते मुळातच नाहीसे झाले, तर त्या सर्वांवर जो समूळ नाशाचा प्रसंग ओढवेल त्यासारखेच हे आहे. या सर्व विवेचनाचे सार एकच. परस्परांशी संपर्क साधणे आता जागतिक पातळीवर शक्य झाले आहे. व्यक्ती-व्यक्तीत, व्यक्तीगट, व्यक्तीसमूह, समूह-विभाग, विभाग-राज्य अशा क्रमाने संपर्क उत्क्रांत होत होता. आता तो जागतिक पातळीवर येऊन ठेपला आहे. अशा परिस्थितीत, या जगात ज्या भाषा महान व प्रमाण आहेत, ज्यांच्याकडे अत्यंत बळकट अशी शैक्षणिक पद्धती आहे, त्याच भाषा फक्त तग धरून राहातील. अँग्लो-अमेरिकन इंग्रजी भाषेसारखी आंतरराष्ट्रीय भाषा ही तशी ढिसाळ भाषा आहे. तिला एक केंद्र नाही, हे खरे आहे. तसे असले तरीही अमेरिकन-इंग्रजीशिवाय बाकीच्या भाषांचे भवितव्य तसे खडतरच आहे. या महान व प्रमाण भाषात फ्रेंच भाषेला जरूर स्थान आहे. ती इंग्लिश-इंग्रजीशी तुलना करता अधिक लवचिक भाषा आहे हेही मान्य करावे लागेल. फ्रेंच भाषेशी तुलना करता जागतिक अमेरिकन-इंग्रजीची, इंग्लिश-इंग्रजी ही एक बोलीभाषा ठरण्याचा संभव अधिक आहे. मुळात इंग्लंडहून अमेरिकेत इंग्रजी गेली. आता अमेरिकन-

इंग्रजी हीच मूळ इंग्रजीला वाकुल्या दाखवू लागली आहे. एखाद्या छोट्या कुत्र्याची शेपूट चांगली मली मोठी व्हावी आणि तसे झाल्यानंतर त्या शेपटीची जोरजोराने हालचाल करून त्या छोट्या कुत्र्याने हुषारी दाखवावी तसेच हे थोडेसे आहे. सध्यातरी याबद्दल निश्चित भविष्य वर्तविणे कठिण आहे. फ्रेंच अथवा इंग्लिश-इंग्रजी या दोहोंपैकी कोणाची अवस्था भविष्काळात अधिक दयनीय असेल हे छातीठोकपणे आज तरी कोण सांगू शकेल?

फ्रेंच भाषेच्या भवितव्याचा प्रश्न फ्रान्ससमोर आहे. तशीच परिस्थिती भारतातही आहे. प्रत्येक भारतीय भाषेला (काही प्रमाणात हा प्रश्न हिंदी भाषेसमोर नाही) त्याच प्रश्नाला सामोरे जावे लागत आहे. मराठीची पीछेहाट होते आहे. इंग्रजीचा वरचष्मा दिवसेंदिवस अधिक मोठ्या प्रमाणात वाढतो आहे. पालक आपली मुले इंग्रजी माध्यमाच्या शाळेत पाठवितात. इत्यादि तक्रारी आपण नेहमी वाचतोच. आजेज या फ्रेंच भाषाशास्त्रज्ञाने, फ्रेंच भाषेचा प्रश्न जसा वस्तुनिष्ठ दृष्टिकोनातून तपासून पाहिला, तसेच मराठी भाषेबद्दल एखाद्या मराठी भाषाशास्त्रज्ञाने करावयास हवे. मराठीची पीछेहाट होते आहे म्हणजे नेमके काय झाले आहे? मराठीला वाचवा असे म्हणणाऱ्यांच्या मताने मराठीचा अभ्युदय व्हावा यासाठी काय व्हायला हवे? फ्रेंच भाषेसारख्या एका प्रमुख व समर्थ भाषेला विज्ञानाच्या क्षेत्रात माघार घ्यावी लागली आहे हे लक्षात घेऊन, विज्ञानाच्या क्षेत्रात तरी इंग्रजीचे प्रभुत्व राहाणार हे मराठी भाषाभिमान्यांनी मान्य केले पाहिजे. त्यासाठी जे कोणी शास्त्रज्ञ होऊ इच्छितात, गणिती होण्याचा ज्यांचा मानस आहे, त्यांना जगातील त्या त्या क्षेत्रातील विद्वानांचे विचार जाणून घ्यावे लागतील. त्यांच्याशी वाद-संवाद करावा लागेल. हे करण्यासाठी इंग्रजीचे चांगले ज्ञान असणे आवश्यक आहे. इंग्रजी हटाव ही घोषणा कितीही सुखावणारी असली तरी ती व्यवहारी नाही. फ्रेंच भाषेबाबतीत आलेला अनुभव हेच आपणास सांगतो. आजेज यांच्या विवेचनाच्या अनुषंगाने आणखी एक मुद्दा येऊन गेला आहे. दोन-तीन भाषांची स्पर्धा ज्यावेळी होते, त्यावेळी काय घडण्याची शक्यता आहे? मराठी भाषेला हिंदी व इंग्रजी या दोन भाषांबरोबर स्पर्धा करावी लागते. हिंदीबरोबरची स्पर्धा जाणवत नाही, इंग्रजीबरोबरची जाणवते. त्याचे एक मुख्य कारण असे असावे की हिंदी ही आपली भाषाभगिनी आहे व मराठी ही काही झाले तरी अनेक बाबतीत हिंदीपेक्षा प्रगत भाषा आहे, असा अहंकार मराठी मनात असणे शक्य आहे. ती भाषा-भगिनी असल्याकारणाने मराठीवर तिचे आक्रमण होणे कठीण व मराठीचे विघटनही त्या भाषेकडून होणार नाही असा विश्वास मराठी भाषिकांना असावा. म्हणूनच मुख्य तक्रार इंग्रजीविरुद्ध. इंग्रजीचे मराठीवर आक्रमण होते आहे ही ओरड त्यासाठीच. दक्षिणेत आणखीनच वेगळी परिस्थिती. तामिळभाषिकांना, हिंदी भाषेचे तामिळवर आक्रमण चहूबाजूंनी होत आहे अशी भीती वाटते. त्यांना तसे वाटत असल्यास त्यात गैर काहीच नाही. फ्रेंच भाषेच्या उदाहरणावरून ती भीती रास्तच आहे हे कोणीही मान्य करील. म्हणूनच तामिळभाषिक, आपल्या भाषेच्या बाबतीत फारच हळवे झाले आहेत असे

कोणी समजू नये. तामिळ माणसाला रोजच्या व्यवहारात एक गोष्ट अगदी स्पष्टपणे दिसते. व्यापार-उदिम करून मोठे व्हावयाचे असेल, तर हिंदी आल्यावाचून गत्यंतर नाही. ती येत नसेल तर भारतातील इतर राज्यांबरोबर व्यापारीसंबंध विकसित होणे कठिण. हे जाणण्याइतके ते चतुर खासच आहेत. भारतातील आम जनतेत लोकप्रिय व्हायचे, तर हिंदी बोलपटातच काम केले पाहिजे. वृत्तपत्र, आकाशवाणी, दूरचित्रवाणी, बोलपट, या सर्व साधनांकरवीही हिंदीने तामिळनाडूच्या कानाकोपऱ्यात अगदी हलक्या पावलाने प्रवेश केला आहे, अगदी ती त्यांच्या घरातील चुलीपर्यंत पोचली आहे. हिंदीभाषिक यातले काहीही बुद्धीपुरस्सर करीत नाहीत. परिस्थितीच तशी आहे. फ्रेंच भाषेचे उदाहरण हेच सांगते. फ्रेंच भाषेच्या उदाहरणाबद्दल भारतातील हिंदी सोडून सर्व भाषांनी एकच खूणगाठ मनात बांधावी. या सर्वच भाषांचे आजच्या जगात भवितव्य तसे कठीणच आहे.

— *डॉ. मंगला सरदेशपांडे*

---

## २) राष्ट्रभाषेचा जन्म

*"राष्ट्रवाद हा बालीशपणा, राष्ट्रवाद म्हणजे मानवजातीला आलेल्या कांजिण्या."*

**— अल्बर्ट आइनस्टाइन**

### लेखकाचे निवदेन

नेशन्स अँड नॅशनॅलिझम (लेखक इ. जे. हॉब्सबॉम) या ग्रंथातील विचारा-आधारे हा लेख तयार केला आहे. राष्ट्रभाषेच्या उगमाबद्दल ग्रंथकर्त्याने स्वतःचे विचार मांडले आहेत. हे विचार म्हणजे त्रिकालाबाधीत सत्ये नसून ते राष्ट्रभाषेच्या उगमासंबंधीचे अंदाज! बऱ्याच विचाराअंती हे अंदाज केले असल्यामुळे ते संकल्पनात्मक आहेत, पाश्चात्य इतिहासातील उदाहरणे देत ते मांडले आहेत. तशी भाषाशास्त्रीय उदाहरणे भारतीय भाषांच्या संदर्भातही सापडू शकतील. या लेखातील संकल्पना जशाच्या तशा भारतीय भाषांना लावणे हा उद्देश नाही, पण या संकल्पनांमुळे भारतीय भाषांबद्दलच्या विचारांना एक निराळी दिशा मिळेल असा मूक विचार हा लेख लिहिण्यामागे आहे. वर दिलेल्या आइनस्टाइनच्या वचनातील आशय राष्ट्रभाषा — राज्यभाषा यांनाही लागू आहे. भाषेबद्दलच्या अतिरेकी अभिनिवेशाला आळा घालण्यास भाषांचा इतिहास उपयोगी पडेल असेही वाटते.

नॅशनॅलिझम (राष्ट्रवाद) या संकल्पनेचा उदय १९व्या शतकात झाला. राष्ट्रवादाचा एक घटक म्हणजे राष्ट्रभाषा. राष्ट्रभाषेच्या उगमाबद्दल विचार मांडताना लेखकाने भाषेचे भाषाशास्त्रीय प्रकार सांगितले आहेत. भाषा आणि तिची रचना यांच्या शास्त्रीय अभ्यासाचा उगम भारतात ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकात झाला. त्या कामी भारतात भाषेच्या व्याकरणीय विश्लेषणाची समृद्ध परंपरा होती. याचे उत्तम

उदाहरण म्हणजे पाणिनीचा व्याकरणविचार! परंतु भारतात उगम पावलेल्या भाषा-विज्ञानाचा प्रभाव पाश्चिमात्य देशांवर पडण्यास एकोणिसावे शतक उजाडले. आता भाषाविज्ञान तेथे खूपच विकसीत झाले आहे. भाषाविज्ञानातील ज्या संज्ञा या लेखात वापरल्या आहेत त्यांची रेखाटने पुढे दिली आहेत.

**अर्गाट** — वर्गबोली. प्रादेशिक समाजातील विशिष्ट जातीजमाती जी भाषा बोलतात त्यांना वर्गबोली म्हणतात.

**वरनॅक्युलर** — हा शब्द वास्तुशास्त्रातून (आर्किटेक्चर) आला आहे. इमारत बांधण्याची पारंपारिक देशी पद्धती असा या शब्दाचा अर्थ. ही पद्धती मुद्दाम शिकवली जात नाही. ती मागच्या पिढीकडून पुढच्या पिढीकडे दिली जाते. हा शब्द भाषाशास्त्रात देशीभाषा किंवा बोलीभाषा म्हणून वापरला जातो. वरनॅक्युलरचा वास्तुशास्त्रातील अर्थ कळल्यास तो भाषाशास्त्रात कशा अर्थाने वापरतात हे समजणे सुलभ होते. वरनॅक्युलर म्हणजे बोलीभाषा, जी मुद्दाम शिकवावी लागत नाही. ती मागच्या पिढीकडून पुढल्या पिढीकडे आपोआप दिली जाते. मराठीच्या विविध बोली आहेत त्या 'वरनॅक्युलर' मध्ये मोडतात.

लिंग्वा फ्रँका म्हणजे जनभाषा किंवा संपर्काची भाषा. राष्ट्रभाषा ही दरवेळेला संपर्काची भाषा असतेच असे नाही. वेगवेगळ्या बोलीभाषेचे लोक जेव्हा एका समाजात राहातात तेव्हा एकमेकांना व्यवहारात समजून घेण्यासाठी जी सामाईक भाषा वापरतात त्याला लिंग्वा फ्रँका म्हणतात. एकमेकांना समजून घेण्याची ती एक पद्धती असते. इटालियन व फ्रेंच यांच्या मिश्रणाने तयार झालेली भाषा हे त्याचे उदाहरण आहे. ग्रीक, स्पॅनिश व अरेबिक यांच्या मिश्रणाने तयार झालेली भाषा लेव्हांट भागात वापरतात. लेव्हांट म्हणजे मेडिटेरेनियनचा पूर्वेचा भाग मोडतात. 'जनभाषेला' भौगोलिक कारणे असतात हे वरील उदाहरणाने स्पष्ट होईल.

मुंबईत बोलली जाणारी हिंदी, मुंबईत बोलली जाणारी इंग्लिश हिला हिंग्लीश म्हणता येईल, या मिश्र भाषा आहेत. पण त्या जनभाषा किंवा संपर्काच्या भाषा आहेत.

**मदरटंग** — जन्माने प्राप्त झालेली भाषा. ही भाषा आईकडून मुलाला मिळते. येथे आई शिक्षित का अशिक्षित, साक्षर का निरक्षर हा प्रश्न नसतो. याला मराठीत मातृभाषा, मायबोली ही संज्ञा आहे.

इंग्लिशमध्ये मदरटंगचा दुसराही अर्थ आहे. ज्या भाषेपासून इतर भाषा निर्माण होतात अशा अर्थानेसुद्धा 'मदरटंग' हा शब्द इंग्रजीत वापरला जातो. पण त्याचे रूपांतर मराठीत 'भाषाजननी' असे होईल. भारतीय भाषांची संस्कृत ही भाषाजननी आहे.)



अनुक्रमणिका

## मातृभाषा — राज्यभाषा — एक नूतन दृष्टिकोन

आधुनिक जगतातील राष्ट्र या संज्ञेशी दोन गोष्टी निगडीत आहेत. भाषा व वांशिकता! यातील भाषा हा राष्ट्राच्या व्याख्येत महत्त्वाचा पैलू. भाषातज्ज्ञांनी याबद्दल उद्‌बोधक विचार मांडले. भाषा एकमेकांना जोडते तशी तोडते. या भाषेपायी कितीतरी तंटेबखेडे, आंदोलने भारतात झाली आहेत व होत असतात. या आंदोलनांची परिणती होऊन भाषावार प्रांतरचना झाली. तरीसुद्धा डोक्यावर मुकुट घातलेली मराठी, फाटक्या वस्त्रानिशी राजदरबारी वावरत आहे असे साहित्यिक — विचारवंतांना वाटते. हिंदी राष्ट्रभाषा असली तरी दक्षिणेत त्या भाषेतून बातम्यासुद्धा दिल्या जात नाहीत. भाषेबद्दल अशी गोंधळात टाकणारी परिस्थिती आपण अनुभवत असतो. त्यामुळे भाषेबद्दलचे कितीतरी प्रश्न मनात येतात. राष्ट्रभाष, राज्यभाषा, निर्माण झाली कशी? माणसाची अस्मिता म्हणजे त्याची मातृभाषा — लोकसमूहाच्या भावनांचा डोंब उसळवणारी ही भाषा! मातृभाषा, राज्यभाषा, राष्ट्रभाषा, यांचा परस्परसंबंध कसा असतो हे तपासून पाहिल्यास भाषेबद्दलच्या भ्रामक समजुती दूर होतील.

**बावेलचा मनोरा** — भाषा हे लोकसमूहाचे व्यवच्छेदक लक्षण. भाषेमुळे ते व आपण असे दोन तट पडतात. साजुक सजवलेली भाषा बोलणारे ते सुसंस्कृत, तर नुसते आवाज काढून एकमेकांशी संवाद साधणारे ते रानटी असा भेद केला जातो. शद्बाच्या उच्चारावरून तो मित्र का शत्रू हे सुद्धा ठरवतात. या संदर्भात बायबलमध्ये एक पुराणकथा आहे. बावेलच्या मनोऱ्याची कथा. बावीलॉनला हिब्रू शद्ब बावेल. नाना भाषांचा उगम कसा झाला याबद्दलची ही पुराकथा. पुराणात ही घटना बावीलॉन (बाबेल) मध्ये घडते.

पुरातनकाळी सबंध मानवजात एकच भाषा बोलत असे. आता भटकंती नको एकाच जागी स्थिर व्हावे असा विचार करून या एकभाषीय लोकांनी सुमेर नगरीत कायम वस्ती करण्याचे ठरविले. भविष्यात आपले नाव होईल असा उंच मनोरा नगरात बांधायचा असा त्यांचा निर्धार होता. त्यासाठी विटा, इमारतीचे सामानसुमान त्यांनी तयार केले. मनोरा इतका उंच बांधायचा की त्याचा वरचा मजला स्वर्गात पोचला पाहिजे अशी सर्वांची इच्छा. देव स्वर्गातून हे सर्व बघत होता. माणूस जर एकच भाषा बोलेल, तर त्याची एकजूट राहील व तो काय वाटेल ते करेल, अशक्य ते शक्य करेल, त्याची इच्छा असेल ते तो प्रत्यक्षात आणेल, असे देवाच्या लक्षात आले. देव मनात म्हणाला हे काही बरोबर नाही. माणसाची ही शक्ती देवालासुद्धा भारी पडायची. म्हणून देवाने केली युक्ती व माणसाच्या वाणीत गोंधळ निर्माण केला. माणूस निरनिराळ्या भाषा बोलू लागला. त्याची एकी मोडली. माणूसजात पृथ्वीच्या पाठीवर विखुरली गेली. नाना भाषा बोलणारे लोकसमूह एकमेकाविरुद्ध उभे ठाकले. बावेलचा मनोरा मनोरथ ठरले! माणसाची दुफळी, देवाची सरशी, बावेलचा मनोरा कधी पुरा झाला नाही. या पुराकथेत एक गमतीदार दाखला आहे. 'शिबोलेथ' या शद्बाचा योग्य उच्चार करणारे

ते मित्र व अयोग्य उच्चार करणारे ते शत्रू! अशी ही बावेलच्या मनोऱ्याची व बहुविध भाषांमुळे शत्रू व मित्र कसे तयार होतात हे दाखवणारी पुर कथा.

**भाषा व राष्ट्र** — जेव्हा आपण नवख्या प्रदेशात जातो, आपल्याला तेथील भाषा येत नसते अशावेळी त्या प्रदेशातील लोकांशी संवाद साधणे कठीण जाते. अशा वेळी भाषा ही विभागणारी रेषा ठरते. परप्रांतात गेल्यानंतर असे घडते हे आपण समजू शकतो. पण एकाच प्रदेशातील समाजात राहाणाऱ्या निरनिराळ्या वर्गांमध्ये सुद्धा असे घडते. याला कारण प्रत्येक वर्गाची निराळी भाषा! विशिष्ट वर्गबोलीमुळे एका सांस्कृतिक समूहात उपसांस्कृतिक समूह तयार होतात. एकमेकांजवळ राहाणारे लोकसमूह निरनिराळ्या भाषा बोलणारे असतील तर ते परस्परांना वेगळे समजतात. मुंबईत राहाणारे मराठी भाषिक व गुजराथी भाषिक एकमेकांना वेगळे समजतात. पण खरं पाहाता हा काही वादाचा मुद्दा नाही. भिन्न भाषा बोलणारे एकमेकांची भाषा समजू शकत नाहीत, ते एकमेकांना वेगळे समजतात एवढयावर हा प्रश्न थांबत नाही. भाषेच्या भिंतींनी विभागलेल्या समूहांना वेगवेगळी राष्ट्रीयता प्राप्त होईल का? त्यांना नुसत्या भाषेच्या निकषावर राष्ट्र म्हणून स्थान मिळेल का? भाषेमुळे राष्ट्र निर्माण होते, का राष्ट्रामुळे भाषा हा खरा वादाचा मुद्दा आहे. याचे उत्तर शोधण्याकरता आपल्याला ज्ञानाच्या निराळ्या प्रदेशात भटकंती करावी लागेल. देशीभाषेचे गुणविशेष कोणते? विशिष्ट समूहाचा घटक होण्यासाठी व्यक्तीची भाषा हा कसा महत्त्वाचा निकष ठरतो, या विविध मुद्यांचा शोध घ्यायचा आहे.

अलिखित देशीभाषा म्हणजे बोलीभाषा! या बोलीभाषा गावागावात बदलतात. प्रत्येक बारा कोसावर पाणी आणि वाणी बदलते असं म्हणतात याला अर्थ आहे. गावागावातील भौगोलिक सुगमतेवर बोलीभाषेतील साम्य व भेद अवलंबून असतात. डोंगराळ प्रदेशातील निरनिराळ्या बोलीभाषांमध्ये इतका फरक असतो की या भाषा विभिन्न भाषिक कुटुंबातील (लिंग्विस्टिक फॅमिली) आहेत की काय असा संभ्रम पडतो. या प्रदेशातील दुर्गमता हे याचे महत्वाचे कारण आहे. जर्मन भाषा युरोपातील काही देशात बोलली जाते. आजही बर्लिनमधील सुशिक्षत जर्मन माणसाला स्वित्झरलंडमधील जर्मन बोली समजणे कठीण जाते. लिखित भाषेच्या प्रसाराला भौगोलिक अंतर व अडथळे आड येत नाहीत. पुस्तके इकडून तिकडे केव्हाना केव्हातरी पोचतात. पण बोलीभाषा एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी पोचण्यासाठी माणसेच पोचावी लागतात. यासाठी प्रदेशाची दुर्गमता वा सुगमता, वाहनांच्या सोयी, दोन गावातील देवाण-घेवाण अशा अनेक गोष्टी कारणीभूत ठरतात.

बोलीभाषेचा इतिहास तपासून बघितला तर बोलीभाषांतून भाषेचे इतर प्रकार कसे निर्माण झाले हे समजणे सोपे होईल. सार्वजनिक प्राथमिक शिक्षण सुरू होण्यापूर्वीचा कालखंड बघूया. त्या कालखंडात राष्ट्रभाषा नव्हती. कारण राष्ट्र ही संकल्पना नव्हती. या कालखंडाकडे बघताना विसाव्या शतकातील 'राष्ट्र' या

संकल्पनेचा चष्मा काही काळासाठी काढून ठेवला पाहिजे. त्या काळी राष्ट्र ही संकल्पना नव्हती, म्हणजे राज्यशासन नव्हते, राज्यांच्या सीमा नव्हत्या असा अर्थ नाही. त्याकाळी बोलीभाषा होत्या पण लिखित प्रमाणभाषा नव्हती. राज्यशासनासाठी त्या भौगोलिक भागातील सर्व लोकांना समजतील असे शासकीय वाक्प्रचार तयार केले होते. हीच जनभाषेची वा संपर्कभाषेची सुरुवात होती. एकाच प्रदेशातील विविध बोली बोलणारे लोकसमूह एकमेकांशी संवाद साधण्यासाठी अशी संपर्कभाषा वापरत असावेत. धार्मिक प्रवचन करणारे, कविता-गाणी गाणारे, यांना निरनिराळ्या भागात जाण्याची वेळ येई; आपले विचार विविध बोली बोलणाऱ्यांपर्यंत पोचण्यासाठी अशी संपर्कभाषा ते वापरत असावेत. या संपर्क भाषेचा परीघ भौगोलिक परिस्थितीप्रमाणे बदलत असे. अभिजनांसाठी हा परीघ विस्तृत असे, कारण दूरवर प्रवास व व्यवहार करण्याची त्यांची क्षमता इतरजणांपेक्षा जास्त होती. शेतकरी, मजूर यांच्या भाषेच्या सीमा त्या मानाने संकुचित होत्या. या सर्व गोष्टी लक्षात घेतल्या म्हणजे कोणत्याही मोठ्या भौगोलिक प्रांतासाठी (ज्याचे पुढे राष्ट्र झाले) राष्ट्रभाषेचा उगम फक्त बोलीभाषेतून झाला असावा हे शक्य वाटत नाही. विविध बोलीभाषांतून एक जनभाषा किंवा संपर्कभाषा (लिंग्वा फ्रँका) तयार झाली असावी व त्याचे रूपांतर राष्ट्रभाषेत झाले असावे असे गृहीतकृत्य तर्काला धरून आहे असे वाटते. बोलीभाषा म्हणजे वरनॅक्युलर लँग्वेज. ही बोलीभाषा मूल आईकडून बोलण्यास शिकते म्हणजेच ती मातृभाषा असते. ही 'मातृभाषा' जशीच्या तशी राष्ट्रभाषा होत नाही, असा वरील विवेचनाचा सुलभ व स्पष्ट अर्थ आहे. 'माझी मातृभाषा हीच राष्ट्रभाषा झाली पाहिजे' किंवा 'राष्ट्रभाषा ही मातृभाषा असते' असा सर्वसामान्य समज असतो, त्याला धक्का देणारा वरील विचार आहे!

राष्ट्रभाषा या बहुतेक वेळा निमकृत्रिम असतात. कधी कधी एखादी आधुनिक राष्ट्रभाषा नव्याने तयार केलेली असते. नव्याने तयार केलेल्या राष्ट्रभाषेचे आधुनिक हिब्रू हे एक उदाहरण आहे. मातृभाषा हीच राष्ट्रभाषा. मातृभाषा हा राष्ट्रीय संस्कृतीचा पाया असतो, राष्ट्रीय मनाचा मातृभाषा हा आधार असतो, असे राष्ट्रीय पुराणात सांगितले जाते, पण भाषेच्या उत्क्रांतीचा अभ्यास केला तर मात्र या विरुद्ध गोष्टी आढळतात!

**बोली व प्रमाणभाषा** — बहुविध बोलीभाषातून एक प्रमाणभाषा निर्माण करण्यासाठी झालेले प्रयत्न इतिहासात दिसतात. एकदा प्रमाणभाषा तयार झाली म्हणजे त्या देशातील वा भौगोलिक प्रदेशातील इतर बोलींना निम्न स्थान मिळते. बहुविध बोलीतून कोणती बोली प्रमाणभाषेसाठी निवडावयाची हा मुख्य प्रश्न असतो. त्या भाषेचे प्रमाणक ठरवणे, ती भाषा एकजिनसी कशी होईल याचा विचार करणे, त्याचे शुद्धलेखन व व्याकरण तयार करणे, नवीन शब्द तयार करून शब्दसंख्या व शक्ती वाढवणे हे प्रश्न दुय्यम असतात.

युरोपमधील बहुतेक भाषांचा इतिहास पाहिला तर त्याला प्रांतीय बोलीचा

पाया असतो असे आढळते. लिखित प्रमाण बल्गेरियन भाषा पश्चिम बल्गेरियन बोलीवरून घेतली आहे. प्रमाण युक्रेनियन भाषा युक्रेनच्या आग्नेय भागातील बोलीवरून केली आहे. लिखित हंगेरियन १६व्या शतकातील विविध बोलीभाषांवरून गुंफली आहे. प्रमाणभाषेसाठी कोणती बोली निवडावयाची हा निर्णय कधीकधी राजकीय असतो किंवा त्याचे बरेच राजकीय धागेदोरे असतात. आटापिटा करून तयार केलेली राष्ट्रभाषा सर्व देशभर वापरली जाईलच असेही ठामपणे सांगता येत नाही. नॉर्वेची राष्ट्रभाषा हे याचे उदाहरण आहे. कसे ते पाहा – एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकात नॉर्वेमधील राष्ट्रवादी मंडळींनी शुद्ध नॉर्वेजियन भाषेचा आग्रह धरला. त्यांना डॅनिश प्रभावाची नॉर्वेजियन भाषा नको होती. या लोकांच्या विनंतीला मान देऊन नायनॉर्स्क ही नवीन डॅनिश प्रभाव विरहीत भाषा तयार करण्यात आली. नॉर्वे स्वतंत्र झाल्यानंतर नायनॉर्स्क भाषेला अधिकृत पाठिंबा असून सुद्धा ही नॉर्वेची प्रमुख भाषा झाली नाही. संबंध नॉर्वेत फक्त २० टक्के लोक (पश्चिम व मध्य नॉर्वेतील लोक) नायनॉर्स्क भाषा वापरतात. १९४७ पासून नॉर्वे हे द्विभाषिक राष्ट्र आहे. तेथे दोन लिखित भाषा वापरल्या जातात. अल्प प्रमाणात वापरली जाणारी नायनॉर्स्क ही राष्ट्रभाषा व बहु प्रमाणात वापरली जाणारी डॅनिश प्रभावाची नॉर्वेजियन भाषा! नॉर्वेसारख्या आकाराने छोट्या देशात हे घडते. भारतासारख्या आकाराने मोठ्या, लोकसंख्येने प्रचंड, बहुभाषिक देशात भाषेबाबत गोंधळ झाला तर नवल नाही.

फ्रान्स व इंग्लंडमधील प्रमाणा भाषांचा इतिहास पाहिला तर या दोन्ही देशात शाहीशासनाने जी बोली वापरली त्याच बोलीपासून या देशात प्रमाण लिखित भाषा तयार झाली.

प्रमाणभाषा तयार होण्याच्या प्रक्रियेत आणखी कोणते प्रश्न निर्माण होतात ते पाहू. जगभरच्या बहुतेक भाषांना या प्रश्नांना सामोरे जावे लागते. डच, जर्मन, झेक, आइसलॅंडर्स, आणि इतर कितीतरी देशातील लोकांना राष्ट्रभाषा शुद्ध व असंकरित असावी असे वाटते. राष्ट्रभाषा शुद्ध ठेवण्यासाठी ते हिरीरीने प्रयत्न करतात. याला भाषाशास्त्रीय राष्ट्रवाद म्हणता येईल. जर्मन वैज्ञानिक ऑक्सिजन हा शद्ब वापरत नाहीत 'साउसस्टॉफ' असा जर्मन प्रतिशद्ब त्यांनी तयार केला आहे. मराठीत ऑक्सिजनला प्राणवायू म्हणण्यासारखा हा प्रकार! पण आता आपण ऑक्सीजन, हायड्रोजन, सोडियम याचे भाषंतर न करता ते शद्ब तसेच मराठीत वापरतो व ते योग्य आहे. फ्रेंच भाषेत सुद्धा इंग्लिश शद्बांनी प्रवेश केला आहे. फ्रेंच भाषेच्या रक्षणकर्त्यांना फ्रेंच 'फ्रॅंग्लीश' होऊ नये असे वाटते व त्यासाठी ते सतत प्रयत्नशील असतात.

जेव्हा एखाद्या छोट्या संस्कृतीची भाषा (उदा. हिन्दू संस्कृतीची संस्कृत मराठी. येथे छोट्या याचा अर्थ प्रभावाने छोट्या. आज युरोपीय संस्कृती ही प्रभावाने मोठी संस्कृती मानली जाते) उच्च शिक्षणाची, आधुनिक तंत्रज्ञान, विज्ञान, अर्थशास्त्र,

यांची वाहक बनू पाहाते, तेव्हा या भाषेपुढे महत्त्वाचे प्रश्न उभे राहातात. वानगीसाठी वेल्श भाषा पाहू. वेल्श भाषेचा उगम सहाव्या शतकात झाला. वेल्श ही जुनी व जिवंत लिखित भाषा आहे असा पुरावा वेल्श लोकांकडे आहे. १८४७ साली या वेल्श भाषेबद्दल जेव्हा वेल्श लोकांनी विचार केला, निरीक्षणे केली तेव्हा त्यांना वेल्श भाषेतील त्रुटी लख्खपणे दिसल्या. आधुनिक काळातील राजकीय नूतन संकल्पना, विज्ञानातील सोप्या संकल्पना (इंग्लिश न येणाऱ्या) बुद्धिमान वेल्श माणसाला सहज समजतील अशा तऱ्हेने वेल्श भाषेतून सांगता येत नाहीत असे त्यांना आढळून आले. आधुनिक ज्ञान-विज्ञानातील संकल्पना दुसऱ्यापर्यंत पोचवण्यास जुनी भाषा जरी जिवंत म्हणजे वापरात असली तरी ती अपुरी पडते. त्यात नव्या शब्दांची भर टाकावी लागते. भाषेच्या शुद्धतेबद्दलच्या कल्पना बदलाव्या लागतात.

मराठीला हे तंतोतंत लागू आहे. वैद्यकीय महाविद्यालयासाठी मराठी भाषेत शरीरशास्त्रावरील प्रमाण पाठ्यपुस्तक इंग्रजी पाठ्यपुस्तकाच्या तोडीचे तयार करावयाचे म्हटले तर ते आज शक्य नाही. मराठीची तशी ताकद आज तरी नाही. मराठीला लांबचा पल्ला गाठावयाचा आहे. हा मराठीचा दोष नाही. ज्ञान-विज्ञानातील नूतन संकल्पना, जुनी भाषा जरी जिवंत असली तरी त्या भाषेतून सांगणे वा मांडणे कठीण असते हा सिद्धांत सत्य आहे व तो मराठीलाही लागू आहे.

**राष्ट्रभाषेची संकल्पना** -राष्ट्र, राष्ट्रीयत्व, राष्ट्रवाद व राष्ट्रभाषा यांच्या परस्परसंबंधांचा इतिहास बोधक आहे. राज्यकर्ते, शासनकर्ते व समाजातील साक्षर मंडळी यांच्यासाठी भाषा हा राष्ट्रीयत्वाचा महत्त्वाचा निकष असतो. बहुजन समाजासाठी भाषा हा राष्ट्रीयत्वाचा महत्त्वाचा निकष होत नाही. याला इतिहास साक्षीदार आहे. इतिहासात अशी कितीतरी उदाहरणे सापडतात की ज्या वेळी नाना बोली बोलणारे लोक एकत्र राहात होते. त्यांची परस्पर जीवनव्यवहाराची भाषा वेगळी होती व समूहान्तर्गत बोलण्याची भाषा निराळी होती. समूहाचा घटक होण्याचा भाषा हा एक निकष होता, एकमेव निकष नव्हता. संस्कृतीचे विविध पैलू त्यापैकी भाषा ही एक! परंतु राष्ट्राच्या आधुनिक व्याख्येत भाषेला मध्यवर्ती स्थान दिले गेले व भाषेला मिळालेल्या या भडक रंगामुळे सर्वसामान्यांच्या भाषेबद्दल तसाच समज झाला.

बेनेडिक्ट अँडरसन यांनी राष्ट्रवादाचा उगम व प्रसार या संदर्भात भाषेबद्दल मौलिक विचार मांडले आहेत. ज्यावेळी एखाद्या भागात राष्ट्रीय संलग्नतेचा आरंभ होत असतो व राष्ट्र या संकल्पनेचे अंकुर फुटत असतात, त्यावेळी भाषा हा राष्ट्राच्या बांधणीतील महत्त्वाचा घटक असतो. राष्ट्र ज्या भौगोलिक प्रदेशात उभे राहात असते तेथे विविध बोली बोलल्या जात असतात. पण तेथे राहाणारे अभिजन एक लिखित व शासकीय भाषा वापरत असतात. खरे पाहाता ही भाषा वापरणारे अभिजन संख्येने कमी असतात; असे असून सुद्धा ही भाषा राष्ट्रभाषेसाठी निवडली जाते. अल्पसंख्य अभिजनांचे राजकीय वजन व बल यामुळे त्यांची बोली राष्ट्रभाषा होते. याची इतिहासातील उदाहरणे पाहा.

फ्रान्स (१७८९) राष्ट्राच्या निर्मितीवेळी जी फ्रेंच बोली राष्ट्रभाषा झाली ती फ्रेंच भाषा फक्त १२% लोक संबंध फ्रान्समध्ये बोलत असत. इटलीच्या एकीकरणाच्यावेळी (१८६०) इटलीमध्ये जी बोली राष्ट्रभाषा म्हणून निवडली गेली ती फक्त अडीच टक्के लोक बोलत असत. राजकीयदृष्ट्या वजनदार अभिजनांची बोली ही प्रमाणभाषा व राज्यभाषा होते.

राष्ट्रभाषा व राज्यभाषा हे शब्द जरी निराळे असले तरी त्या मागची संकल्पना समान आहे. भारत हे संघराज्य आहे. भारत या राष्ट्राची एक राष्ट्रभाषा आहे व त्यातील प्रत्येक राज्याची निराळी राज्यभाषा आहे. राज्यभाषा असो वा राष्ट्रभाषा असो, ह्या शासनव्यवहाराच्या प्रमाण व निमकृत्रिम भाषा असतात. हा आशय समजल्यानंतर राष्ट्रभाषा व राज्यभाषा ही संज्ञा आलटून पालटून वापरली तर आकलनात गोंधळ गडबड उडणार नाही.

राज्यभाषेची उत्क्रांती कशी होते, त्याला वजन कसे प्राप्त होते हे पाहाणे रंजक व बोधक ठरेल. प्रमाणभाषा कृत्रिम व तयार केलेली असते, ही बोलीभाषेसारखी स्वाभाविकतः उत्क्रांत होत नाही. बोलीभाषा ही खळाळून वहाणारी नदी तर प्रमाणभाषा बांधलेल्या नाल्यासारखी! प्रमाणभाषेसाठी नवीन शब्द, वाक्प्रचार तयार करावे लागतात, यामुळे भाषेला कृत्रिमपणा येतो. शासनव्यवहारासाठी, शिक्षणासाठी याची जरूरी असते.

ज्यावेळी छपाईचा शोध लागला त्यावेळी प्रमाणभाषेला आगळे वेगळे स्थैर्य लाभले. 'प्रिंट' (छापणे) – प्रिंट हा शब्द मूलतः 'इंप्रेशन ऑफ अ सिल' म्हणजे राजघराण्याचा वा शासकीय अधिकाऱ्यांचा शिक्का या अर्थाने वापरला जात असे. 'फिंगर प्रिंटस्' – बोटाचे ठसे, 'अंगठ्याचा ठसा' असा सुद्धा 'प्रिंट' या शब्दाचा उपयोग करतात. प्रिंट हा शब्द प्रिंटिंग (छपाई) मध्ये या अर्थाने आला तो 'अधिकार', 'अधिकृतता' घेऊन! त्यामुळे छापलेली अक्षरे चिरंतन टिकतील, त्यात काही बदल होणार नाही अशी माणसाची मानसिकता छापील शब्दांबद्दल झाली. माणसाचा हस्तलिखितापेक्षा यंत्रावर जास्त विश्वास होता. माणूस चुकतो, यंत्र चुकत नाही. त्यामुळे यंत्राद्वारे लाभलेली अक्षरे बिनचूक व चिरकाल टिकणारी आहेत असे माणसाला वाटू लागले. खरे पाहाता कोणतीही प्रमाणभाषा अक्षर असत नाही परंतु, छापील प्रमाणभाषा 'अक्षर' असते असे माणसाला का वाटू लागले याची महत्त्वाची कारणे वर दिली आहेत. छापील प्रमाणभाषा स्थायी स्वरूपाची असते हा एक भास होता, दृष्टिभ्रम होता! मौखिक शब्दापेक्षा छापील शब्दांना जास्त वजन असते. जे छापून येते ते अधिकृत असते असाही सर्वसामान्य समज असतो. छपाईच्या शोधाने ही किमया केली आहे. भाषा छापली जाऊ लागल्यामुळे पुस्तकांचा प्रसार झाला. भाषा शुद्ध कशी लिहावी हे सांगण्यासाठी व तिचे प्रमाणीकरण करण्यासाठी भाषा-शुद्धि-तज्ज्ञांच्या संख्येत वाढ होत गेली. जगातील सर्वच संस्कृतींच्या भाषांमध्ये हे घडले. अठराव्या शतकाचा शेवट व विसाव्या शतकाची सुरुवात हा या घटनांचा कालखंड होता.

समाजात शिक्षणाचा प्रसार होऊ लागला, शासकीय यंत्रणा, नियंत्रणे व कारभार वाढला या सर्व गोष्टी प्रमाणभाषेला पूरक ठरल्या. अशा तऱ्हेने वृद्धिंगत होत असलेली प्रमाण राज्यभाषा प्रस्थापित झाली. प्रस्थापिततेच्या अनुषंगाने येणारे फायदे या भाषेला मिळू लागले.

महाराष्ट्रात मराठीच्या विविध बोली आहेत. इंग्रजांचे राज्य येण्यापूर्वी पेशवाईत राज्यकर्त्यांची जी मराठी होती ती प्रमाण मराठी म्हणून महाराष्ट्रात प्रस्थापित झाली व ती त्या काळी राज्यभाषा होती. अशी मराठी बोलणारे संख्येने अल्प असले तरी ते राज्यकर्ते असल्यामुळे हे घडले. ती शासनव्यवहाराची, शिक्षणाची व संपर्कभाषा किंवा जनभाषा म्हणून वापरली जाऊ लागली. महाराष्ट्रातील इतर प्रांतिक बोलींना बोलीचे दुय्यम स्थान मिळाले. पुढे इंग्रजांचे राज्य आले. इंग्रजीबरोबर नवीन ज्ञान-विज्ञान-तंत्रज्ञान आले. इंग्रजी शासनव्यवहाराची, उच्च शिक्षणाची भाषा झाली. अभिजन इंग्रजीत व्यवहार करू लागले. स्वातंत्र्य मिळून ४७ वर्षे होऊन गेली. आज मराठी राज्यभाषा असली तरी शासनाचे, न्यायदानाचे काम इंग्रजीतून चालते, त्यामुळे अधिकृत राज्यभाषा मराठी, तर जनभाषा, संपर्कभाषा इंग्लिश असे द्वैभाषिक दृष्य दिसते.

या सबंध लेखाचा आढावा घेतला तर पुढील निष्कर्ष काढता येईल : जशी नवीन राज्ये वा राष्ट्रे निर्माण होतात त्यानुसार नवीन राज्य व राष्ट्रभाषा तयार होतात. भाषेमुळे राष्ट्र निर्माण होत नाही तर राष्ट्रामुळे भाषा निर्माण होते; म्हणजे त्या भाषेला राष्ट्रभाषेचे स्थान मिळते. 'लँग्वेजेस मल्टीप्लाय विथ स्टेटस् नॉट दि अदर वे राउंड'! राज्यांमुळे भाषा निर्माण होतात. जशी राज्ये वाढतात तशा भाषा वाढतात, पण भाषांमुळे राज्ये निर्माण होत नाहीत.

*— डॉ. आनंद जोशी*

## ३) उद्याची इंग्लिश

एखादी भाषा आणि त्या भाषेतील सांस्कृतिक धन यात अंगभूत असा सुसंवाद असतो. या सांस्कृतिक धनाशी ज्याची तोंडओळखही नाही अशी एखादी व्यक्ती त्या भाषेचा वापर करू लागली, की एक 'नवीनच भाषा' तयार होणे अपरिहार्य आहे. मूळ इंग्रजी भाषेच्या खास अशा सांस्कृतिक धनाशी अजिबात परिचय नसलेले, त्याबद्दल आत्मीयता नसलेले देश आता इंग्रजीचा वापर करू लागल्याने, इंग्रजी भाषेत सध्या अशाच प्रकारचा पेचप्रसंग निर्माण होण्याची स्पष्ट चिन्हे दिसू लागली आहेत. या पेचप्रसंगाची व्याप्ती दिवसेंदिवस वाढणारी आहे.

प्रा. आय. ए. रिचर्डस हे इंग्रजी भाषेतील एक महान साहित्यसमीक्षक. त्यांनी असे भविष्य वर्तविले होते की "या पृथ्वीवरच्या अनेक भूप्रदेशात इंग्लिश फारच मोठ्या प्रमाणात उपलब्ध असणारी भाषा होणार आहे." हे भविष्य त्यांनी

इ.स. १९४३ साली वर्तविले होते. आज ते खरे ठरले आहे. इंग्रजांचे साम्राज्य नाहीसे झाले म्हणजे मग आपोआपच इंग्रजी नाहीशी होईल. स्थानिक भाषेला पुन्हा एकदा मानाचे स्थान प्राप्त होईल अशी आशा अनेक राष्ट्रभक्तांनी बाळगली होती. त्यात वावगे काहीच नव्हते. राष्ट्राभिमान वाढीस लागण्यासाठी स्वातंत्र्याच्या लढ्यात तो विचार आवश्यकच होता. स्वातंत्र्याचा लढा चालू असताना इंग्लिश भाषा ती एक राजकर्त्यांची "भाषा" म्हणून ती 'हटविणे' हेही क्रमप्राप्तच होते. परंतु इंग्रजी भाषेबद्दल वस्तुनिष्ठ विचार न झाल्याने, अनेक नामवंत व प्रज्ञावंत राष्ट्रभक्त प्रयत्नशील राहूनही इंग्रजीला हटविता आलेले नाही. दुर्दैवाची गोष्ट अशी की डॉ. लोहियासारख्या कडव्या समाजवाद्यांना, दक्षिणेकडच्या राज्यात 'इंग्रजी हटाव' या भूमिकेचा प्रसार करण्यासाठी, इंग्रजीतून भाषणे करावी लागत व आपल्या विचारांच्या प्रसारासाठी 'मॅनकाईंड'सारख्या अनियतकालिकांचे संपादन करावे लागे. या 'इंग्रजी हटाव' मोहिमेचा परिणाम नेमका उलटा झाला. इंग्रजीचे स्थान, अधिक पक्के झाले. इंग्लिश ही आता जगाची भाषा झाली आहे. आजवर दुसऱ्या कोठल्याही भाषेला हा चमत्कार करून दाखविता आला नव्हता. जगात एवढ्या मोठ्या प्रमाणावर इंग्लिशचा प्रसार होण्यामागे अर्थातच आर्थिक व राजकीय शक्तींचा जोर होता, हे उघडच आहे. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात 'अमेरिकन बळाची' ती भाषा होती. तसेच ॲंग्लो-अमेरिकन तंत्रविज्ञान आणि अर्थसत्ता यांचीही ती प्रतिनिधी होती. दुसऱ्या महायुद्धापूर्वी इंग्रजांचे जे साम्राज्य होते, वसाहती होत्या, त्यांनी घातलेल्या पायावर दुसऱ्या महायुद्धानंतरच्या नव्या परिस्थितीत इंग्रजी भाषेची इमारत मोठ्या डौलाने उभी राहिली. परंतु इंग्रजी भाषेचा हा जो प्रसार व विस्तार आहे, त्याच्यामागे केवळ, अमेरिकन सैनिकीबळ, तंत्रविज्ञान आणि अर्थसत्ता एवढ्याच गोष्टी नाहीत. भाषाशास्त्रात अनुस्यूत असलेल्या इतर अनेक गोष्टींमुळे इंग्लिशचा हा जागतिक स्वरूपाचा प्रसार होणे सुकर झाले, हेही तितकेच सत्य आहे. उदा. आशिया, आफ्रिका आणि लॅटिन अमेरिका या भूभागातील कोठचाही देश असूदे, त्यातल्या नागरिकांना एखादी परकीय भाषा शिकायची असली तर इंग्लिश शिकणे सोपे वाटते. या विधानाच्या पुष्ट्यर्थ भरपूर पुरावा उपलब्ध आहे. काही उच्चार, शद्ब, शद्बप्रयोग आणि थोडेसे व्याकरण यावर प्रभुत्व मिळविले, की इंग्लिश भाषा कामचलाऊ स्वरूपात का होईना, आपलीशी करता येते, असे बहुतेकांना वाटते. उत्तर चिनी, रशियन, स्पॅनिश, जर्मन किंवा फ्रेंच यातल्या एकाही भाषेच्या बाबतीत हे शक्य होत नाही, याबद्दलही सर्वांची खात्री आहे. जर्मन आणि फ्रेंच, या भाषांचा उल्लेख मुद्दाम केला, कारण जागतिक भाषेचे स्थान पटकाविण्याच्या स्पर्धेत या भाषा इंग्लिशबरोबर स्पर्धा करीत होत्या. आधुनिक जगात आपले अस्तित्व टिकवून धरायचे असेल तर इंग्लिश भाषेत व्यवहार करायचे कौशल्य असणे आवश्यक आहे. केवळ युरोप खंडातले लोक इंग्लिश शिकत नाहीत. सोव्हिएट युनियन आणि चीन या एकेकाळच्या कम्युनिस्ट देशातही ही भाषा आवर्जून शिकवली जाते. जपानमध्ये तिचे स्थान जपानीनंतर पहिले आहे. भारत आणि आफ्रिकेतल्या बहुतेक

देशांमध्येही हीच परिस्थिती आहे. असा अंदाज आहे की, विज्ञान आणि तंत्रविज्ञान, या दोन ज्ञानशाखात प्रसिद्ध होणाऱ्या एकंदर साहित्यापैकी अठ्याऐंशी टक्के ८८% साहित्य मुळात इंग्रजीत प्रसिद्ध होते. तसेच रशियन, जर्मन आणि फ्रेंच यासारख्या भाषात जर ते प्रथम प्रसिद्ध झाले, तर त्याचे इंग्रजीत लगेच भाषांतर होते. कादंबरीकार, नाटककार यांची मातृभाषा स्विडिश, डच, हिब्रू, हंगेरियन किंवा इटालियन असो, त्यांना आपल्या साहित्यकृतीचे इंग्रजीत भाषांतर व्हावे असे वाटते. तसे झाले तरच आपली साहित्यकृत्ती सर्व जगाला माहीत होईल, अशी त्यांची धारणा आहे. इंग्लिश भाषिकांची संख्या सुमारे तीस कोटी आहे. हा आकडा तितकासा निश्चित नाही – आणि ही संख्या दिवसेंदिवस झपाट्याने वाढते आहे. हा आकडा कितीही घसघशीत व नाट्यपूर्ण असला, तरी त्या आकड्याचे प्रचंडपण हा मुख्य मुद्दा नाही. जो मुद्दा प्रस्तुत व वास्तव आहे तो फारच गुंतागुंतीचा आहे. SOCIO-LINGUISTICS – समाज-भाषाशास्त्राच्या दृष्टीने तो इतका विसविशीत आहे की, तो मुद्दा, नेमक्या शब्दात सूत्रबद्धतेने मांडता येणार नाही. थोडक्यात सांगायचे झाल्यास, जगातील सर्व स्त्री-पुरुष, विशेषकरून तरुण-तरुणींना इंग्लिश, अमेरिकन-इंग्लिश शिकणे, त्यावर प्रभुत्व मिळवणे यावरच आपले भवितव्य अवलंबून आहे असे वाटते. आपला ऐहिक अभ्युदय, ती भाषा शिकल्याने होईल, तंत्रविज्ञान, विज्ञान, प्रत्यक्ष अनुभवातून मिळालेले ज्ञान, हे इंग्लिश भाषा शिकल्याने, आपल्या पदरात अधिक प्रमाणात पडेल, असा भरवसा त्यांना वाटतो. आंतरराष्ट्रीय देवाण-घेवाण, संपर्क, लौकिक कला, तंत्रविज्ञान, दोन पिढ्यातील संघर्ष, आणि ग्राहकशक्ती यासारख्या वेगवेगळ्या क्षेत्रातील जागतिक प्रतिमात इंग्लिश, अमेरिकन-इंग्लिश या भाषातील अवतरणे आणि संभाषण-लकबी भरपूर प्रमाणात आढळतात.

इंग्रजी भाषेचे असे 'आक्रमण' होऊ लागल्यानंतर त्या भाषेच्या प्रसाराला विरोध होणारच. तशा विरोधी प्रवृत्ती नेहमीच अस्तित्वात असतात. सध्या त्यांची तीव्रता वाढली आहे. जगातील सर्वच भाषा, त्या भाषांची संस्कृती, त्यांची अस्मिता या सर्वांच्याच अस्तित्वाला धोका उत्पन्न झाल्याकारणाने, ही अँग्लो-अमेरिकन लाट मागे हटविण्यास, थोपविण्यासाठी, सर्वजण, सज्ज झाले असले तर त्यात नवल नाही. इंग्लिश भाषेचा हा हल्लाही या इतर सर्व भाषांचा जो अत्यंत कमकुवत असा भाग आहे, नेमका त्या ठिकाणीच होत असल्याकारणाने, त्याचा प्रतिकारही कमालीच्या निश्चयाने व निर्धाराने होत आहे. उदा. फ्रान्स हे राष्ट्र मध्य-पूर्वेतील देश आणि फ्रेंच आफ्रिका या भूभागात आपले स्थान टिकून राहावे यासाठी राजकीय संघर्ष करताना आढळते. खुद्द फ्रान्समध्ये फ्रानग्लेचे (FRANGLAIS फ्रेंच भाषेत इंग्रजी शब्द व वाक्प्रचार घुसल्याने तयार झालेली भ्रष्ट फ्रानग्लेचे) फ्रेंच भाषेवर आक्रमण होत आहे. ते थांबविण्यासाठी चाललेले जोरदार प्रयत्न आपण पाहातोच आहोत. अँग्लो-अमेरिकन (भाषा) सामाजिक आणि तंत्रवैज्ञानिक, या दोन्ही क्षेत्रात एकवाक्यता निर्माण होण्यासाठी सामाजिक, आर्थिक असा जो दबाव आणते त्याबद्दलही तीव्र प्रतिक्रिया होतच असतात. बेल्जियम या राष्ट्रात वालोन्स

(WALLONS) आणि फ्लेमिंग्ज या दोघातला कडवा संघर्ष, भारतात झालेल्या भाषिक दंगली, इंग्लंड या राष्ट्रातील वेल्स या विभागात, आपणास भाषिक स्वायत्तता मिळाली पाहिजे या मागणीने, पुन्हा एकदा केलेला उठाव, फ्रान्समध्ये ब्रिटनी या भागाने केलेली स्वायत्ततेची मागणी, या साऱ्या घटना 'आपण काही झाले तरी टिकून राहिलेच पाहिजे' ही सहजप्रवृती किती खोलवर पाय रोवून आहे, याचे द्योतक आहे. या शतकाच्या सुरुवाती सुरुवातीपर्यंत नॉर्वे या राष्ट्रात एकच प्रमाणित नार्वेजियन भाषा होती. आता त्या देशात दोन प्रमाणित भाषा आहेत. या दोन्हीही तशा नार्वेजियनच आहेत. मराठी भाषेची पुणेरी-वऱ्हाडी-कोल्हापुरी ही जी रूपे आहेत, त्या सारखेच ते आहे. महत्त्वाचा मुद्दा – एकाच भाषेच्या दोन स्वरूपांना प्रमाणित अशा स्वतंत्र भाषेची प्रतिष्ठा मिळावी हा आहे. एखादी बोलीभाषा, आणि एकच भाषा वेगवेगळया ढंगानी बोलली जात असल्यास त्यातला प्रत्येक ढंग, हा आपणाला स्वायत्तता मिळाली पाहिजे अशी मागणी करतो. निदान ही प्रवृत्ती अधिकाधिक प्रमाणात प्रकट होऊ लागली आहे. ते काहीही असो, आज तरी एक जागतिक भाषा म्हणून इंग्लिशचे प्रभुत्व आहे. इतिहासकाळात लॅटिन ही युरोपखंडाची भाषा मानली जात असे, हे खरे आहे. परंतु इंग्लिशचा प्रभाव व विस्तार हा लॅटिनपेक्षा कितीतरी अधिक प्रमाणात आहे. एसपेरेन्टोसारख्या कृत्रिम भाषा निर्माण करून, त्यांना जागतिक भाषेचे स्थान मिळावे, म्हणून आजवर खूप प्रयत्न झाले. इंग्रजीने हे सारे प्रयत्न व त्या योजना पार निकालात काढल्या आहेत.

या सर्वांचे परिणाम किती व कोणते याचा विचार या ठिकाणी प्रस्तुत नाही. हे परिणाम अनेक देशात झालेले आहेत व ते परस्परविरोधीही आहेत. अमेरिकन इंग्लिश, भारतीय इंग्लिश, वेस्ट इंडियन इंग्लिश, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, कॅनडा या देशातले वेगवेगळे इंग्लिश, पश्चिम आफ्रिकेतल्या देशातून बोलले व लिहिले जाणारे भिन्न-भिन्न प्रकारचे इंग्लिश, या अशा प्रकारच्या इंग्लिशने, मूळ इंग्लिश भाषेचा एकंदर आवाका चांगलाच विस्तृत व समृद्धही केला आहे. भाषिक प्रयोग करण्यासाठी नवउन्मेषशाही अशा प्रतिभेची जी ऊर्जा असावी लागते, ती मूळ इंग्लिश भाषेच्या केंद्रात आता नाही. ती इतरत्रच मोठ्या प्रमाणात आहे. या विधानाच्या समर्थनार्थ तर्कशुद्ध युक्तिवाद करता येईल. डी. एच. लॉरेन्स आणि जे. सी. पोवीज (POWYS) या दोन लेखकानंतर पहिल्या दर्जाचे लेखन करणारा एकतरी 'अस्सल इंग्लिश' लेखक आहे का? शॉ, इलिएट, जॉइस आणि पाउंड या लेखकांनंतर इंग्लिश भाषेतील वाङ्मयाचे प्रतिनिधित्व करणारे विनीचे व पहिल्या दर्जाचे लेखक हे प्रामुख्याने आयरिश व अमेरिकन होते. सध्या वेस्ट इंडियन इंग्लिश, उत्तर अमेरिकन कवी व कादंबरीकार यांचे इंग्लिश, पश्चिम आफ्रिकेतील नाटककारांचे नाट्यसंवाद, या सर्वांचा एकत्रित परिणाम काय झाला आहे? लौकिक आणि तंत्रवैज्ञानिक या दोन्ही स्वरूपाचे वाङ्मयीन ढंग आपलेसे करताना, 'इंग्लंडमधील इंग्लिशला' अजीर्ण होते की काय अशी अवस्था आहे असे या उपस्थित केलेल्या प्रश्नांचे उत्तर देता येईल. थॉमस पानचॉन (THOMAS PANCHON), पॅट्रिक

व्हाईट (PATRIC WHITE) या दोन्ही लेखकांच्या साहित्यातील भाषा अगदी रसरशीत व जिवंत वाटते. इंग्लंडमधील इंग्लिशची प्रतिक्रिया ही अनेक बाबतीत एक प्रकारची चोखंदळ व असंतुष्ट अशी पीछेहाटीसारखी आहे. इंग्लंडमधील विद्यमान इंग्लिशभाषिक काव्य, नाट्य, कथा, कादंबरी हे विसविशित, थोडक्याच शद्धात आपला पसारा आवरणारे आणि भाविक फुलोऱ्यावर संपूर्णपणे अविश्वास दर्शविणारे आहे. फिलिप लारकीन, जॉफ्रे हिल, हॅरॉल्ड पिंटर आणि डेव्हिड स्टोरी या सर्व लेखकांचे एक विशिष्ट लेखनतंत्र आहे. मार्मिक, मितव्ययी, मर्मभेदी अशा मार्गाचा ते तंत्र अवलंब करते. अशा प्रकारे जुन्या अभिजात कलाकृतींचे ते जतन करण्याचा प्रयत्न करतात. या व दुसऱ्या अनेक परिणामांबद्दल सध्यातरी भाष्य करता येणार नाही. कारण इंग्लिश भाषेचा जागतिक विस्तार होण्याला सुरुवात होऊन तसा फार काळ लोटलेला नाही. परंतु इंग्लंडबाहेरील इंग्लिशचा खुद्द इंग्लंडमधील इंग्लिशवर भविष्यकाळात काय परिणाम होईल हा अत्यंत महत्त्वाचा व तितकाच मनोरंजक प्रश्न आहे. विशेषतः भाषाशास्त्रज्ञ व संस्कृतीचे इतिहासकार या दोघांच्या दृष्टीने. कारण त्यांनाच या प्रश्नाला सामोरे जावयाचे आहे.

एकीकडून इंग्लिश भाषा समृद्ध होत असतानाच तिला काही गमवावेही लागत आहे. आय. ए. रिचर्डस यांनी म्हटले होते. 'कोठच्याना कोठच्या प्रकारची इंग्लिश भाषा – म्हणजेच त्यांना असे सांगावयाचे होते की त्या इंग्लिश भाषेतील शद्धात अंतर्भूत असलेले स्वर व व्यंजने (स्पेलिंग) हे काटेकोर तर्कशास्त्रावर आधारीत आहेत अशी बेसिक इंग्लिश – ही जागतिक भाषा होणार आहे. डॉ. रिचर्डस यांनी तयार केलेल्या 'बेसिक इंग्लिश'मध्ये फक्त साडेसातशे शद्ब होते. अनेकांनी या शद्बमर्यादेत ग्रंथरचनाही केली होती. उदा. प्रख्यात शास्त्रज्ञ जे. बी. एस. हाल्डेन यांनी अगदी आवर्जून पुस्तके लिहिली. परंतु इंग्लिश भाषा ही अशा प्रकारे सोपी केल्याने इंग्लिश भाषेचेच अधिक नुकसान होण्याचा संभव आहे. इंग्लिश भाषेला इतिहास आहे. ती एका विशिष्ट संस्कृतीत वाढली. त्या भाषेत, इंग्लंडमधील इंग्लिश समाजाला जाणवणारे नैतिक व सांस्कृतिक अस्तित्व भल्या मोठ्या प्रमाणात अंतर्भूत आहे. परंतु आजच्या या जगात, या कशाचाही कसलाही संबंध नसलेल्या अथवा वेळप्रसंगी त्या सर्वच गोष्टीशी सर्वस्वी दुरावा असलेल्या अनेकांनी इंग्लिश भाषेचा बाह्यभाग आपलासा केला आहे. बाह्य भाग याचा अर्थ, त्या भाषेचे व्याकरण व वाक्यरचना. तथापि एखाद्या भाषेला जे वजन प्राप्त होते, ते त्या भाषेतल्या वाक्प्रचार, म्हणी, प्रतिकात्मक आणि समूहदर्शक अशा संदर्भामुळे. याच संदर्भाचे क्षेत्र, एकंदर अनुभवाचेच चित्र या दोन्हीही गोष्टी इंग्लिश भाषा ही आपल्या मुळातल्या संस्कृतीतून, दुसऱ्या एखाद्या संस्कृतीत वाढलेल्या व्यक्तीकडे जाताना एकतर, संपूर्णपणे गमावल्या जातात किंवा त्या तिरपागड्या तरी होतात. 'आंतरराष्ट्रीय इंग्लिश'चा सर्वच जगात प्रचार होत असताना, भिंतीवर रंग लावताना, प्रथम जो पाण्यासारख्या पातळ रंगाचा हात मारतात, तसे स्वरूप त्या भाषेला प्राप्त होते. हा रंग अगदी झटपट सर्वत्र पसरतो, पण त्याला पुरेसा आधार नसतो.

त्या सारखेच आंतरराष्ट्रीय इंग्लिशच्या प्रसाराचे आहे. इंग्लंडमधील एखाद्या इंग्लिश भाषिकाला आपल्या जपानी सहकाऱ्याबरोबर अथवा विद्यार्थ्यांशी संभाषण करताना याची प्रचीती घेता येईल. हा सहकारी वा विद्यार्थी या दोघांचीही इंग्लिश भाषेच्या तंत्रावरील पकड, इतकी पक्की असते की, त्यासमोर त्या 'अस्सल इंग्लिश भाषिक' व्यक्तीला नतमस्तक व्हावे लागेल. परंतु त्याचबरोबर इंग्लिश भाषेचे जे विघटन होत आहे, त्याचे परिणाम किती गहिरे असतात याचीही जाणीव त्यास होईल. जे काही बोलले जाते त्यात अगदी बारकीशीही त्रुटी दाखविता येणार नाही. इतके ते विनचूक असते. पण त्यातले फारच थोडे अचूक असते. एखाद्या भाषेतील नैमित्तिक (FORMAL) आणि रोमँटिक घटकांमुळे, ती भाषा ज्या समाजाची आहे, त्या समाजाचे संक्रमण क्रियाशील जीवनात होते. या ठिकाणी हेही लक्षात ठेवले पाहिजे की नैमित्तिक घटक आणि रोमँटिक घटक हे सर्वस्वी अलग असे घटक नाहीत. तसे ते एकमेकांवर अवलंबून असलेलेच घटक आहेत. हे परस्परावलंबित्व जे असते ते त्या भाषेचा काळ आणि त्या (मूळ) भाषेची भूमी या दोन्ही गोष्टीतून निर्माण झालेले असते. स्मृती वा आठवण हा 'नैसर्गिक रोमँटिसिझमचा' भाग आहेत. या दोन्हीचा अभाव एसपेरँटोसारख्या कृत्रिम तऱ्हेने तयार केलेल्या भाषेत असल्याने, त्या भाषा फक्त जुजबी व्यवहारासाठी, अथवा कोणत्याही नियमाचे व तर्कशास्त्राचे बंधन ज्या निर्णयाला नाही, अशा निर्णयावर आधारीत असलेल्या कामासाठीच वापरता येतील. इतर प्रकारच्या उपयोगातून त्या कृत्रिम भाषा केव्हाच हद्दपार झालेल्या आहेत.

इंग्लिश भाषेचे आंतरराष्ट्रीयीकरण होत आहे, नव्हे झालेलेच आहे. याच कारणामुळे त्या भाषेत दोन प्रकारचा कमकुवतपणा निर्माण होतो. तसे होण्यास सुरुवातही झाली आहे. अनेक भिन्न भिन्न प्रकारची समाजव्यवस्था असलेल्या समाजात इंग्लिश भाषेची 'आयात' होते. या आयात झालेल्या इंग्लिश भाषेतील शब्दांना विशिष्ट अर्थ असतो. त्यातूनच त्या भाषेचा परिसर (SEMANTIC FIELD) तयार होतो. भाषेच्या आयातीबरोबर या परिसराचीही आयात होणे हे आवश्यक असते व क्रमप्राप्तही असते. यामुळे स्थानिक अशी जी भाषिक संस्कृती असेल, तिची स्वायत्तता हळूहळू हटावयास सुरुवात होणारच. सध्या अमेरिकन इंग्लिश आणि इंग्लंडची इंग्लिश या दोन्ही भाषा जगात सर्वत्र पसरल्या आहेत. हे बुद्धीपुरस्सर झालेले असो वा नसो. परंतु आजवर या जगात नैसर्गिक अशी जी भाषिक विविधता आहे, तिच्या विनाशाचे प्रमुख वाहन म्हणजे हा प्रसार असे म्हणता येईल. विद्यमान युगात पर्यावरणाच्या बाबतीत, अनेक प्रकारचे विध्वंसक उत्पात झालेले आहेत. परंतु हा स्थानिक भाषांचा हळूहळू होत असलेला नाश, हा कदाचित त्या उत्पातातील इतर गोष्टीपेक्षा फारच वेगळा आहे. कसलीही व कितीही डागडुजी केली तरी हा विनाश थांबविण्याच्या कामात तिचा उपयोग होणार नाही. इंग्लिशचे परिवर्तन एसपेरेंटोल होत आहे. याचा अर्थ ती आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या संपर्कसाधनाची भाषा आहे. जागतिक व्यापार, तंत्रविज्ञान आणि जगतपर्यटन यांची

ती भाषा आहे. पण हे होत असताना इंग्लिश भाषेवर त्याचा परिणाम होणे अपरिहार्य आहे. अधिक सूचकपणे सांगायचे झाल्यास खुद्द इंग्लिश भाषा ही कमकुवत झाली आहे. सध्या प्रचलित असलेल्या ठोकळेबाज परिभाषेत सांगावयाचे झाल्यास, इंग्लिश ही आता सर्वत्रच पसरल्याकारणाने त्याची परिणिती नकारात्मक (FEED BACK) पुनःप्रत्यक्ष होण्यात होते. इंग्लिश आणि इतर भाषा यात क्रिया-प्रतिक्रिया होत असताना जे संतुलन निर्माण झाले आहे, त्यासंबंधी लगेच निर्णय देता येणार नाही. जगाची भाषा आणि तिची लघुलिपी असे स्वरूप इंग्लिशला आल्यानंतर, त्यातून जे नफा-तोट्याचे आदान-प्रदान होईल, त्याबद्दलही सध्यातरी काहीच ठरविता येणार नाही. इंग्लिश भाषेच्या जागतिक प्रसारामुळे स्थानिक भाषातील प्रतिभा जर कमकुवत झाली, तर इंग्लिश भाषा ही जागतिक भाषा होण्याची किंमत फारच जबर आहे, असे म्हणावे लागेल. एकंदरीत तसे होणे हे शोकपर्यवासी ठरेल. एका आगळ्या, सुसंवादी व बोलक्या अशा ऐतिहासिक अनुभवाचा इंग्लिश भाषेतील शद्बसंपत्तीवर आणि वाक्यरचनेवर, खोलवर पोचणारा पण तितकाच नाजुक ठसा उमटलेला आहे. तसेच इंग्लिश भाषेचा, त्या भाषेच्या गतकाळाशी अतूट व लवचिक असा संबंध आहे. इंग्लिश भाषेला आजवर तरी अखंडपणे वाहणारा इतिहास आहे. ती भाषा इतिहासात रसरशीतपणे टिकून राहिलेली आहे. इंग्लिश वाङ्मय या सर्वाची साक्ष आहे. याही पुढे जाऊन असे म्हणता येईल की, इंग्लिश भाषेची जी विद्यमान अवस्था आहे, त्यातल्या त्या सर्वोत्तम गोष्टी आहेत. परंतु इंग्लिश ही जागतिक भाषा होण्याची चिन्हे आहेत. त्यातून पेंटकोस्टसारखा उत्सव साजरा करणारी परिस्थिती निर्माण होण्याची चिन्हे नाहीत. बुक ऑफ जेनासिसमध्ये पुढील उल्लेख आहेत – जगात अनेक भाषा असल्याकारणाने गॉस्पेलमध्ये जो संदेश होता, त्याचा प्रसार होण्यास अडथळा उत्पन्न होत होता – पण ह्या इतक्या भाषा कोठून आल्या? ईश्वराच्या विरुद्ध असलेला आणि अत्यंत दुष्ट असा सल्ला जो अनेक माणसे देतात, तो निरर्थक ठरावा आणि आपला बचाव व्हावा यासाठी परमेश्वराने, आपल्या दूतांना अनेक भाषांची देणगी दिलेली आहे. जे लोक इकडे तिकडे उगाचच भटकत आहेत, त्या सर्वांना परमेश्वर स्वगृही बोलावील. त्यांच्यावर ऐक्य घडवून आणण्याची कृपा करील व यानंतर दरवर्षी या ऐक्याचा सोहोळा म्हणून पेंटकोस्टचा उत्सव साजरा होईल. इंग्लिश भाषा ही जागतिक भाषा झाली की भाषिक गोंगाट कदाचित थांबेलही; पण त्यातून पिडगिन इंग्लिशसारखी भ्रष्ट भाषा निर्माण होणे आणि 'पेंटकोस्ट' न येणे हा दैवदुर्विलास आहे.

(जॉर्ज स्टाईनर यांच्या एका लेखावरुन)

— *नाना जोशी*

# लेखमाला

## असा हा वाचनछंद – कॅथरीन कूकसन

डॉ. मीना वैशंपायन

केव्हा बरं मी वाचायला सुरुवात केली? कोण जाणे. पण आपण वाचतोय या गोष्टीचं भान मला केव्हा आलं ते फक्त मला आठवतंय. "हातातलं पुस्तक खाली ठेवलं नाहीस तर मी ते चुलीतच घालीन." स्वयंपाकघराच्या एका कोपऱ्यात बसलेली मी 'केट'च्या (माझ्या आईच्या) अशा वस्सकन ओरडण्याच्या आवाजानं एकदम दचकले होते ते मात्र चांगलं आठवतंय.

मी काही गुन्हा केला होता की काय? ते पुस्तक न वाचण्यासारखं होतं? (असा प्रश्न मला अजूनही पडलेला आहे.)

साडेचार वर्षांची असल्यापासून ते जवळजवळ आठ वर्षांची होईपर्यंत मी 'सायमन साईड प्रॉटेस्टंट स्कूल' या शाळेत जात असे. त्यानंतर मला 'कॅथलिक स्कूल' मध्ये घालण्यात आलं. त्याबद्दल बोलताना आजोबा म्हणायचे – '(धार्मिक गोष्टींचं) शिक्षण मिळावं, श्रद्धा म्हणजे काय? हे नीट कळावं, म्हणून तुला तिकडे घातली बरं!'

माझ्या आधीच्या शाळेत असताना आमच्या घरी कामकाज करणाऱ्या बाईच्या मुलीकडून 'The Chatterbox Annual' (बडबडरावांच्या गोष्टींचं वार्षिक) वाचायला आणलं होतं. त्या पुस्तकात मी इतकी रंगून गेले होते की मला ते परतच देववेना. त्याच्या अगदी चिंध्या होईपर्यंत मी ते पुन्हा पुन्हा वाचीत होते. त्यानंतर कितीतरी वर्षेपर्यंत ती मुलगी रस्त्यात कुठे दिसली तर मी तोंड चुकवीत असे. तिचं पुस्तक चोरल्याच्या जाणीवेनं मला फार अपराधल्यासारखं वाटे.

पण ज्यावेळी प्रथम मी खरोखरीची चोरी केली तेव्हा माझी वाचनाची भूक फारच भडकलेली असावी. त्यावेळी घरची परिस्थिती आर्थिकदृष्ट्या फारच बिकट होती. त्यामुळे माझ्यासाठी साप्ताहिक चित्रकथांचे 'रेनबो' हे पुस्तक आणण्यासाठी एखादा आणाही मला मिळत नसे. वृत्तपत्र आणण्यासाठी मी जवळच्या वर्तमानपत्रविक्रेत्याकडे गेलेली असताना त्या वर्तमानपत्राखाली लपवून 'रेनबो' घरी आणण्यात मी यशस्वी झाले खरी, पण नंतर ती चोरी उघडकीला आली. त्यानंतर मला बेसुमार छळ सोसावा लागला. या चोरीमुळे मला नक्कीच नरकात जावं लागेल असं धमकावण्यात आलं. खरं म्हणजे रात्री पडणाऱ्या भयानक स्वप्नांनी मी त्या प्रदेशाचा (नरकाचा) थोडासा अनुभव आधी घेतलेला होताच. पापकृत्यांच्या कबुलीच्यावेळी (कन्फेशनच्यावेळी) चर्चमधल्या धर्मगुरूंनी तर मला या कृत्याबद्दल

सौम्य अशा उपदेशाच्या सुरात पण आश्चर्यानं ओतप्रोत भरलेल्या आवाजात म्हटलं होतं, "बाळा, तू नरकाच्या ज्वाळांमध्ये अजून लपेटली कशी जात नाहीस याचंच मला नवल वाटतं."

१९१९ मध्ये मी आजारी पडले, माझी कंबर दुखावली गेली आणि मी शाळा सोडली. माझे वय त्यावेळी १३ वर्षांचं होतं. त्याचवेळी आमच्या घराच्या वरच्या मजल्यावर राहणाऱ्या बाईंनी मला एक पुस्तक भेट दिलं. ते मला मिळालेलं माझं स्वतःचं असं पहिलं पुस्तक! त्याचं नाव होतं – 'ग्रिमच्या परीकथा.'

चौदाव्या वर्षी जीन स्ट्रॅटॉन पोर्टरलिखित 'हरवलेल्या बग्गीतली मुलगी – (Girl of the Limber Lost) हे पुस्तक मी वाचलं. त्यापाठोपाठ चार्ल्स गारव्हीस, एथेल एम. डेल, अर्नोल्ड बेनेट, ह्यूफ वॉलपोल यांची पुस्तकं वाचली. शाळेच्या फळ्यावर लिहिलेली, शेक्सपियरच्या वाङ्मयातील वाक्यं, सुभाषितं, उतारे मला अजूनही आठवताहेत. त्यानंतर बलदंड अशा एका स्कॉटिश भाडेकरूनं आपल्या झोपण्याच्या खोलीतल्या कपाटावर ठेवलेल्या, साहित्यविषयक पुस्तकांच्या गठ्ठयातून मी शेक्सपियर काढून त्यातील उतारे वाचले होते.

आमच्याजवळ राहणाऱ्या माझ्या शेजाऱ्याबद्दल मला फार जिव्हाळ्याच्या आठवणी आहेत. तो गोदीत काम करणारा मजूर होता. बोटीवरचं सामान उतरवण्याऐवजी दुसरं काही करण्याची त्याला जर संधी मिळाली असती तर त्यानं काय केलं असतं, तो कोण झाला असता या विषयीचा मी विचार करीत राहाते. काही पुस्तकं न वाचण्याची मला सक्त ताकीद होती. अशा पुस्तकांकडे ढुंकूनही बघू नये असं मला वारंवार बजावलं गेलं होतं. पण एकदा केटनं मला शेक्सपियरचं 'व्हीनस आणि ॲडोनीस' वाचताना पकडलं आणि ते पुस्तक फेकून देऊन असली चावट पुस्तकं वाचू नयेत असं बजावलं. पण खरं म्हणजे त्या पुस्तकात फक्त चुंबनप्रसंगच होते आणि ती माणसंही काही खरी थोडीच होती? त्यामुळे तिचा राग मला समजलाच नव्हता.

पण वाचनाच्या आनंदाचा खराखुरा अनुभव मी विसाव्या वर्षी घेतला. अठराव्या वर्षापासून मी साऊथ शील्डमध्ये एका लाँड्रीत धुलाईला आलेल्या कपड्यांची तपासणी करण्याचं काम करीत होते. त्यापूर्वी दोन वर्षे पेनं रंगवण्याचा उद्योग मी केला होता. त्याचा फायदा एवढाच की शिशाचं विष माझ्या शरीरात भिनू लागलं. त्यामुळे लाँड्रीत काम मिळाल्याबरोबर हा आतवट्ट्याचा उद्योग मी थांबवला. त्यावेळी मी विचारानं पक्की कॅथलिक असल्यानं आपल्या वाट्यास आलेला हा भोग म्हणजे परमेश्वराचीच इच्छा असं मी समजत असे. लाँड्रीत मला महिन्याला दोन पौंड मिळत. सगळे कपडे जागच्या जागी सापडले तर दिवसभरात चारी ठाव जेवण आणि एक दिवस नि एक रात्री सुट्टी! याशिवाय एखाद्याची अधिक काय अपेक्षा असणार?

तिथं मी तीन महिने होते. त्यावेळीच माझी ईश्वराशी प्रश्नोत्तरं सुरू

झाली. मला वाटे की माझ्या भविष्याबाबत तो परमेश्वर उदासीनच होता किंवा माझ्याबद्दल तो विसरूनच गेला असावा. त्यावेळी माझ्या मनात वाईट विचारही येऊ लागले. माझ्या अस्मितेला स्पर्श करणारे विचार. वाटू लागलं, आपला जन्म यापेक्षा अधिक चांगल्या गोष्टीसाठी झालाय. पण कोणत्या? (ते मात्र कळत नव्हतं.)

संस्कृती!.....

त्यावेळी या साऱ्या अनुभवामागील शैक्षणिक मूल्य माझ्या लक्षातच आलं नव्हतं. मला फक्त वाटे की, स्त्रिया म्हणजे सुसंस्कृत, खानदानीच असतात, असाव्यात. त्यामुळे खानदानी, सुसंस्कृत स्त्री बनून योग्य रीतीभातींसकट बोलणं हेच माझं पहिलं ध्येय होतं. पण त्यासाठी काही गोष्टी मिळवायला – शिकायला हव्या होत्या. उदा., संगीत शिकायला हवं होतं. भाषा शिकायला हव्या होत्या. मला थोडा थोडा पियानो वाजवता येई. तेरा वर्षांची असताना मी वर्षभर पियानोवादनाचे धडे गिरवत होते. पण पियानोवादनाच्या पहिल्या परीक्षेत मी विशेष प्रावीण्यासह पहिला वर्ग मिळवण्याचा निकाल पोस्टाने ज्या दिवशी माझ्या हातात पडला त्याच दिवशी आमच्या घरातला पियानो घेऊन जायला माणसं आली. बहुधा कोणती तरी बाकी चुकती करायची राहिली असल्याने केटला दुसरा मार्गच राहिला नसेल. काही असलं तरी अशा परिस्थितीत मला पियानोवादनाचा सराव करणं शक्यच नव्हतं. मी काम करीत असे तेथील पियानो अधिकाऱ्यांच्या बैठकीच्या खोलीत होता. तिथे तो वाजवला असता तर इतरांना तो ऐकणं त्रासदायक झालं असतं. मग मी दुसरी एक युक्ती केली. जुन्या बाजारातून एक जुनं फिड्ल एक पौंडाला विकत घेतलं. ते फिड्ल ठेवण्यासाठी पेटी होती, वाजवण्याची नखी होती. आणि लागणारा राळेचा गोळाही होता. एक धडा शिकण्यासाठी मला एक शिलिंग द्यावा लागे. या गतीने फिड्ल शिकायला मला ६ ते ९ महिने लागले. त्यानंतर लक्षात आलं की त्या वाद्यातच काहीतरी दोष आहे. त्यामुळे मी काही ते वाजवू शकले नाही.

उच्चभ्रू बनण्याचा दुसरा मार्ग होता फ्रेंच भाषा! माझ्या दुर्दैवानं याबाबतीत मी केलेली शिक्षकाची निवड चुकली. त्यासाठीसुद्धा प्रत्येक तासाला एक शिलिंग अशी दिलेली फी वाया गेली कारण तिला माझे उच्चार कधीच बरोबर वाटेनात. बौद्धिक प्रबोधनाची दारं माझ्यासाठी किलकिली होण्याआधी मी काही दिवस ध्वनिशास्त्राचे धडे गिरवले आणि गंमत म्हणजे 'भारतीय गदा' कशी चालवावी याचंही प्रशिक्षण घेतलं. या दुसऱ्या गोष्टीत मी चांगलंच प्राविण्य मिळवलं असावं. कारण त्याचा परिणाम म्हणून माझी अंगकाठी फारच सुधारली आणि ती सुधारणा अजूनही कायम आहे.

त्यावेळी मी अगदी पक्की कॅथलिक होते. त्यामुळे माझं वाचनही मर्यादित होतं. 'तीन आठवडे' नावाच्या, 'एलिनॉर ग्लीन' या लेखिकेच्या पुस्तकावर चर्चनं बंदी घातली होती. ते आमच्या कार्यालयात सगळीकडे फिरवलं जात होतं. ते

हातात घेऊन प्रत्येकजण त्यातलं एक वाक्य उच्चारी – 'त्याने तिच्या छोट्याशा पायाचं फक्त चुंबन घेतलं.' ते ऐकताच सगळीकडे खसखस पिके. त्यावरून मी अंदाज बांधला होता की ते पुस्तक बहुधा 'तसलं' (तथाकथित अश्लील) असावं.

मागचा पुढचा विचार न करता माझी मतं मी स्पष्टपणे बोलत असे, त्यामुळे माझ्याबरोबर काम करणाऱ्यांना या 'असल्या' पुस्तकांबद्दलची, 'तसल्या' विनोदांसंबंधीची माझी मतं माहीत होती. त्यांच्यापैकी काहीजणांनी संगनमत करून माझ्या खोलीत कॅथरीन बुशची 'कॅरीअर' ('Career' of Catherine Bush) या नावाची कादंबरी ठेवून दिली. या पुस्तकाची लेखिका तीच ती 'वाईट' बाई होती आणि एका गाफीलक्षणी मी ते पुस्तक वाचलं.

मला नेहमीच असं वाटतं की 'इलिनॉर ग्लीन' ही लेखिका या पृथ्वीवर केवळ एवढ्याचसाठी अवतरलेली आहे, की उत्तरेकडच्या गावंढ्या गावातील, माझ्यासारख्या महाअडाणी, महामूर्ख मुलींचे प्रबोधन व्हावे. याच (रोमॅन्टिक) प्रणयरम्य गोष्टीतली ती उमरावीण आपल्या सचिवाला सांगते की आपलं शिक्षण जर पुढं चालू ठेवून एखादीला खरोखरी उच्चभ्रू समाजात वावरणारी स्त्री बनायचं असेल, तर तिनं लॉर्ड चेस्टरफील्डनं आपल्या मुलाला लिहिलेली पत्रं वाचायला हवीत. (Letters to his son).

हे खरंय की, या वेळेपासूनच माझं आयुष्य पूर्णपणं बदलून गेलं. मी ग्रंथालयात गेले. अर्थात मला हे मान्य केलं पाहिजे की, ग्रंथालयात जाण्याची ती माझी पहिलीच वेळ होती. अर्लच्या पत्रांचा पहिला खंड मी घेतला आणि माझ्यासमोर एक नवंच जग खुलं झालं. इतिहास, भूगोल, पुराकथा याबद्दलच्या माझ्या ज्ञानाची परीक्षाच झाली जणू! त्यापुढचे सगळे खंड वाचीत असताना वॉल्टेअर, प्लेटो, पोप, स्विफ्ट अशांसारख्या कितीतरी नावांशी माझा परिचय होत गेला. त्या पत्रांमध्ये उल्लेखिलेली सगळी पुस्तकं वाचलीयत असं मला म्हणता आलं असतं तर? ग्रंथालयातली कितीतरी पुस्तकं माझ्या आकलनाच्या कुवतीबाहेर होती. मी कधी उड्या मारत, मधले भाग गाळतगाळत वाचणारी नव्हे, पण त्यातली अनेक पुस्तकं मला रटाळ आणि शद्बबंबाळ वाटू लागली. आता अर्थात मला पटतंय की माझ्या तोपर्यंतच्या आयुष्यक्रमानुसार आणि ज्ञानानुसार ती मला आकलनच होत नव्हती. पण हीही गोष्ट लक्षात घ्यायला हवी की १९२० च्या सुमारास माझं जीवन खडतरच होतं. दिवसभर मी इतके कष्ट करीत असे की, त्या पुस्तकांचा सखोल अभ्यास करणं मला अशक्य होतं.

१९४० मध्ये विवाहानंतर मी माझ्या नवऱ्याबरोबर सेंट अल्बनला आले आणि आयुष्यात प्रथमच जवळजवळ १८ महिने मला वाचायला वेळ मिळाला. मी वाचत गेले – फक्त वाचत राहिले. सुदैवानं आमच्या घरासमोरच ग्रंथालय होतं. ते माझं विद्यापीठच बनलं जणू. लॉर्ड चेस्टरफील्ड माझा शिक्षक झाला. आणखी आठवतंय की मी विशीत असताना एका फ्रेंच पाहुणीमुळे माझा अनेक

फ्रेंच लेखकांशी परिचय झाला होता. एकीकडे लॉन्ड्री चालवत असताना बाजूलाच मी एक छोटंसं विश्रांतीगृह उघडलं होतं. त्यात उतरलेल्या या फ्रेंच पाहुणीनं जॉर्ज दुहामेलच्या पॅस्क्वायर क्रॉनिकलशी परिचय करून दिला. जी. डी. मोपाँसाच्या लघुकथांशी, वॉल्टेअरच्या 'कॅन्डिड' शी परिचय झाला. अर्थात हे सर्व अनुवादांद्वारा. अलीकडेच मी पुन्हा पॅस्क्वायर क्रॉनिकल्स वाचण्याचा प्रयत्न केला पण आता त्यातील लेखनाचा मिळमिळीत सरधोपटपणा मला फारच कंटाळवाणा वाटला.

लॉर्ड चेस्टरफील्डच्या वाचनाचा आणि मी पूर्वी जे काही वाचलं होतं त्याचा खरा फायदा मला युद्धानंतरच्या काळात झाला, जेव्हा मी निराशेच्या गर्तेतून बाहेर येण्याची धडपड करत होते. लेखनद्वारा स्वतःला मुक्त करण्याचा प्रयत्न करीत होते. चेस्टरफील्डच्या Letters मधून माझ्या लक्षात आलं होतं की, त्यानं लिहिलेल्या प्रत्येक शब्द काहीतरी व्यक्त करीत होता. माझ्या या विधानात अतिशयोक्ती नाही, कारण तो खरोखरीच साधं – सरळ इंग्रजी लिहायचा. त्यामुळे मीही त्याचा हा मौलिक, नमुनेदार आदर्श डोळ्यांपुढे ठेवला होता. ज्याची मला खरोखरी प्रत्यक्ष मदत झाली असा तो एकच लेखक होता. कुठेतरी वाचलेल्या वेगळ्या अशा परीक्षणामुळे मी डिकन्स आणि हार्डी यांच्याकडे आकर्षिली गेले. पण तरी परिस्थिती अशी होती की, संस्कृतीसंबंधीच्या त्या माझ्या पहिल्या संशोधनात डिकन्स किंवा हार्डी यांच्याशी माझे सूर जुळले नाहीत. नंतर त्यांच्याशी मैत्री झाली पण आता मला ते वाचण्यात फारसा रस वाटत नाही हे कबूल केले पाहिजे. 'ब्रॉन्टे' ची 'जेन आयरे' आणि 'वुदरिंग हाइटस' मला आवडली. आणि Jane Austen च्या 'Pride and Prejudice' पेक्षा मला 'Mansfield Park' अधिक आवडली. Steinbeck आणि Salinger हे लेखकही मला आवडले; तसेच Loyd C. Douglas चं 'The Robe', Ross Lockridge चं 'Raintree Country' ही पुस्तकंही आवडली. मी कोणत्याही विद्यापीठात जाऊन शिक्षण घेऊ शकले नाही याची खंत मला नाही वाटत, पण माझ्या मानसिक घडणीच्या आरंभी आणि नंतरही मला योग्य मार्गदर्शन मिळाले नाही याची खंत मात्र जरूर वाटते.

ज्यावेळी मला ज्ञात असणाऱ्या, ज्याविषयी मला किमान भान आहे अशा विषयांविषयी मी लिहू लागले, तेव्हा मला १९ व्या शतकातील सामाजिक इतिहास अभ्यासावा लागला. त्या अभ्यासात मला Arthur Bryant, G. M. Trevelyan यांच्या पुस्तकांची खूपच मदत झाली. शिवाय मिसेस जोसेफाईन बटलरच्या आयुष्याबद्दल आणि कार्याबद्दल ज्यात सविस्तर लिहिलेले आहे त्या 'A Singular Iniquity' या Glen Petrie च्या पुस्तकाचीही फार मदत झाली. पहिल्या महायुद्धाबद्दल एस. जी. पी. वॉर्डचं 'फेथफुल' हे पुस्तकही मला खूप उपयोगी ठरलं.

माझ्या कादंबऱ्यांतील पात्रांना जेव्हा मी टेक्सासला घेऊन गेले तेव्हा मी Fehrenbach ची 'Lone Star' आणि 'The Comanches' ही पुस्तके

वाचली. अमेरिकन इतिहासाच्या पुस्तकांमधून या प्रदेशाबद्दल, तिथल्या माणसांबद्दल माहिती गोळा करायला फारच कष्ट पडले. पण या पुस्तकांनी मात्र मला टेक्सासबद्दल खूपच सांगितलं.

अलीकडच्या काळात ईश्वराचा शोध घेण्याच्या प्रयत्नात मी अगणित पुस्तकं वाचली. त्यातल्या अनेकांनी माझ्या शंकांमध्ये भरच टाकली. पण Ceslie Weatherhead या सोशिक माणसाच्या 'The Christian Agnostic' या पुस्तकानं मात्र मदत केली. Thomas Acquina याचं तत्त्वज्ञान आणि Paul Renan याचं तर्कशास्त्र यांनीही माझ्या आकलनाला मदत केली. थोडीशी अतिशयोक्ती करायचीच झाली तर मी असं म्हणेन की प्लेटोच्या Apologia पासून ब्रायन मॅगीच्या 'ग्रेट फिलॉसॉफर्स' पर्यंत अनेक पुस्तकं मी पालथी घातली. 'The Great Philosophers' हे पुस्तक म्हणजे या क्षेत्रातल्या वाचकांना मार्गदर्शकच आहे. इथे मला हेही नमूद केले पाहिजे की या तत्त्वज्ञांच्या तत्त्वज्ञानासंबंधी संशोधन करताना श्री. मॅगी यांनी दूरचित्रवाणीवर केलेलं विवेचन मला उपयोगी पडलं. माझ्या आधीच्या वाचनापेक्षा या विवेचनामुळे त्या विचारांना स्पष्ट रूप मिळालं.

आणि माझा लाडका Rabbi Lionel Bluel परमेश्वराचा लाडका मूर्ख माणूस! तो नेहमी केंद्रस्थानची भूमिका घेत आला पण मला तर तो त्या सर्वशक्तीमान ईश्वराचा वकीलच वाटतो.

भारतीय, चिनी आणि इतर लेखक वाचण्याची सणकही मला अधूनमधून येते. पण मी एखाद्या गुरूच्या शोधात मात्र फिरत राहिले नाही. कारण ते बरेचसे आमच्याकडील धर्मोपदेशकांसारखेच असतात. शिवाय ज्यांना आपले प्रश्न आपल्याच डोक्यानं सोडवायचे असतात अशा उत्तरप्रदेशीय 'थोर' माणसांपेकीच मी एक आहे ना! 'बाळा, हे सारं माझं मी केलंय' अशा जातीच्या स्त्रियांपैकी एक किंवा 'स्वतःच स्वतःला ओळखा' जातीपैकी एक असं समजा. अर्थात आता मी हे म्हणतेय पण माझं अपरंपार अज्ञान माझ्या डोक्यावर ओझ्यासारखं आहेच.

हे सारं सांगताना मी अजून काव्याला स्पर्शही केलेला नाही. मला वाटतं, एखाद्याच्या गद्य साहित्याच्या आवडीपेक्षा काव्याची आवड ही अधिक वैयक्तिक असते.

मला आठवतंय तेव्हापासून मी काहीना काही काव्यसदृश खरडत आलेय. त्या लेखनाला काव्य म्हणण्याचं धाडस मी करणार नाही. अगदी आजही आधुनिक काव्य वाचताना माझी काव्याबद्दलची भूमिका ही एखाद्या प्रेक्षकाची असते. किंवा कधी मला ते काव्य म्हणजे छोट्या छोट्या ओळींमधलं गद्यच वाटतं. Longfellow ची 'The Children's Hour' ही मला आठवणारी आणि भिववणारीही पहिली कविता. विशेषतः या ओळी –

छावणीत माझ्या तू बंदिस्त
जाऊ देणार नाही मी तुला
ठेवीन मी तुला, भुयारात
माझ्या हृदयाच्या, गोल मनोऱ्याच्या,
तेथे मी तुला कायमची ठेवीन.
खरंच नेहमीसाठी आणि रोजच
जोपर्यंत तेथल्या भिंती
ढासळत नाहीत,
आणि मातीतही मिसळत नाहीत.

या ओळींनी कितीतरी वर्षे माझा पिच्छा पुरवला होता, कारण दूरान्वयानेही त्यांचा संबंध मला स्त्रीपुरुष प्रेमाशी लावता येत नव्हता.

अलीकडे मी सर्व प्रकारच्या कवितांचा शोध घेत असते. त्यात दुसऱ्या महायुद्धातील सैनिकांनी लिहिलेल्या कवितांनी माझं मन अगदी हेलावून गेलं. त्या काव्यसंग्रहाचं नाव आहे – 'इटलीहून लिहिलेल्या कविता.'

हा लेख लिहिताना मी जसजशी लिहीत जातेय तसतशी अधिकाधिक पुस्तकं मनाच्या तळातून पृष्ठभागावर येताहेत, – अशी पुस्तकं जी मी आवडीनं वाचली होती आणि आता विस्मृतीच्या डोहात पार बुडाली आहेत. त्यांचा उल्लेख न करणं हे अनुचित आणि अक्षम्यच आहे. पण माझ्यासारख्या ८४ वर्षांच्या अशक्त, दुबळ्या 'मुली'कडून तुम्ही आणखी कशाची अपेक्षा करणार? आजूबाजूच्या जगाचं भान विसरून, स्वयंपाकघराच्या कोपऱ्यात 'रेनबो' वाचत बसलेल्या त्या लहानग्या केटी मॅकम्यूलनमध्येच ही वृद्ध चिमुरडी रमलेली आहे. पश्चिमी सीमेवरून आलेला फिलीप गिब्सचा वृत्तांत माझ्या अशिक्षित, अडाणी आजोबांना वाचून दाखवणाऱ्या केटचं भान त्या चिमुरडीला नाही. त्या सीमेवर त्यांचा एकुलता एक मुलगा लढत असल्यानं आजोबा तो वृत्तांत वाचायला उत्सुक आहेत. तो वृत्तांत ऐकताना ते कधी 'बिअर' घेत नसत. आणि जेव्हा ते वृत्तांतवाचन संपत असे तेव्हा आपल्या हातातील फेसाळल्या बियरच्या पेल्याची त्यांना जणू जाणीव होत असे आणि त्यावरील फेसावर ते फुंकर मारीत. त्याबरोबर समोर धडधडणाऱ्या, आगीतील तप्त लोखंडी गजांवर त्या फेसाचा चुर्र आवाज यायचा. स्वतः तो पेला रिकामा करण्याआधी त्यातील एक घुटका ते मला द्यायचे.

छावणीत माझ्या तू बंदिस्त
होऊ देणार नाही दूर मी तुला
माझ्या हृदयाच्या अंधार कोठडीत
तेथील गोल मनोऱ्यात
ठेवीन मी तुला.

अनुक्रमणिका

माझी आवडती पुस्तके –

| | | |
|---|---|---|
| Lord Chesterfield | — | Letters to his son |
| Somerset Maugham | — | Short Stories |
| Rider Haggard | — | She |
| John Galsworthy | — | The forsyte Saga |
| Leslie Weatherhead | — | All Books |
| Giovarni Guareschi | — | The little world of Dom Camillo |
| Hugh Walpole | — | The Herries Chronicle |
| J. D. Salinger | — | The Catcher in the Rye |
| John Steinbeck | — | The Grapes of Wrath. |

Books by Lionel Blue.

Catherine Cookson या लेखिकेचा जन्म १९०६ मध्ये Tyne Dock येथे झाला. ती तेवीस वर्षांची असताना उत्तर प्रदेशातून इकडे आली आणि Hastings मध्ये तिने पुढची ४६ वर्षे घालवली. वयाच्या ४१ व्या वर्षांपर्यंत कादंबरीलेखनाचा तिने जराही प्रयत्न केला नव्हता. तिने आपली पहिली कादंबरी ज्या प्रकाशकाकडे पाठवली त्याने ती स्वीकारली आणि १९५० मध्ये ती प्रसिद्ध झाली. तेव्हापासून तिची ८० पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. त्यामध्ये तिचं आत्मचरित्र आहे आणि निवडक कविताही आहेत. सर्व जगात तिच्या पुस्तकांची विक्री ८५,०००,००० च्या वर आहे. Northumberland मध्ये राहण्यासाठी तिने चौदा वर्षांपूर्वी पुन्हा उत्तरकडे प्रयाण केले.

---

कोणत्याही निर्मितीसाठी धीराची, चिकाटीची गरज असते. आपला विषय मनात मुरवत ठेवा. हळूहळू तो तुम्हाला उलगडत जाईल आणि एका क्षणी तुमच्या मेंदूत वीज चमकल्यासारखे होईल. त्या विजेचा लोळ तुमच्या हृदयापर्यंत पोचेल आणि मग प्रचंड अस्वस्थता तुम्हाला घेरून टाकेल. त्यानंतर मात्र आपल्या प्रतिभावैभवाचा अनुभव घेत राहायचे. निर्मिती आणि रचना यात घालवलेले ते खरोखरीचे तासन्तास. पण ते इतके आनंददायी असतात की मी सतत बारा-बारा, चौदा-चौदा तास टेबलाशी बसून लेखन केलंय. अर्थात त्या शिणवट्यातही एक सुख असतंच.

– *जॉर्ज लुई लेद्रे बफाँ*

---



अनुक्रमणिका

# लेखकांचा परिचय

## कोठडीविना बंदिवान

प्रमोएद्या अनंता तोईर हे इंडोनेशियातील अत्यंत प्रख्यात लेखक तर नक्कीच आहेत. कदाचित ते इंडोनेशियातील सर्वोत्तम लेखकही आहेत.

चणीला आज ७० वर्षे वयाचा सडसडीत बांध्याचा हा माणूस. त्यांचे बोलणे मनस्वी. त्याला उपरोधी विनोदाची झालर. प्रमोएद्या हे सतत स्वातंत्र्यावद्दल चिंतन करतात आणि खूप बोलतातही. त्यांच्या स्वतःच्या जीवनात स्वातंत्र्याचा अभाव असल्याकारणाने ते तसे करीत असावेत, हे जवळ जवळ निश्चित. प्रथम डच राज्यकर्त्यांनी त्यांना तुरुंगात डांबले. त्यानंतर सुकार्नोच्या राजवटीतही त्यांना तुरुंगाची हवा खावी लागली. सरतेशेवटी अध्यक्ष सुहार्तो यांच्या कारकीर्दीतही त्यांना तोच अनुभव पुन्हा घ्यावा लागला आहे. सुहार्तोच्या राजवटीत त्यांना शहर सोडून जाण्यास बंदी आहे. गमतीचा व तसाच लक्षात घ्यावयाचा भाग असा आहे की त्यांच्यावर इंडोनेशियन सरकारने आजवर अधिकृतपणे खटला कधीही भरलेला नाही.

तुरुंग हीच प्रमोदद्या यांची शाळा आणि काम करण्याची जागाही. १९४७ साली ते भूमिगत क्रांतीकारी संघटनेचे सभासद होते. डच राज्यकर्त्यांनी, त्या कारणावरून त्यांना तुरुंगात टाकले. तेथे एका वडिलधाऱ्या सहकाऱ्याच्या सूचनेवरून त्यांनी इंग्रजीच्या अभ्यासास सुरुवात केली. 'आम्ही डच राज्यकर्त्यांकडून पैसे मिळवत होतो. अर्थात काम करून. तानजुंग प्रिओक या गोदी विभागातील रस्ते झाडण्यास रोज सकाळी, आम्हास जावे लागत होते. हे काम करून जे पैसे मिळत त्यातून मी इंग्रजी पुस्तके विकत घेतली. स्टाईनबेक हे आपल्या आवडत्या लेखकांपैकी एक आहेत. त्यांचे लिखाण सोपे भासते. परंतु वस्तुतः प्रत्येक शब्द फारच काळजीपूर्वक निवडलेला असतो. प्रत्येक शब्द एक दृश्य अशी प्रतिमा आपल्याला देतो. जणू काही ते बोलपट आहेत, अशा स्वरूपात त्यांची पुस्तके वाचता येतात'. डच राज्यकर्त्यांनी तुरुंगात ठेवले असतानाच, प्रमोएद्यांनी हाच व्यवसाय करण्याचा निश्चय केला.'एका वडिलधाऱ्या इंडोनेशियन मित्राला हे सांगितले आणि त्या मित्राने मला इषारा दिला की लेखन हेच तुझ्या जीवनाची इतिश्री करील. परंतु मी त्या अगोदरच या क्षेत्रातली व्यसनी व्यक्ती झालो होतो!'

या 'लेखन'व्यसनी तरुणाने 'The Fugitive' (निर्वासित) ही कादंबरी हातावेगळी केली. या कादंबरीचा विषय त्यावेळी ऐन भरात असलेली इंडोनेशियन क्रांती हा होता. १९४९ साली एका डच प्राध्यापकाने, ही कादंबरी भूमिगत मार्गाने तुरुंगाबाहेर काढली. 'मी राजांचा पगारी भाट होणे कधीही पसंत केले नाही.

कारण 'भाटाचे' एकमेव काम राजाला खूष करणे हे असते.... आणि माझे स्वप्न इंडोनेशियन साहित्यातील विनीच्या लेखकांपैकी एक व्हावे हे होते.' असे प्रमोएद्या म्हणाले. त्यांची निवड व त्यांचे स्वप्न हे अगदी एकजीव होते. त्यात कोठेही व कसलाही सांधा वा शिवण नव्हती. १९६० साली इंडोनेशियाला स्वातंत्र्य मिळाले. त्या वर्षातली अत्यंत उत्कृष्ट कादंबरी म्हणून 'निर्वासित' ला एच.बी. यास्सीन पारितोषिक मिळाले. दहा वर्षानंतर इंडोनेशियात 'चीनचा इतिहास' हा ग्रंथ त्यांनी प्रसिद्ध केला. या ग्रंथाने सुकार्नो पेचात आले. त्यांनी प्रमोएद्या यांची रवानगी तुरुंगात केली. तेथे ते तब्बल दहा महिने होते.

एकेकाळी इंडोनेशियन कम्युनिस्ट पक्ष हा अतिशय बलाढ्य पक्ष होता. प्रमोएद्या त्या पक्षाचे कधीच सभासद झाले नाहीत. इंडोनेशियन कम्युनिस्ट पक्षाच्या सांस्कृतिक विभागातर्फे उघडलेली सांस्कृतिक आघाडी म्हणजे लेक्रा नावाची संघटना! (भारतातल्या भारत-सोव्हियट मित्र मंडळ, इप्टा यासारख्या संघटनांसारखी) त्या संघटनेचे ते प्रमुख प्रवक्ते होते. इंडोनेशियाचे अध्यक्ष सुकार्नोनी त्यावेळी असे जाहीर आवाहन केले की 'राजकारण हेच सेनापती आहे!' समाजाला मार्गदर्शन करण्याचा अधिकार फक्त राजकीय नेत्याला आहे. प्रमोएद्यांना ज्या लेखकांचे लिखाण पुरेसे क्रांतिकारक वाटत नव्हते. त्यांच्याविरूद्ध नियमिपणे त्यांनी प्रखर असे हल्ले चढविण्याचे काम चालूच ठेवले होते. हे आपले सारे लिखाण ते प्रसिद्ध करीत. त्यांचे म्हणणे असे आहे की या सान्या 'कमअसल' लेखकांना सैन्याचा पाठिंबा होता. अनेक इंडोनेशियन लेखकांच्या म्हणण्याप्रमाणे त्या हल्ल्यांची फलश्रुती, अनेक लेखकांची 'काळ्या यादीत' रवानगी होण्यात झाला. या आरोपाचे प्रमोएद्या फारच आवेषाने खंडन करतात. त्यांना हा आरोप साफ नामंजूर आहे. ते सांगतात 'लेक्राने' आपले मत मागितले, पण एखाद्याची रवानगी 'काळ्या यादीत' करण्याची सत्ता आमच्याकडे कधीही नव्हती. प्रमोएद्या यांचे हे म्हणणे खरे असेलही. परंतु सुकार्नोच्या राजवटीची अखेरची वर्षे ही मोठ्या घालमेलीची वर्षे होती. एकमेकांचे स्वागत 'वळलेल्या मुठी' आणि मर्डेका (स्वातंत्र्य) अशा घोषणांनी करण्याचा तो काळ! लोक-लेखक हे कोणाची ना कोणाची बाजू घेतच होते. तथापि जे कोणी 'लेक्रा' बाजूचे नसत ते आपल्या नोकरीस मुकत.

आजही अनेक इंडोनेशियन बुद्धिवाद्यांच्या मनात, प्रमोएद्यावद्दल आकस आहे. प्रमोएद्या हे अजूनही राजकीय विचार फैलावण्याचे साधन, या स्वरूपातच वाङ्मयाकडे पाहातात हेही स्पष्ट आहे. ते म्हणतात, 'इंडोनेशिया आणि तिसऱ्या जगातील देश यांतील वाङ्मय, हे राष्ट्रवादाच्या भावनेने भरलेले वाङ्मय आहे. अमेरिकनांना त्याची आवश्यकता नाही. परंतु एका नवोदित राष्ट्रात, सर्वच क्षेत्रात, यात वाङ्मयी आलेच, नेतृत्वासाठी स्पर्धा असते'.

इंडोनेशियात नेतृत्वासाठी जो संघर्ष चालू होता, त्याचा स्फोट १९६५ साली झाला. या स्फोटाचा परिणाम 'पक्षशुद्धी' आणि कत्तल यात झाला. आधुनिक

इतिहासात सर्वात मोठी अशी रक्तरंजित कत्तल मानण्यात येते, ती याच काळातली. सुमारे दहा लाखांहून अधिक लोकांना ठार मारण्यात आले! कम्युनिस्टांबद्दल सहानुभूती बाळगतात, या संशयावरून इंडोनेशियन सैन्याने हजारो लोकांना वेचून काढून त्यांची रवानगी तुरुंगात केली. यात प्रमोएद्या यांचा अंतर्भाव होता. त्यांच्यावर खटला करण्यात आला नाही. त्यांना बचावाची संधी मिळाली नाही. त्यांनी बुरू या अत्यंत दूरच्या बेटावर पाठविण्यात आले. बुरू हे बेट गुन्हेगारांच्या वसाहतीसाठी प्रसिद्ध आहे. या बेटावर या हत्याकांडाच्या अखेरीस बारा हजार कैदी होते.

'तुरुंगातील जीवन फारच खडतर होते. आम्हाला आपली स्वतःची घरे बांधावी लागत; आणि शेतीची देखभालही करावी लागे. कागद विकत घेण्यासाठी पैसे नसल्याकारणाने लेखन अशक्य होते. संध्याकाळी मी माझ्या मित्राला, (माझ्या संकल्पित वाङ्मयीन) गोष्टी सांगत असे, आणि जो कोणी गोष्टीचा तो भाग ऐकत असे, तो दुसऱ्या दिवशी सकाळच्या 'गिनती' च्या वेळी इतरांना सांगे. सकाळी हा गोष्टीचा भाग ऐकलेले लोक, जंगलात इतर विभागावरच्या लोकांना तो भाग सांगत. अशी ही साखळी होती. आणि प्रमोएद्या सांगतात, 'एक वेळ अशी आली की, त्यावेळी तुरुंगातल्या सर्वांचेच नीतिधैर्य अगदी पार नाहीसे झाले होते. मला चांगले स्मरत आहे. एका विभागात अकरा लोकांचा कमालीचा छळ करण्यात आला व यानंतर सैनिकांनी त्यांना ठार केले. या प्रसंगामुळे (तुरूंगातले अनेक लोक) पार खचून गेले होते. त्यांना त्यातून बाहेर पडण्यासाठी, मदत व्हावी म्हणून मी एका गोष्टीत निआई (NYAI) रखेली या नावाचे व्यक्तित्व निर्माण केले होते. ही गरीब, शिक्षणाचा अजिबात गंध नसलेली स्त्री, स्वतःचे शिक्षण करते आणि राज्यकर्त्यांना आव्हान देण्यासाठी उभी राहाते; आणि मला असे वाटते की त्या रखेलीच्या व्यक्तित्वाने प्रभावित होऊन, काही कैद्यांमध्ये तरी आपल्या स्वतःची माणूस म्हणून किंमत किती मोठी आहे याबद्दलची जाणीव निर्माण झाली.'

१९७३ च्या नोव्हेंबरमध्ये अध्यक्षीय कचेरीतून एक फतवा बाहेर पडला. बुरू' येथे जे कैदी आहेत, त्यांच्यापाशी जी कौशल्ये व कसबे आहेत त्यात त्यांना सुधारणा करता येईल. या फतव्याचा परिणाम प्रमोएद्या यांना कागद विकत घेण्याची परवानगी मिळण्यात झाला. आता आपला वेळ ते लिखाणात घालवू लागले. आपल्या कादंबरीच्या कार्बनी प्रतीच्या मोबदल्यात ते सिगारेट व खाद्यपदार्थ घेत. कालांतराने त्यांचे हस्तलिखित जप्त करण्यात आले. परंतु १९७९ साली त्यांना तुरुंगातून ज्यावेळी सोडण्यात आले, त्यावेळी तुरुंगातील इतर कैद्यांनी आपल्याकडे असलेल्या मूळ कांदबरीच्या कॉपीज जपून ठेवल्या होत्या. त्या एके ठिकाणी आणून त्यातून हस्तलिखित पुन्हा एकदा तयार झाले. या हस्तलिखितावरून एक वर्षानंतर 'This Earth of Mankind' (मानवाची ही वसुंधरा) ही कादंबरी प्रसिद्ध झाली. पहिल्या तीन आठवड्याच्या आत या कादंबरीच्या दहा हजाराहून अधिक प्रती संपल्या. इंडोनेशियात एखादी कांदबरी इतक्या झपाट्याने, तीही एवढ्या मोठ्या प्रमाणावर

छापते हे आजवर कोणास ठाऊक नव्हते. दोन महिन्यानंतर 'A Child of All Nations' (सर्व जगाचे बालक) ही कादंबरी प्रसिद्ध झाली. या दोन्ही कादंबऱ्यांवर तावडतोब बंदी घालण्यात आली. प्रमोएद्यानी या बंदीचे स्पष्टीकरण देताना सांगितले की बंदीमागचे सरकारी कारण ही पुस्तके मार्क्सवादी, लेनिनवादी विचारांचा प्रचार करतात हे आहे. परंतु मी केव्हाही मार्क्सवाद, स्टॅलिनवाद, साम्यवाद किंवा अन्य कोणत्याही वादाचा अभ्यास कधीही केलेला नाही. प्रमोएद्यांच्या प्रकाशकावर, त्यांचे कोठचेही पुस्तक प्रकाशित करावयाचे नाही अशी बंदी घालण्यात आली. इतकेच नव्हे तर सर्व मासिकांच्या संपादकांवर प्रमोएद्या यांच्या गोष्टी छापण्यावरही बंदी आहे व त्यामुढे जाऊन इंडोनेशियन सरकारने त्यांच्या नावाचा साधा उल्लेख करण्यावरही बंदी घालण्यात आलेली आहे. शिवाय याबाबत त्यांना इतरही धमक्या देण्यात येत असतात.

प्रमोएद्या हे सुहार्तो राजवटीला एक कायमची घृणास्पद अशी गोष्ट आहे असे वाटते. १९८८ आणि १९८९ साली तीन इंडोनेशियन तरुणांना ते 'The Glass House' (काचेचे घर) या पुस्तकाचे वितरण करीत होते, म्हणून अटक करण्यात आली. 'बुरू' या मालिकेतील ही चौथी व शेवटची कादंबरी. या जप्तीच्या वेळी इतरही अनेक पुस्तके जप्त करण्यात आली. त्यात 'Cherry Orchard' आणि 'Anna Karenina' या पुस्तकांचाही समावेश होता. या तरुणांना अनेक वर्षे तुरुंगात खटल्याशिवाय ठेवण्यात आले होते. त्यानंतर घातपाताच्या आरोपाखाली त्यांच्यावर खटला भरून, त्यांना दोषी ठरविण्यात आले होते. या शिक्षेविरुद्ध त्यांना अपिल करण्याची परवानगी नव्हती. सात ते साडे-आठ वर्षे अशा दीर्घ मुदतीच्या शिक्षा त्यांना ठोठावण्यात आल्या. इतर तरूण विद्यार्थ्यांना हा धमकीवजा इषारा होता. त्यांनी सरकारविरोधी राजकारणापासून दूर राहावे असे या धमकीच्या रूपाने बजाविण्यात येत होते. प्रमोएद्या या अशा खटल्यांमुळे नाउमेद झाले. "हा काय न्याय झाला? 'क्रांती' या शब्दाला काही अर्थ आहे का? डच साम्राज्यवाद्यांनी हे असे कधी केले असते अशी मला कल्पनाही करता येत नाही."

या लेखकाबरोबर जर कोणाचा अगदी साधासुधा संबंध आला, तरी त्याकडे संशयाने पाहिले जाते. एका जपानी मासिकाने प्रमोएद्या यांचे व्यक्तिचित्र ज्या पानावर छापण्यात आले होते, त्याच्या शेजारच्या पानावर एका इंडोनेशियन, पुस्तक-सजावट करणाऱ्या चित्रकाराचे व्यक्तिचित्रही त्या मासिकाने प्रसिद्ध केले. या कारणावरून, त्या इंडोनेशियन चित्रकाराला पोलिसांनी चौकीत बोलावले व त्याची तब्बल सहा तास तपासणी केली.

आणि म्हणूनच फारच थोडे जुने मित्र पूर्व जमातीत असलेल्या प्रमोएद्या यांच्या घरी चुकून-माकून त्यांना भेटावयास येतात. कधीकधी थोडे विद्यार्थी त्यांचे मार्गदर्शन घेण्यासाठी येतात. "मी त्यांना सांगतो, की जुन्या पिढीचे कार्य मूलतः संपलेले आहे. आमची पिढी एक पराभूत व अयशस्वी पिढी आहे. राष्ट्रासमोर

असलेलं, राष्ट्राला सताविणारे प्रश्न सोडविणे हे आता त्या तरूणांचे काम आहे. ते काम त्यांना करता येईल. ते शक्य आहे. पूर्व युरोपचे उदाहरण घ्या – परंतु त्यासाठी सांस्कृतिक दृष्टिकोनात बदल व्हावयास हवा," असे या लोकप्रिय लेखकाचे म्हणणे आहे. त्यांच्याकडे येणारे बहुतेक हे परदेशातले असतात. गुंतर ग्रास या प्रख्यात जर्मन लेखकाने स्वतः काढलेले कोंबड्याच्या झुंजीचे रेखाटन, प्रमोएद्या यांना अर्पण केले आहे. प्रमोएद्यानी हे रेखाटन आपल्या दिवाणखान्यात लावून ठेवले. प्रमोएद्या यांची तीन मुले, दोन नातवंडे आणि त्यांची पत्नी ही सारी त्यांच्याजवळ असतात. या साऱ्या प्रियजनांचा सहवास त्यांना प्रिय असूनही एकाकीपणाची भावना या माणसाला कायम सतावित. त्यांनी स्वतःच अशी कबुली दिली आहे की, गेली कित्येक वर्षे बैठक मारून त्यांना लिहिणेच शक्य झालेले नाही. त्यांच्या अभ्यासिकेत ते फारसे जात नसल्याकारणाने, त्या खोलीत धुळीचे थर साठले आहेत. त्यांच्या विभागातील सेनाधिकाऱ्याकडे त्यांना दर महिन्याला हजेरी लावावी लागते. इंडोनेशियातील कोठच्याही भागात त्यांना जर प्रवास करावयाचा असेल, तर त्यासाठी त्यांना प्रथम परवाना पैदा करावा लागेल. त्यांना आपल्या जीवाला धोका आहे याची जाणीव असल्याकारणाने, त्यांनी तो परवाना आजवर कधीच मागितला नाही. आपल्या घराच्या अवती-भवती असलेल्या विभागात, ते यापूर्वी धावण्याचा व्यायाम घेत असत, तोही आता त्यांनी सोडून दिला, कारण ते म्हणतात 'मी सुरक्षित आहे, असे मला वाटत नाही. आता धावण्याऐवजी ते घरातल्या दर्शनी खोल्यात शतपावली घालतात. त्यांच्या पुस्तकांना परदेशांत चांगली मागणी आहे. त्यावर त्यांची उपजीविका चालते. मात्र आपल्या राहात्या घरावर ते आणखी एक मजला चढविण्याच्या कामात सध्या व्यस्त आहेत. आणि इतके होऊनही इंडोनेशिया सोडून दुसऱ्या देशात जावे, यासंबंधी ते विचारही करण्यास तयार नाहीत.

"अर्थात मला बोलावणी आली आहेत. परंतु मला जाणे शक्य होईल की नाही याबद्दल मलाच काही माहीत नाही. आणि मी गेलोच तर मला परत येणे शक्य होईल असेही नाही. मी हा देश सोडण्याचा विचार कधीच करीत नाही. या इंडोनेशियात माझी मुळे आहेत. मग त्यासाठी जे भोगावे लागेल ते भोगलेच पाहिजे."

राजकीय संघर्ष, सामाजिक दारिद्र्य आणि सांस्कृतिक तणाव हे सारे घटक वाङ्मयीन समृद्धीला बहुधा उपकारक असावेत. इंडोनेशियात हे तीन्हीही घटक, मोठ्या प्रमाणात आढळून येतात आणि मोठ्या दिमाखाने वावरतात. या तीन्हीही घटकांच्या बाबतीत इंडोनेशिया तसा समृद्ध आहे. गंभीर प्रकृतीचे लिखाण करणाऱ्या लेखकांच्या अनेक पिढ्या त्या देशात निर्माण झाल्या हे खरे. परंतु आज तरी, आपल्या व्यवसायाशी सातत्याने इमान राखणारा, त्यासाठी हालअपेष्टा सोसणारा, प्रमोएद्या आनंता तोईर, यांच्या शिवाय दुसरा कोठचाही लेखक नाही.

इंडोनेशिया सोडून बाहेरच्या देशात त्यांच्या वाङ्मयाबद्दल फारशी कोणाला माहिती नाही. परंतु इंडोनेशियातील ते अत्यंत प्रज्ञावान. आणि साहित्याच्या अनेक क्षेत्रात लिहिण्याचे 'व्यसन' असल्यागत ते लिहितात. लघुकथा, कादंबऱ्या, भाषांतरे, ललितेतर साहित्य हे सारे प्रकार त्यांनी समर्थपणे हाताळले आहेत. लेखन हा व्यवसाय स्वेच्छेने पत्करून, त्यांना चाळीसाहून अधिक वर्षे झाली असावीत.

प्रमोएद्या यांचे समर्थ असे, जवळ जवळ सर्व लिखाण त्यांच्या तुरूंगवासाच्या काळानंतरचे. डच साम्राज्यवाद्यांनी त्यांना दोन वर्षे तुरुंगात डांबले होते (१९४७-१९४९). १९५० च्या सुरुवातीला काही पुस्तके प्रसिद्ध झाली. १९५०-१९६५ च्या दरम्यानच्या काळात अनेक राजकीय घडामोडी झाल्या. प्रथम इंडोनेशियन सरकार आणि इंडोनेशियन कम्युनिस्ट पक्ष यांचे संबंध मित्रत्वाचे होते. सरकार, कम्युनिस्ट पक्षास प्रत्येक बाबतीत प्रोत्साहन देत असे, आणि पक्षाने केलेल्या सूचना कार्यवाहीत आणीत असे. १९६५ साली या धोरणात आमूलाग्र असा फरक होऊन, कम्युनिस्ट पक्षाला १९६५ साली नेस्तनाबूत करण्यात आले. प्रमोएद्या हे त्या पक्षाशी संलग्न असलेल्या सांस्कृतिक संघटनेचे सभासद असल्याकारणाने त्यांना अटक करण्यात आली. इतर हजारो लोकांप्रमाणेच त्यांच्यावर खटला न भरता, त्यांना अटक का झाली याचे कारण न सांगता, त्यांना तुरूंगात बंदिस्त करण्यात आले. त्यांना ज्या 'सुलतानी' लहरीने अटक झाली, तशाच 'सुलतानी' लहरीने, त्यांची चौदा वर्षानंतर (१९६५-१९७९) सुटकाही करण्यात आली. प्रमोएद्या व त्यांच्या देशाचे सरकार, हे दोघेही एकमेकाना 'पूरक' ठरणारे व्यवसाय करीत असावेत! एकाने लिहावयाचे दुसऱ्याने त्याच्यावर बंदी आणावयाची.

'बुमी मानुसिआ' (मानवाची वसुंधरा) ही बुरी – तुरुंग मालिकेतील पहिली कादंबरी. ही मालिका एकंदर चार कादंबऱ्यांची आहे. प्रमोएद्यानी ही बुरी-गाथा १९७३ साली प्रथम आपल्या डोक्यात लिहिली. मग त्यांनी तुरुंगातील आपल्या मित्रांना कथन केली. त्यानंतर ती कागदावर शद्बवद्ध झाली. १९७५ साली त्यांना कागद विकत घेण्याची परवानगी मिळाली तेव्हाच ती शद्बवद्ध झाली. 'हस्ता मित्रा' या प्रकाशन संस्थेने ही मालिका १९८० साली प्रसिद्ध करण्यास आरंभ केला. एका वर्षाच्या आतच १९८१ साली सरकारने या कादंबऱ्यांवर बंदी आणली. इंडोनेशियात या कादंबऱ्या यापुढे छापता येत नसल्या तरी त्याचे मलेशियात पुनर्मुद्रण झाले आणि तेथेही त्या चांगल्या खपत आहेत. मलेशियात इंडोनेशियन भाषा अनेकांना समजते. अनेक भाषात या कादंबऱ्यांची भाषांतरे झाली आहेत. पण ही सारी भाषांतरे, ह्या कादंबऱ्या मलेशियात पुनर्मुद्रित झाल्यानंतरची आहेत. 'मानवाची वसुंधरा' आणि राष्ट्राचे बालक या दोन कादंबऱ्यांचे प्रथम इंग्रजी भाषेत भाषांतर झाले. ऑस्ट्रेलियन लेखक मॅक्स लेन याने ते भाषांतर केले आणि १९८२ साली ऑस्ट्रेलियन पेन्‍ग्विन या कंपनीने प्रकाशित केले. अमेरिकेत मोरी या प्रकाशनसंस्थेने प्रमोदद्या यांचा परिचय अमेरिकन वाचकास करून देण्याचे ठरविले आहे. त्यांची पहिली

कादंबरी 'देशोघडीला लागलेला' (Fugitive) या कादंबरीचे दोन वेळा इंग्रजीत भाषांतर झालेले आहे. विल्हेम सॅम्युअल यांनी केलेले भाषांतर हे त्या दोन भाषांतरातले उजवे भाषांतर असे जाणकार सांगतात. प्रमोएद्या यांच्या इतर साहित्याचेही भाषांतर करण्याचा त्यांचा इरादा आहे. प्रमोएद्या यांचा इंडोनेशियन सरकारने आजवर जो छळ केला तो लक्षात घेऊन सर्वांनी त्यांची दखल घ्यावयास हवी. पण तेवढ्या एकाच कारणासाठी त्यांच्या साहित्याची स्तुती करणे हा त्या साहित्यावर अन्याय होईल. कारण त्यांचे सारे वाङ्मय आपल्या साहित्यगुणांच्या जोरावर वाचकाचे लक्ष आपल्याकडे नक्कीच खेचून घेईल. काही परीक्षण लेखकांनी Fugitive या कादंबरीची तुलना सोलसेनिल्सिन, कामू, इजिप्शिअन लेखक माहफौज यांच्या कादंबऱ्यांबरोबर केली आहे. काहींनी त्याही पलीकडे जाऊन, हेमिंग्वे आणि बेकेट यांच्या साहित्याबरोबर प्रमोएद्या यांचे साहित्य कसे मिळते-जुळते आहे असे सांगितले आहे. आणखी एखाद्या मानदंडाची कोणाला आवश्यकता असल्यास गोर्डिमेर यांची निवड उघडपणे अपेक्षित आहे, कारण प्रमोएद्या आपल्या साहित्यातून भेदक अशी राजकीय, सामाजिक टीका करतात. या सगळ्या तुलनांत अगदी गोर्डिमेर यांच्याबरोबरची तुलना प्रमोएद्या यांच्या साहित्याचे मूल्यमापन करताना उपयोगी नाही, कारण प्रमोएद्या यांचे ललित वाङ्मय मूलतःच स्वयंप्रकाशी आहे.

इतिहास सारखा घडतच असतो. वैयक्तिक असे हेतू आणि हालअपेष्टा यांच्याकरवी इतिहास उलगडून दाखविणे हे काम, प्रमोएद्या फारच चांगल्या प्रकारे करतात. अशा इतिहास कामातून वैयक्तिक असे हेतू आणि हालअपेष्टात जीवन व्यतीत करणाऱ्यांना तत्कालीन सत्तेबरोबर दोन हात करावे लागतात. सत्ता म्हणजे नेमके काय हे समजावून घ्यावे लागते, त्याचा अर्थ लावावा लागतो, कधी कधी सत्तेशी जुळवून घ्यावे लागते, वेळप्रसंगी सत्तेची निर्मितीही करावी लागते. जावा हा विभाग इंडोनेशियाच्या मध्यभागी आहे. प्रमोएद्या यांची सर्वात महत्त्वाची अशी ललित वाङ्मयीन कथानके याच भागाला पार्श्वभूमी वापरून रचलेली आहेत. उदा. ब्लोरा आणि क्रांती, बुरू मालिकेतील कादंबऱ्या. याला अपवाद आहे तो 'कोरप्सी' (भ्रष्टाचार) या नावाच्या कादंबरीचा. ही छोटी कादंबरी १९५५ च्या सुमारास प्रसिद्ध झाली. या कादंबरीतले कथानक, जावापासून फार दूरवरच्या प्रदेशात घडते. म्हणूनच कदाचित त्यांची ही कादंबरी तितकीशी यशस्वी झाली नाही.

बुरू या मालिकेत एकंदर चार कादंबऱ्या आहेत, याचा उल्लेख मागे आला आहेच. या कादंबऱ्यातील कथानकाचा आरंभ, पूर्व जावात होतो. मग या कादंबरीचे कथानक सर्वत्र पसरते. प्रमोएद्या यांनी इंडोनेशियन राष्ट्रवादाची वाटचाल या कादंबऱ्यांतून शब्दबद्ध केली आहे. हॉलंडच्या साम्राज्यात जमा होणाऱ्या, त्या साम्राज्यशाहीने दडपल्या गेलेल्या, आणि सांस्कृतिक दृष्ट्या उध्वस्त झालेल्या वातावरणातून या राष्ट्रवादाची जडण-घडण होते. 'मानवाची वसुंधरा' या कादंबरीचे कथानक १८९५ नंतरचे. सुराबाया ही एका प्रांताची राजधानी. या ठिकाणी या

कादंबरीतल्या घटना घडतात असे दाखविण्यात आले आहे. आज जसे हे शहर बहुभाषी आहे, तसेच ते तेव्हाही होते. उत्साह, विजिगीषू वृत्तीने ओसंडणारे हे केंद्र. एका साम्राज्यशाहीतील ते केंद्र असल्याकारणाने, वसाहतवादातले सारे गुणदोष या केंद्रात होते. या अशा केंद्रातील समाजाच्या या सीमेवर, नेहमीच भयभीत अवस्थेत वावरणाऱ्या व्यक्ती या कादंबऱ्यात आल्या आहेत. या कादंबऱ्यांतील सर्व प्रमुख पात्रे, या अशाच प्रकारच्या व्यक्ती आहेत. या अशा वसाहतवादी समाजात गोरा आणि बिनगोरा या दोन वंशात असलेल्या सीमेचे उल्लंघन कोणासही करता येत नाही. थोडक्यात बिन-गोरा—गोरा या दोघांना अलग करणारी सीमा पक्की आहे. ती कोणालाही ओलांडता येत नाही. तसेच या सीमेचे रक्षण या वसाहतवादी साम्राज्यातील रखवालदार, मोठ्या काळजीपूर्वक करतात. इतका कडेकोट बंदोबस्त असला तरी या सीमा ओलांडून अनेक व्यक्ती जातात. अनेक या अशा प्रकारच्या विभाजनास आव्हानही देतात. या कादंबरीत दोन प्रमुख पात्रे आहेत. त्यांचाच प्रभाव, या कादंबरीतील कथानकावर आहे. त्यातील एक मिंके. त्यातील इंडोनेशियन पत्रकार तिरतो, आधी सोएरजो, याच्यावर मिंके ही व्यक्ती बेतलेली आहे. हे पत्रकार इंडोनेशियात १८८०-१९१८ स्मृतिआडच झाले होते. त्यांचा जीवनपट उलगडून प्रमोएद्या यांनी दाखविला आहे. तिरतोने आधी सोएरजो यांना सामाजिक विस्मृतीतून बाहेर खेचून, वर्तमानकालीन समाजासमोर आणले. या चरित्राचे नाव आहे, 'सांग पेमूला' (आरंभ करणारा). हे चरित्र १९८५ साली प्रसिद्ध करण्यात आले. तरितोप्रमाणेच मिंके हा एका उमरावाचा 'भूपती'चा मुलगा असतो. 'भूपती' याचा अर्थ एका जिल्ह्याचा प्रमुख. (भारतातील कलेक्टर, जिल्हाधिकारी). वसाहतवादी शासनात, एका विभागावर नियंत्रण ठेवणारा, व त्या विभागावर अनियंत्रित सत्ता गाजविणारा अधिकारी. या पोलादी पकडीचा व नियंत्रणाचा वापर, समाजाचे शोषण करण्यासाठी होतो. साम्राज्यवाद्यांच्या हातातील ते हुकुमी हत्यार. मिंके यांचा जन्म, जावामधील अत्यंत उच्च अशा सामाजिक घरात झालेला असल्याकारणाने, सुराबायातील डचभाषिक शाळेत त्याला प्रवेश मिळतो. असा प्रवेश मिळणारांपैकी ते पहिलेच. ही डच भाषिक शाळा, सर्व बाबतीतच उत्कृष्ट शाळा असते. मिंकेला आपल्याला उत्तम शिक्षण मिळाले आहे याचा अभिमान असतो. त्यापासून जो मानमरातब कौतुक प्राप्त होते, त्यात तो पार बुडून जातो. परंतु आपल्या वडिलांप्रमाणे आपण 'भूपती' व्हावे असे त्याला वाटत नाही. त्याची स्वप्ने निराळीच असतात. एखाद्या नेटिव्हाला अगदी मुलखावेगळी वाटावी अशी. त्याला लेखक आणि प्रकाशक व्हायचे असते. त्यावेळी इंडोनेशियात हे व्यवसाय खरोखरच जगावेगळे होते.

शाळेतून पास होऊन बाहेर पडल्यानंतर, मिंके ॲनलिएस नावाच्या एका इंडोयुरोपियन मुलीच्या प्रेमात पडतो. निआई ओन्टोसोरोह हे तिच्या आईचे नाव. निआई आपल्या जगावेगळ्या घरात राहाण्यासाठी मिंकेला आमंत्रण देते. निआई

ओन्येसोरोह हिचा जन्म एका खेडेगावातला. एक स्त्री आणि जावा रहिवाशी अशी ही निआई कोणाच्याही नजरेत भरेल अशी मुलगी. ही कादंबरी या निआईनेच व्यापली आहे. तिचा महत्त्वाकांक्षी बापं, तिला एक डच माणसाला थक्क विकतो. या डच मालकाचे नाव असते हेरमान मल्लामा. या डच माणसाकडे ठेवलेली बाई या नात्याने आपले राहिलेले आयुष्य कंठावयाचे असते. निआई या इंडोनेशियन शब्दाचा अर्थ रखेली असा आहे. हेरमान, ज्या काही गोष्टी निआईला शिकवतो त्या ती आपल्याशा करते. असे करीत असताना तिच्यातही आमूलाग्र बदल होतात. हरमानचा एकुलता एक औरस मुलगा हॉलंडमध्ये वास्तव्य करून असतो. त्याचे आपल्या बापाबरोबर भांडण होते. आणि या भांडणाचा परिणाम हरमानवर होऊन तो जवळ जवळ वेडाच होतो. पुढे हरमानवर एका स्थानिक वेश्यागृहात विषप्रयोग होऊन मृत्यू येतो. हरमानचा मुलगा, हरमानची सर्व मिळकत आपल्याला मिळावी म्हणून दावा करतो. दाव्याचा निकाल मुलाच्या बाजूचा होऊन, त्याला हरमानची मिळकत मिळतेच, पण त्याचबरोबर निआई ओन्टोसोरोहने विकसित केलेली सारी स्थावर मिळकतही मिळते, आणि आपल्या सावत्र बहिणीचा ताबाही त्याच्याकडे देण्यात येतो. या मध्यंतरीच्या काळात, मिंकेने, त्या सावत्र बहिणीबरोबर ॲनालिसबरोबर विवाह केलेला असतो. असे असूनही ॲनालीसला हॉलंडला आपल्या सावत्र भावाकडे रवाना करण्यात येते. या कादंबरी मालिकेतील, पुढच्या भागात, ॲनालिसला हॉलंडमध्ये मृत्यू येतो असे दाखविण्यात आले आहे.

या कादंबरीच्या संविधानाला अनेक पदर आहेत आणि तिच्यात सुप्त असे सामर्थ्यही प्रचंड आहे. असे असूनही या कादंबरीत सर्वच प्रसंगाची वर्णने अगदी वस्तुस्थितीला धरून आहेत. त्यात एकही अतिशयोक्ती नाही, स्वप्नाळूही नाहीत. वसाहतवादी देशात जी स्थिती अस्तित्वात असते, तिचे अतिशयोक्त असे वर्णन करण्याची खरे म्हणजे आवश्यकता असण्याचे कारण नाही. प्रमोएद्या ही वस्तुस्थिती जिवंत करतात. फारच थोड्या इतिहासकारांना ते जमले असते. सर्वच वसाहतवादी समाजात एक सामाजिक आणि त्याच्या जोडीला आर्थिक अशा दोन उतरंडी अस्तित्वात असतात. आर्थिक उतरंड ही कोणासही ओळखता येते. कोणाकडे किती पैसे आहेत, यावर त्या उतरंडीतील कोणाचेही स्थान नक्की करता येते. परंतु सामाजिक उतरंडीतील कोणाचेही स्थान ठरविताना अनेक घटक लक्षात घ्यावे लागतात. हे सारे घटक डोळयांना प्रत्यक्षपणे जाणवत नाहीत. त्या त्या समाजात राहाणारांना ते चांगलेच जाणवतात. वेळप्रसंगी त्यांना त्यांचा त्रासही होतो. या उतरंडीत कोणाचे स्थान कोठे असावे, याबद्दलचे नियमही तसे सूक्ष्म व काटेकोर असतात. ते समजण्यासाठी तसाच प्रज्ञावान मनुष्य हवा. इंडोनेशियातील सामाजिक उतरंडीचे वर्णन हा या कादंबरीतील कथानकाचा एक महत्त्वाचा भाग आहे. डच गोरे यांचे स्थान सर्वात पहिले, त्यानंतर गोरे इंडोयुरोपियन, त्यामागून कातडीचा रंग जितका जास्त गोरा तितके त्याचे स्थान अधिक वरचे. मग त्यातही तो गोरा-

डच-इंडोयुरोपियन ही कोणाचा संकर होऊन झालेली संतती आहे याला महत्त्व अधिक. त्यावर त्याचे त्या गोऱ्या-डच- इंडोयुरोपियन गटात स्थान ठरत असे आणि सरतेशेवटी इंडोनेशियन लोकांची उतरंड. ही कादंबरी या एवढ्या एकाच गोष्टीवर आधारित असलेले कथानक असते, तरीही ती चटकदार कादंबरी झाली असती. वाचकाचे मन गुंतवून टाकणारी कादंबरी झाली असती. एखाद्या विषयामुळे एखादी कादंबरी माणसा-माणसातल्या संबंधांबद्दल नवे ज्ञान देणारी कादंबरी होते असे नाही. या कादंबरीतले कथानक या उतरंडीच्या काटेकोर वर्णनाशी थांबत नाही. जावा परतंत्र होण्यात खुद्द जावातील रहिवाशीच अधिक होते व आहेत, याबद्दलची चर्चा, ही अतिशय बोचरी व दुःखदायक चर्चा, हा या कादंबरीतील आणखी एक महत्त्वाचा भाग. प्रमोएद्या हे अडचणीचे प्रश्न टाकीत नाहीत. त्या प्रश्नांना सामोरे जाऊन, त्याबद्दल सांगोपांग चर्चा करतात.

दुसऱ्या कोठच्याही प्रश्नापेक्षा त्याच प्रश्नाचा ध्यास प्रमोएद्या यांना आहे. त्यांनी तो प्रश्न ज्या प्रकारे हाताळला आहे, ते करणे विद्यमान इंडोनेशियन सरकारला मान्य नसावे. त्या कादंबरीवर अनेक कारणांमुळे बंदी आली असली, तरी या प्रश्नाची प्रमोएद्या यांनी केलेली चर्चा हे त्यातले एक कारण असावे. जावातील स्थानिक-नेटिव्ह-परिस्थितीची या कादंबरीतील प्रत्येक पात्र अगदी कसून तपासणी करते. या कादंबरीतील प्रत्येकालाच काहीना काही सामाजिक बदल हवा आहे. त्या सर्वांना असे वाटत असते की, जावातील परिस्थितीत त्रुटी आहेत. अर्थात त्याबद्दलचे प्रत्येकाचे मत व विचार वेगळा आहे. ड ला क्रोईक्स हा असिस्टंट रेसिडेंट आणि स्वतःची आग्रही मते असणारा उदारमतवादी शिक्षक मागदा पिटरस या दोघांनाही जावातील लोकांबद्दल सहानुभूती वाटते. मागदा पिटरस हा मिंकेचा यांचा शिक्षक होता. या विचारांसाठी, त्यांना त्रास सहन करावा लागतो. निआई ओन्टोसोरोह, मिंकेचे वृत्तपत्रव्यवसायातील मित्र आणि खुद्द मिंके स्वतः हे सर्व वसाहतवाद, वंशवाद आणि अन्याय, यांच्या कर्दमातून बाहेर कसे पडावे, या संबंधी विचार करीत असतात. म्हणून त्यांनाही त्रास सहन करावा लागतो. जावातील इंडोनेशियन उच्चपदस्थांचा वर्ग हा मित्रा, प्रतिष्ठा आणि सत्ता यांच्याबद्दल आधाशी असलेला, प्रगतीपथावर नेणाऱ्या जिज्ञासेचा अभाव असलेला आणि अकार्यक्षम, कालबाह्य, अवास्तव अशा संस्कृतीचा आग्रह धरणारा होता. या वर्गावर प्रमोएद्या यांनी या कादंबरीतील अनेक पात्रांच्या मुखाने, टीका केली आहे. इंडोनेशियासमोर असलेल्या प्रश्नांची सोडवणूक करण्याचा एकच मार्ग आहे. या सर्व प्रकारच्या सर्व टीकाकारांचे त्या मार्गाबद्दल एकमत आहे. त्यांच्यामते प्रत्येक इंडोनेशियन व्यक्तीने मिंकेसारखे होण्याचा प्रयत्न करावा. सुशिक्षित, विचारी आणि धैर्यवान अशा नव्या इंडोनेशियन माणसाची आदर्श प्रतिकृती म्हणजे मिंके, असे या सर्व टीकाकारांचे सांगणे आहे. मिंके हा अजून आपल्या कोशातून बाहेर आलेला नाही. तरीही तो सामाजिक सुधारणा व प्रगती यासंबंधी आग्रही असलेला राष्ट्रवादी आहे.



अनुक्रमणिका

भविष्यकाळात इंडोनेशिया कसा असावा याबद्दलची त्यांची मते, ही त्याने निआई ओन्टोसोरोह हिच्याकडून घेतलेली होती. 'जुना इंडोनेशिया' हा निआईच्या मते त्याज्य असा आदर्श आहे. ती आपल्या आई-वडिलांनाही त्याज्य ठरविते, कारण त्यांनी तिला रखेली होण्यास भाग पाडले. आपल्या परिस्थितीस कारणीभूत झालेला जुना इंडोनेशिया आणि आपले आई-बाप, या सर्वांवर सूड उगविण्याची तिची इच्छा आहे. स्वातंत्र्य, प्रामाणिकपणा, कर्तृत्व, आत्मविश्वास आणि तिने स्वतःच्या श्रमाने निर्माण केलेली व राखलेली संपत्ती याकरवी ती घेऊ पहात असलेला सूड प्रत्यक्षात येणार असतो. मिंकेचा उदारमतवादी शिक्षक, निआईची मते ऐकून आश्चर्यचकित होतो. निआई आपली मते जावानिझ, मलाया आणि डच या तिन्ही भाषेत परखडपणे व्यक्त करते. स्वतःबद्दल रास्त अभिमान असल्याकारणाने दुसऱ्याचे पाय धरणाऱ्या आणि बूट चारणाऱ्या नोकरांची तसेच कामगारांची तिला घृणा आहे. जावातील अंगभूत संवेदनक्षमशीलता आणि आधुनिक युरोपिय ज्ञान, या दोन्ही गोष्टी निआई एकत्रित करण्याच्या प्रयत्नात असते. ज्या प्रतिष्ठेला नमविता येणार नाही, अशा प्रतिष्ठेत या दोन्ही गोष्टी एकत्रित व्हाव्या असे तिला वाटत असते. डच वसाहतवाद हा घृणास्पद आहे हे खरे. पण तिच्या व्यक्तिमत्वातून असे सूचित होते की, डचांनाही जमेची बाजू आहे, आणि त्यांचे जे गुण आहेत, ते आपलेसे करण्यावाचून दुसरा कोठचाच मार्ग नाही, या निष्कर्षाप्रत ती आली आहे.

या शिवाय अन्य मार्ग नसेलही. परंतु जुन्या इंडोनेशियाचा त्याग करणे हे सोपे नाही आणि आनंददायीही नाही. मिंकेलाही नाही आणि या कादंबरीत मिंके हे पात्र निर्माण करणाऱ्या लेखकालाही नाही. मिंकेने आपल्या वडिलांचा अधिकार धिक्कारला आहे. या कादंबरीतले सगळेच बाप कमनशिबी, त्या मानाने माता चांगल्या नशिबवान आहेत. मिंकेने आपल्या वडिलांचा अधिकार धिक्कारून, सर्व इंडोनेशियन शहाणपणाबद्दल अनेक प्रश्न उपस्थित केले आहेत. परंतु तसे करतानाही तो दोलायमान अवस्थेतच आहे. जुना इंडोनेशिया नाहीसा होणे अपरिहार्य आहे. पण मिंकेच्या आईकरवी, प्रमोएधा सांगतात, की जुन्या इंडोनेशियन चालीरीती, त्याची खासियत, आणि त्याचे अंगभूत असे शहाणपण हेही त्या 'नाहीसे' होण्याबरोबरच जाणार आहे याचे दुःख आहे. या मातेचे हे प्रेमळ व आर्त उद्‌गार हृदयाला चटका लावणारे व हेलावणारे आहेत.

प्रमोएधा यांच्या वाङ्मयावर इंडोनेशियात का बंदी घातलेली आहे? काही कारणे राजकीय आहेत, हे खरेच. तथापि सूडभावना हेही त्यामागील एक संभाव्य कारण. इंडोनेशियन सरकारचा दावा ते मार्क्सवादी आहेत असा आहे. मार्क्सवादाला इंडोनेशियात बंदी आहेच. म्हणून मार्क्सवादी कादंबऱ्यांवर बंदी, हा झाला सरकारी युक्तिवाद. प्रमोएधा यांच्या कादंबऱ्या मार्क्सवादी आहेत हे सिद्ध करणे कठीण आहे. हाही मुद्दा सरकारला मान्य आहे. पण सरकारच्या मते, जरा सूक्ष्मात जाऊन तपासणी केली (संत विनोबा जसे सूक्ष्मात जात असत त्यानुसार) की, त्या कादंबरीत

फारच चतुराईने मार्क्सवाद आणलेला आहे, हे सिद्ध होते! त्यांच्या कादंबरीवर बंदी घालणे ही एक राजकीय दडपशाहीच आहे. ही कृती करून इंडोनेशियन सरकार, आपल्या विरोधकास धोक्याचा इषारा देत आहे. तोच इषारा बाहेरच्या आम जनतेसाठी! सर्वांना असे सांगण्यात येते की, सैन्य जागरूक आहे आणि त्या सैन्याने देशद्रोही आणि (भारतातील डांगेछाप) रशियनधार्जिण्या कम्युनिस्टांचा नायनाट केला आहे. या दोन्ही गोष्टींबद्दल इंडोनेशियन आम जनतेने सैन्याचे ऋणी राहिले पाहिजे. प्रमोएद्या यांना इंडोनेशियन लेखकांत आणि इतर बुद्धिजीवी वर्गात अजिबात पाठिंबा नाही. (याबद्दल आश्चर्य मानण्याचे कारण नाही. महाराष्ट्रातले, अरूण साधू, कुमार केतकर आणि गो. पु. देशपांडे यासारख्या सामान्य मार्क्सवाद्या-पासून तो अतिसामान्य मार्क्सवाद्यांची नावे आठवावीत. अरूण साधूंची कादंबरी मुख्यमंत्री अंतुल्यांनी त्याज्य ठरवली. खुद्द अरूण साधू याबद्दल चिडीचूप. त्यांची पालखी उचलण्यात अनेक भोई अहमहमिकेने तयार होते. काहींच्या बाबतीत हा भारतीय भोळसटपणाचा आणि अनेकांच्या बाबतीत आपमतलबाचा प्रकार होता हे आपण सारे मराठी वाचक जाणतोच.)

१९६०-६६ च्या दरम्यान प्रमोएद्या यांनी राजकीय, सांस्कृतिक क्षेत्रात जी मते व्यक्त केली, ज्या भूमिका घेतल्या, त्या अजूनही कोणी विसरलेले नाही. ती मते लक्षात घेऊन, इतर लेखकांना त्यांची बाजू घेऊन भांडावे असे वाटत नाही. पेन या आंतरराष्ट्रीय संघटनेने प्रमोएद्यांना एक पारितोषिक जाहीर केले, त्यावेळी एका प्रसिद्ध आणि मान्यवर इंडोनेशियन पत्रकाराने त्याबद्दल जाहीर नापसंती व्यक्त केली होती.

त्यांच्या वाङ्मयावर बंदी घालण्यात येण्याचे आणखी एक कारण त्यांच्या वाङ्मयात अनस्यूत आहे. अर्थात बंदी घालावी असा हुकूम काढणारे जे अधिकारी आहेत, त्यांनी त्यांचे वाङ्मय वाचले असावे असे गृहीत धरलेले आहे. प्रमोएद्या यांच्या कादंबऱ्यात मार्क्सवाद फारसा नाहीच, किंवा त्यांच्या पिढीतले जे राष्ट्रवादी विचारवंत होते/आहेत, त्या सर्वांच्या विचारात मार्क्सवाद जितपत डोकावतो, तेवढाच प्रमोएद्या यांच्या कादंबऱ्यात डोकावतो. तथापि इंडोनेशियाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतरही पूर्वी डच साम्राज्यशाहीत ज्या प्रकारची दडपशाही चालू होती तशीच अजूनही चालू आहे, असा जोरदार आरोप प्रमोएद्या यांनी केला आहे. या अशा प्रकारच्या लिहिण्याने जो सामाजिक व राजकीय बदल अजून इंडोनेशियात झालाच नाही. त्याकडे दुर्लक्ष करणे कठिण होते. या एका कारणासाठीच त्यांच्या वाङ्मयावर बंदी घालण्यात आली असावी.

*(प्रा. डॅनिएल पेव्ह आणि पत्रकार व लेखक श्रीमती सुत्त्रव मार्वे यांच्या लेखावरून)*

*– नाना जोशी*

# डोस्टोएवस्कीचा कारावास
## (उत्तरार्ध)
## श्रीकृष्ण कामत

डोस्टोएवस्कीनं त्याचा धाकटा भाऊ अँड्री याला पाठवलेल्या पत्रात लिहिलं होतं : '(कारावासाची) ती चार वर्षं हा असा काळ मी समजतो ज्यात मी जिवंत गाडला गेलो होतो आणि शवपेटीत मला बंदिस्त केलं गेलं होतं. तो काळ किती भयानक होता हे तुला सांगायला माझ्यापाशी बळ नाही. ते भोग शब्दातीत, असीम होते कारण प्रत्येक तास, प्रत्येक मिनीट एखाद्या फत्तरागत माझ्या आत्म्यावर भार ठेवून होते.'

या भयानक कालखंडामधील आठवणी आणि नोंदलेल्या टिपणांची वही सोबत घेऊन डोस्टोएवस्की १५ फेब्रुवारी १८५४ रोजी तुरुंगाबाहेर पडला. पण त्याच्या लिखाणावर निर्बंध घातले गेले असल्यामुळं आठवणींना शब्दबद्ध करणं त्यानं लांबणीवर टाकलं. १८५६ मध्ये त्यानं ए. माईकोवला लिहिलं : 'काही वेळेला जेव्हा मला काहीच करण्याजोगं नसतं, तेव्हा माझ्या कारावासाच्या आठवणी मी लिहून काढतो, ज्या अत्यंत उत्कंठावर्धक आहेत. सहज जाता जाता, इथं व्यक्तिगत असं फारच थोडं आहे.' परंतु हा विषय साहित्यक्षेत्रात पुनरागमन करण्याच्या दृष्टीनं त्याला धोकादायक वाटला. महत्प्रयासानं लेखन प्रकाशित करण्याची परवानगी, ही कादंबरी प्रसिद्ध करून आपण गमावून बसू ही धास्ती त्याला वाटली. ती त्यानं बाजूला सारली आणि 'अंकल्स ड्रीम' व 'द व्हिलेज ऑफ स्टेपनचिकोवो' या कादंबऱ्या लिहून पूर्ण केल्या आणि नंतर तो या संकल्पित कादंबरीकडे वळला. ९ ऑक्टोबर १८५९ रोजी त्याचा थोरला भाऊ मिखाईल याला त्यानं पत्र पाठवलं. त्या पत्रात त्यानं लिहिलं : "द हाऊस ऑफ द डेड" माझ्या मनात संपूर्णपणे आणि निश्चित स्वरूपात साकार झालेली आहे. सहा किंवा सात छापील फॉर्मचं (९६ किंवा ११२ पृष्ठांचं) ते एक छोटं पुस्तक होईल. माझं व्यक्तिमत्व नजरेत भरणार नाही. एका अज्ञात व्यक्तीची ही टिपणे आहेत; परंतु त्यातील वाचनीयतेची मी हमी देतो. ही वाचनीयताच यातील एक महत्त्वपूर्ण बाब असेल. हे लिखाण गंभीर असेल, उदास असेल, गंमतीशीर असेल आणि त्यात खास कारावासाच्या छटा असलेलं गांवढळ संभाषण असेल (ते बोलत असतानाच मी लिहून काढलेली बरीचशी वक्तव्यं मी तुला वाचून दाखवली होती), साहित्यात कुणी ऐकली नसतील अशा व्यक्तींची चित्रणं असतील, ते हृदयस्पर्शी असेल आणि शेवटचं अत्यंत महत्त्वाचं – माझं नाव ....'

'द हाऊस ऑफ द डेड : अ नॉव्हेल इन टू पार्ट्स' प्रथम १८६० मध्ये 'द रशियन वर्ल्ड' या वर्तमानपत्रामधून प्रसिद्ध झाली. तिची प्रारंभीची काही प्रकरणं मिखाईलच्या 'टाइम' या नियतकालिकात पुन्हा छापण्यात आली. पुढं १८६१-





६२ मध्ये ती 'टाइम' मधूनच क्रमशः प्रसिद्ध करण्यात आली.

या काळात सेन्सॉरनं निर्बंध बऱ्याच प्रमाणात शिथिल केले होते. छापल्या जातील असा विचार मनाला स्पर्शून जाणंही मुष्कील होतं अशा साहित्यकृती प्रकाशित होत होत्या. यात 'हाऊस ऑफ द डेड' वाचकांच्या हाती पडली. या कादंबरीमधील गुन्हेगारांच्या आयुष्याचं भेदक, प्रत्ययकारी चित्रण, शिवाय तिचा लेखक हा अलिकडेच तुरुंगातून सुटून आलेला राजबंदी, या बाबींमुळे सेन्सॉर बोर्डातही थोडीफार खळबळ माजली. पण तरीही ती प्रसिद्ध करण्यास हरकत घेण्यात आली नाही. अर्थात्, सेन्सॉरला जो मजकूर आक्षेपार्ह वाटण्याची शक्यता डोस्टोएवस्कीला वाटली होती, तो त्यानं आधीच बाजूला काढून ठेवला होता. पुस्तकातही तो मजकूर पुढं समाविष्ट करण्यात आला नाही.

आपल्या कादंबरीमधील वस्तुस्थितीच्या योगदानाचं मोल डोस्टोएवस्कीनं अचूक ओळखलेलं होतं. एका अज्ञात आणि भयावह जगातून ज्याची नुकतीच मुक्तता झाली होती, अशा एका कैद्याच्या या कहाणीला ऐतिहासिक अस्सलपणाचं परिमाण लाभलेलं होतं. ही कादंबरी वाचून वाचक स्तिमित झाले. त्यांना वाटलं, अधोलोकात उतरलेला हा लेखक म्हणजे डान्टेचा नवा अवतार आहे. परंतु हा अधोलोक कवीच्या कल्पनाविश्वातला नव्हता, प्रत्यक्षातला होता. हे एक खास असं विश्व होतं, इतरत्र आढळणार नाही असं. इथं त्याचे असे विशिष्ट कायदेकानून होते, स्वतःचा असा पेहराव होता, स्वतःच्या अशा रीतीभाती आणि चालीरूढी होत्या आणि ते होतं मृत्यूचं एक जितंजागतं घर, अन्यत्र आढळणारही नाही असं इथलं जीवन; आणि इथली माणसं एकमेकांपासून दूर. या विश्वात घडणाऱ्या घटनांना आपण केवळ साक्षी आहोत, आपण स्वतः जे काही पाहिलं, ऐकलं, ते जसंच्या तसं सरळपणे सांगतो असा लेखक दावा करतो. पण ॲलेक्झांडर पेत्रोविच गोरीआनूचिकोव या निवेदक–कैद्याच्या कहाणीमधून डोस्टोएवस्कीचा आवाज कानी येतो. ध्यानी येतं की 'तटस्थपणा' हे वाचकांच्या मनावर घटनांचा ठसा उठावदार करण्यासाठी वापरण्यात आलेलं एक कलात्मक साधन आहे.

'हाऊस ऑफ द डेड' मध्ये कारागृहातील जीवन, कैद्यांची स्वभाववैशिष्ट्ये, दरोडेखोरांचा इतिहास, प्रत्येक कैद्याचा प्रकृतीधर्म इत्यादींचं वर्णन, गुन्ह्याच्या मानसशास्त्रासंबंधीचं चिंतन, तुरुंगातील परिस्थितीचं चित्रण, तत्त्वज्ञान, लोकरूढी – ही सारी व्यामिश्र सामग्री कालसंगतीचं बंधन न पाळता मुक्तपणे विखुरण्यात आली आहे. लेखक झपाझप फटकारे मारून एक स्थूल चित्र रेखाटतो : किल्ला, कारागृह, मातीची तटबंदी, कारागृहाचं आवार, इर्तिश नदीच्या काठावरील कामं; कैदी, त्यांचं बाह्य व्यक्तिमत्व, त्यांचा धंदा, त्यांच्या रीतीभाती; ज्यांना डागाळण्यात आलं आहे, साखळदंडात जखडून टाकण्यात आलं आहे, अशा माणसांच्या घोळक्यातून काही प्रातिनिधिक कैद्यांना पुढं आणण्यात आलं आहे; कारागृहातील पहिली सकाळ, चहा घेतानाचं संभाषण, दारू झोकणं, शिवीगाळ आणि दंगामस्ती; संध्याकाळ –

शेजारी आपापल्या फळकुटाच्या अंथरुणावर आडवे झालेले सहकैदी. त्यांच्या हकीकती, मृतांच्या निवासस्थानावरील चिंतन – कारावासातील पहिल्या दिवसाची ही काही क्षणचित्रं. नंतर कथा पुढं सरकत जाते. तुरुंगातील महिन्यांचा कालपट उलगडत जातो. इर्तिशवरील कामकाजाचा विषय पुन्हा येतो; नवीन भेटीगाठी आणि परिचित यांचं वर्णन केलं जातं; कैद्यांच्या आयुष्यातील खास असे प्रसंग रेखाटले जातात. नंतर नानाविध चित्रमयी घटनांवर पहिल्या वर्षाची कथा केंद्रीभूत केली जाते : न्हाणीघर, ख्रिसमसचा सण, नाट्यप्रयोग, ईस्टर. त्यापुढील वर्षांच्या घटना दुसऱ्या भागात संक्षेपानं दिल्या जातात. काळाचा ओघ जवळजवळ हरपला जातो. निवेदनाचं 'परस्पेक्टिव्ह' असं आहे : अग्रभाग (पहिला दिवस) लख्खपणे उजळण्यात आला आहे आणि सारे तपशील नेमकेपणानं चित्रित करण्यात आले आहेत. दुसरा स्तर (पहिला महिना) मंद प्रकाशात आहे आणि काहीशा स्थूलपणानं सादर करण्यात आला आहे. त्यापुढील स्तर अधिकाधिक धूसर बनत जातो तसतसं चित्रण अधिकाधिक ढोबळ बनत जातं. बहुस्तरीय रचना आकृतीबंधाला अनुरूप बनते : कारागृह निश्चल आहे; ते आहे 'मृतांचं निवासस्थान', गोठून गेलेलं. फक्त लेखक तेवढा पुढं सरकत आहे. अधोलोकाच्या वेटोळ्यामधून तो खाली उतरू लागतो. प्रारंभी तो बाह्य गोष्टींचं निरीक्षण करतो; अत्यंत ठळक आणि लक्षणीय बाबीच आत्मसात करतो. नंतर कारागृहाच्या जीवनात सहभागी होतो; अखेरीस, या विश्वाचा तळठाव गाठण्याचा प्रयत्न करतो; त्यानं जे पाहिलं होतं त्याचं नवं रूप त्याला जाणवतं. मनावर उमटलेल्या प्रारंभीच्या गोष्टींचं पुनर्मूल्यमापन करतो; त्या आधारे स्वतःचे निष्कर्ष बळकट करतो. तो परिघाकडून केंद्रस्थानी येतो, पृष्ठभागाकडून तळाशी उतरतो. यापूर्वी परामर्श घेतलेल्या विषयांकडे पुन्हा वळून ते विशद करतो. दृष्टिकोन हळूहळू बदलत जातो आणि परिचित चित्र प्रत्येक वेळी नव्या पद्धतीनं प्रकाशित केलं जातं, नवा अर्थ प्राप्त होतो.

एक साहित्यकृती म्हणून 'हाऊस ऑफ द डेड' चा आस्वाद आपण घेऊ शकतो, तद्वतच, डोस्टोएवस्कीच्या निष्ठांच्या पुनरुज्जीवनाला, त्याच्या नैतिक आणि आत्मिक विकासाला कारावास कसा कारणीभूत ठरला हे या कादंबरीच्या आधारे जाणून घेता येणं आपल्याला शक्य आहे आणि हे जाणून घेतल्यानं लेखक म्हणून, विचारवंत म्हणून भावी डोस्टोएवस्की आपल्याला अधिक समजू-उमजू लागतो.

डोस्टोएवस्कीची सांपत्तिक स्थिती कनिष्ठ वर्गाला साजेशी असली तरी तो पांढरपेशी होता. कावाडकष्ट करण्याची त्याच्या शरीराला सवय नव्हती. सश्रम कारावासाची शिक्षा त्याला झाली आणि ओम्स्कच्या तुरुंगातील खातेऱ्यात जीवन कंठण्याचे, शारीरिक कष्ट उपसण्याचे भोग त्याच्या नशिबी आले. टोबाल्स्क येथील तुरुंगातल्या आठवडाभराच्या वास्तव्यात ओम्स्कच्या तुरुंगात आपल्याला कुठल्या परिस्थितीला सामोरं जावं लागणार आहे याची यथार्थ नसली तरी बरीचशी कल्पना त्याला आली होती. परंतु कल्पनेहून प्रत्यक्ष अधिकच खडतर असल्याचं त्याला प्रकर्षानं जाणवलं.

बंदिवासाच्या प्रारंभीच्या काळातील जीवन डोस्टोएवस्कीला एखाद्या दुःस्वप्नागत वाटू लागलं याला दोन गोष्टी प्रामुख्यानं कारणीभूत झाल्या होत्या. पहिली : कर्दनकाळ मेजर क्रिवत्सोव. दुसरी : इतर कैद्यांकडून त्याला मिळणारी वागणूक.

मेजर क्रिवत्सोवला कैद्यांनी टोपण नाव दिलं होतं : 'अष्ट-नेत्री'. कारण तुरुंगाच्या कँपात कुठं काय चाललंय याची खडान्‌खडा माहिती त्याला असायची. काही गोष्टी त्याची नजर टिपत असे, काही गोष्टी त्याचे खबरे त्याच्या कानावर घालत असत. मेजर कैद्यांवर अक्षरशः तुटून पडायचा. त्यासाठी जाळ्यात अडकलेल्या माशीवर झडप घालणाऱ्या कोळ्याच्या तत्परतेनं तो असेल तिथून धावत यायचा. कैद्यांनी तुरुंगात पाऊल टाकलं रे टाकलं की त्यांची डोकी भादरण्याचा आणि त्यांची सारी चीजवस्तू, कपडालत्ता ताब्यात घेण्याचा त्याचा हुकूम सुटायचा आणि अखेरीस तो धमकावणी द्यायचा : 'नीट वागायचं, लक्षात ठेवा! तुमच्या तक्रारी माझ्या कानावर येता कामा नयेत! आल्या तर ...' शारीरिक शिक्षा. साध्या गुन्ह्याबद्दल – चाबकाचे फटकारे.

त्याच्या हातून चाबकाचे फटकारे खाण्याचा दुर्धर प्रसंग एकदा डोस्टोएवस्कीवर ओढवला होता. कोणीच कैदी आपल्या फेरीची अपेक्षा करत नसतो, अशा वेळी पाहणी करण्यासाठी अवचित बाहेर पडायचं, ही क्रिवत्सोवची खासीयत. असाच एक दिवस तो फेरी मारत असताना बराकीमधील अंथरुणावर पहुडलेला डोस्टोएवस्की त्याच्या नजरेनं टिपला. कामाच्या वेळी त्याला आराम करताना पाहून मेजरचं कोपिष्ट माथं भडकलं. डोस्टोएवस्की आजारी असल्यामुळे त्याला विश्रांती घेण्याची सूट देण्यात आल्याचं पहाऱ्यावर असलेल्या गार्डनं क्रिवत्सोवला सांगितलं. तेव्हा रागानं धुमसणारा क्रिवत्सोव त्याच्या अंगावर ओरडला, "तुम्ही लोक त्याला पाठीशी घालताय." आणि डोस्टोएवस्कीला तात्काळ फटक्यांची शिक्षा देण्याचं फर्मान त्यानं सोडलं. शिक्षेची अंमलबजावणी करण्याची तयारी सुरू झाली. ही वार्ता कुणीतरी जाऊन कमांडर जनरल द ग्रेव्ह याच्या कानावर घातली. कमांडर त्वरित घटनास्थळी आला. त्या भल्या गृहस्थानं आल्या आल्या क्रिवत्सोवनं दिलेली शिक्षा रद्द केली आणि आजारी कैद्याला शिक्षा करण्याचं बेकायदेशीर कृत्य करण्याचा प्रयत्न केला म्हणून मेजरची कैद्यांदेखत कानउघाडणी केली. डोस्टोएवस्की थोडक्यात बचावला. पण संधी मिळताच वा ती शोधून काढून, 'अष्ट-नेत्री' फटक्यांच्या शिक्षेची अंमलबजावणी कधी करील याचा नेम नसल्यामुळं, त्या धास्तीचं दडपण डोस्टोएवस्कीच्या मनावर सतत राहिलं, क्रिवत्सोव बडतर्फ होऊन जाईपर्यंत. या सततच्या धाकानं फटक्यांच्या शिक्षेविषयी त्याच्यामध्ये विकृत कुतूहल जागं केलं होतं. ज्यांना फटक्यांची शिक्षा झाली होती अशा कैद्यांना तो त्यासंबंधी विचारत असे. त्याला जाणून घ्यायचं असे, त्या वेदना कशा प्रकारच्या असतात, त्यांची तुलना अन्य कुठल्या वेदनांशी करता येईल. 'मला खरोखरीच कळत नव्हतं, मला एवढं जाणून का घ्यावसं वाटतंय. मला फक्त एक गोष्ट आठवते, ते कुतूहल

फुकाचं नव्हतं. मी पुन्हा सांगतो, मी भयंकर अस्वस्थ व्हायचो, हादरायचो आणि कैद्यांच्या तोंडून तो अनुभव ऐकताना माझं काळीज गळ्याशी यायचं आणि भयंकर धडधडायचं'.

अंगावर शहारे आणणारं तुरुंगातील राहाणीमान, क्रिवत्सोवचा अमानुष छळ हे डोस्टोएवस्कीला अनपेक्षित नव्हतं. त्याला पूर्णपणे अनपेक्षित होती ती इतर कैद्यांकडून त्याला मिळणारी वागणूक आणि हा अपेक्षाभंग दारूण होता.

पीटर आणि पॉल किल्ल्यात आपला भाऊ मिखाईल याचा निरोप घेतेसमयी डोस्टोएवस्कीनं त्याला धीर दिला होता; सांगितलं होतं की त्याला कुठं जंगलात पाठवलं जात नाहीये, हिंस्त्र श्वापदाच्या तोंडी. तो जातोय तिथं माणसंच असणार, त्याच्यासारखी, कदाचित त्याच्याहून चांगली.

सामान्य जनाविषयीच्या त्याच्या या कल्पनांना खतपाणी घातलं होतं १८४० च्या दशकातील रशियाच्या मानवतावादी आणि भूतदयावादी विचारप्रणालींनी; तद्वतच १८३० च्या आसपास प्रसिद्ध झालेल्या फ्रेंच कादंबऱ्यांनी; विशेषतः ह्यूगो आणि जॉर्ज सँड यांच्या कादंबऱ्यांनी. अशा प्रकारच्या साहित्यकृतीमधून बहुजन समाजाचं उदात्तीकरण केलेलं असायचं. लेखकांनी गृहीतच धरलेलं असायचं की 'ते (सामान्य जन) चांगले आहेत, नीतिवान आहेत, धनिकांहून अधिक चांगले, अधिक नीतिवान. Abbe Lamennals यानं आपल्या 'Paroles d'un Croyant' मध्ये हे उदात्तीकरण एवढ्या जोरदारपणे केलेलं आहे, तेवढं अन्य कुण्या लेखकानं केलं नसेल. या पुस्तकाचं रशियन भाषांतर डोस्टोएवस्कीच्या आग्रहानं आणि प्रोत्साहनानं मिल्यूकोवनं केलं होतं आणि त्याचं वाचन एकदा पाम-ड्युरोवच्या वर्तुळात करण्यात आलं होतं. हाच Lamennals दुसऱ्या एका पुस्तकात खातरजमा झाल्यागत म्हणतो : 'सामान्य जन सच्चे असतात. ते अज्ञानी आहेत, त्यांच्या अंगावर लक्तरं आहेत, दर दिवशीची रोजीरोटी त्या दिवशीच्या कामातून ते मिळवतात, पण हाच बहुजन समाज अद्यापीही समाजाचा एक सुदृढ घटक आहे आणि त्यांच्यामध्ये आपल्याला आढळते निखळ सद्भावना, निखळ न्यायीवृत्ती, निखळ भूतदया' आणि याच निष्ठा डोस्टोएवस्कीच्या सैबेरियनपूर्व लिखाणात प्रामुख्यानं आढळतात. मिखाईलपाशी वर उल्लेखिलेले उद्गार डोस्टोएवस्कीनं काढले होते ते याच निष्ठेचे निदर्शक आहेत. त्याची ही निष्ठा लक्षात घेता, असं अनुमान काढता येणं शक्य आहे की, तुरुंगातील अशा या लोकांच्या प्राक्तनात सहभागी होण्यासाठी तो निघाला होता आणि त्याच्या निष्ठांना दुजोरा मिळेल असंच हार्दिक स्वागत त्यांच्याकडून होईल असा त्याला दृढ विश्वास होता. परंतु प्रत्यक्षात त्याला आढळलं ते त्याचं क्रौर्य आणि पशुतुल्य वर्तन, मेजर क्रिवत्सोवच्या निष्ठुरतेला तेवढ्याच समर्थपणानं साथ देणारं.

डोस्टोएवस्की तुरुंगात दाखल झाला त्याच्या दुसऱ्या दिवशीची ही घटना. पाचावर धारण बसल्यागत त्यानं ही घटना 'हाऊस ऑफ द डेड' मध्ये नोंदवलेली

आहे. ती घटना अशी : तो आणि ड्युरोव ग्लासभर चहा विकत घेण्यासाठी म्हणून तुरुंगाच्या प्रशस्त भटारखान्यात शिरले. ही चैन तुरुंगाच्या रेशनमध्ये समाविष्ट नव्हती. परंतु ज्या गोष्टी विकत घेणं कैद्यांना परवडत असे त्या गोष्टी आचारी त्यांना पुरवत असे. डोस्टोएवस्की व ड्युरोव यांनी पैसे देऊन चहा घेतला आणि चहाचे घुटके घेत ते बसले होते. त्यांच्या अवतीभवती इतर कैदी, त्यांनी विकत घेतलेल्या खाद्यपदार्थावर ताव मारण्यात दंग होते. आपल्या दिशेनं वळलेल्या त्यांच्या जळजळीत नजरा न बघितल्याचा बहाणा हे नव्यानंच आलेले दोन कैदी करत होते. अचानक दारूनं तर्र झालेल्या गाझिननं त्या दोघांना हटकले. हा तार्रर कैदी अवाढव्य माणूस होता. प्यालेला असला की तो विद्रूप व्हायचा. त्यानं या दोन 'जंटलमनां'ना खवचटपणे विचारलं की त्यांच्या या 'मेजवानी'साठी त्यांनी द्रव्य कुठून संपादन केलं? त्यांची रवानगी सैबेरियात झालीय ती काय अशी चहा-पानाची मौज लुटण्यासाठी? या त्याच्या खोचक आणि बोचक प्रश्नांना उत्तरं न देता ते दोघेही निमूट राहिले. तेव्हा खवळून गाझिननं जवळच पडलेला पावाचा मलामोठा थाळा उचलला आणि त्यांच्या डोक्यावर धरला. कुठल्याही क्षणी तो वजनदार थाळा त्यांच्या मस्तकावर आदळला असता. परंतु योगायोगानं वा आधी ठरवल्यानुसार, कुणीतरी घाईघाईनं आत शिरला आणि गाझिनला म्हणाला की त्यानं लपवून ठेवलेला दारूचा साठा कुणीतरी लंपास केलाय. गाझिनचा मोठ्या प्रमाणावर व्होडकाचा चोरटा व्यापार होता. आपला दारूचा साठा चोरीला गेल्याची वर्दी मिळताच थाळा बाजूला फेकून गाझिन तातडीनं भटारखान्यावाहेर पडला. दोघेही वाचले होते. तरी या अशुभ घटनेनं डोस्टोएवस्कीला प्रकर्षानं जाणीव करून दिली की क्रिवत्सोव-एवढाच धोका त्याला त्याच्या बरोबरच्या कैद्यांपासूनही संभवत होता.

जीव घेण्याच्या वा मारझोडीच्या अशा प्रकारच्या उघड धमक्या डोस्टोएवस्कीच्या बाबतीत, खरं म्हणजे, सुदैवानं अपवादात्मकच होत्या. परंतु धमकावणी प्रत्यक्षात अंमलात आणली गेली नसली तरी तिची टांगती तलवार क्रिवत्सोवच्या धमकावणीप्रमाणेच त्याच्या माथ्यावर सदैव लटकत असायची. कैदी एकमेकांना कसे वागवत होते, त्यांच्या धमकावण्यांचं कुठल्याही क्षणी प्रत्यक्ष मारझोडीत कसं रूपांतर होत होतं याचं प्रत्ययकारी चित्रण डोस्टोएवस्कीनं केलं आहे. एका कैद्याविषयी तो लिहितो : तो उठसूठ बऱ्याच चोऱ्या करायचा आणि त्यासाठी इतरांकडून कैकदा बदडलाही जायचा. त्याला मारझोड करणाऱ्यांनीही चोऱ्या केलेल्या असायच्या, मारही खाल्लेला असायचा. कैदी चिक्कार प्यालेले असले की त्यांच्या वागण्याला धरबंद राहात नसे आणि त्यातून मारामारी ही अटळच. बराकीमध्ये दंगल माजली असल्याची कुणकुण कानी येताच क्रिवत्सोव खवळून घटनास्थळी यायचा आणि अख्ख्या बराकीला शिस्त लावण्याचा एखादा जालीम प्रयोग करायचा. शिस्तभंग करण्यात गाझिन अग्रभागी. काही वेळेला तो पुरता टाईट झाला की खुन्नसमध्ये एखाद्या कैद्याला सुरा खुपसायचा. यानंतर जे काही घडायचं त्यालाही डोस्टोएवस्की बऱ्याच वेळा साक्षी असायचा. त्याच्या बराकीमधून

डझनभर माणसं एकवटून कैद्यावर तुटून पडायची आणि त्याला मारहाण करायची. या ठोशांच्या वर्षावाहून अधिक खतरनाक असं अन्य काही एखाद्याला कल्पिता येणं अशक्य व्हावं. 'छातीवर, बरगड्यांवर, पोटात, जांघात त्याला मारलं जायचं. न थकता, हिंस्त्रपणे त्याला मारलं जात असे आणि त्याची शुद्ध हरपली, दशा मढ्यागत झाली की मारपीट थांबायची. मारझोड नसली तर धमक्या, शिवीगाळ कँपात सतत चालू असायची. कैद्यांच्या लेखी हा विरंगुळा होता.

डोस्टोएवस्कीच्या संवेदनाशील मनाच्या अत्यंत नाजूक भागावर बराकीमधलं जीवन अशा प्रकारे सतत आघात करत होतं. यातून सुटका नव्हती. नाही म्हणायला काही दिवसांची सुटका व्हायची, तो लष्कराच्या हॉस्पिटलमध्ये दाखल व्हायचा तेव्हा. 'सुरुवातीसुरुवातीला बऱ्याचदा मी हॉस्पिटलमध्ये जायचो, काही वेळेला आजारी पडल्यामुळं, काही वेळेला केवळ बिछान्यात पडून राहायला. मी तुरुंगातून पळ काढायचो. तिथलं जिणं असह्य होतं.' कारण कैद्यांचं नैतिक अधःपतन.

नैतिक अधःपतन झालेले दुरात्मे केवळ समाजाच्या वरच्या वर्गातच आढळतात, खालच्या वर्गात नाहीत हा आपला समज किती चुकीचा होता, भावडेपणाचा होता याचं प्रत्यंतर तुरुंगाच्या प्रारंभीच्या दिवसातच डोस्टोएवस्कीला आलं. 'मी चक्रावून गेलो, बेचैन झालो, जणू काही तोवर ह्यासंबंधी मला कधी संशय आलेला नव्हता, माझ्या कानी तसं काही आलेलं नव्हतं, मला त्याची कल्पना नव्हती, ऐकलेलंही नव्हतं, असं नव्हतं. आपण पुस्तकात वाचतो वा आपल्या कानावर येतं त्याहून वास्तव निराळं दर्शन घडवतं!'

'ॲन ऑनेस्ट थीफ' या नावाची कथा डोस्टोएवस्कीनं लिहिलेली होती. या कथेतील दारुड्या व्होडका ढोसायला मिळावी म्हणून त्याच्याएवढ्याच कंगाल असणाऱ्या एका मित्राच्या घरी चोरी करतो. आणि नंतर आपल्या हातून हे पाप घडलं यामुळं हाय खाऊन, पश्चात्ताप करत प्राण सोडतो. परंतु तुरुंगातील कैदी बिनदिक्कतपणे आपल्या मित्रांची चोरी करत होते. त्याबद्दल त्यांना ना खंत होती, ना पश्चात्ताप. या गोष्टीचा 'अ ऑनेस्ट थीफ' च्या लेखकाला अचंबा वाटला नसता तरच नवल! आपल्या हातून काहीही गैर घडलेलं नाही अशीच भावना सर्रास साऱ्या कैद्यांची होती. प्रामाणिकपणाच्या अगदी प्राथमिक तत्त्वांचीही त्यांच्यात वानवा होती. मित्रत्वाच्या नात्याला त्यांच्या लेखी दमडीचीही किंमत नव्हती. या जगात नैतिकतेला मूठमाती देण्यात आली होती.

एक दिवस काही कैदी डोस्टोएवस्कीभोवती गोळा झाले. त्याच्यापाशी पैसे असणार याची कल्पना त्यांना होती. सुरुवातीला त्यांनी त्याची खुषामत केली. बेड्यांचा भार पायावर पडू नये यासाठी त्या कशा ठेवायच्या याचं प्रात्यक्षिक त्यांनी करून दाखवलं. नंतर म्हणाले, त्यानं स्वतःची चीजवस्तू नीट कडीकुलपात ठेवायला हवी. हा उपदेश करूनच ते थांबले नाहीत तर त्यांनी त्याच्याकडून पैसे घेतले आणि पेटी, कुलूप वगैरे घेऊनही आले. त्यांनी त्याचे सारे कपडेलत्ते त्या

पेटीत नीट रचून ठेवले आणि दुसऱ्या दिवशी डोस्टोएवस्की पाहातो तो काय? ती पेटी चोरीला गेली होती. दारू विकत घेण्यासाठी ती विकून टाकण्यात आली होती हे उघड होतं. या टोळक्यातला पेत्राव, पुढं त्याचा जिवाभावाचा मित्र बनला, पण संधी मिळताच प्रत्येक वेळेला डोस्टोएवस्कीचं हाताला लागेल ते चोरायचं काही त्यानं कधी सोडलं नाही. कधी कधी डोस्टोएवस्कीच्या मनात विचार डोकवायचा: तो त्यांना अधःपतित समजतो पण त्यांच्या अंतःकरणात काय घालमेल होते याचा शोध घेण्याचा त्यानं कधी प्रयत्न केलाय का? त्यांना आत कुठंतरी खंत वाटतही असेल, पश्चात्तापाची भावनाही त्यांना छळत असेल. नसावं, असं खचितच होत नसावं. तसं काही असतं तर एवढ्या दिवसात त्याचा पुसटता का होईना पण प्रत्यय त्याला आला असता. पण या भावनांना त्यांच्या काळजात बिलकुल थारा नव्हता. मग त्याचं प्रत्यंतर त्याला कसं यावं!

ज्या परिस्थितीत डोस्टोएवस्की सापडला होता तिनं त्याला भयभीत करून टाकलं होतं, त्याच्या जीवाला घोर लावला होता : 'गदारोळ, हसणंखिदळणं, शिवीगाळ, बेड्यांची खळखळ, धूर आणि घाण, भादरलेली डोकी, डागाळलेले चेहरे, लक्तरं, प्रत्येक गोष्ट भ्रष्ट आणि अधःपतित. माणूस हा असा प्राणी आहे, ज्याला कुठल्याही गोष्टींचा सराव होऊ शकतो आणि मला वाटतं ही त्याची सर्वोत्तम व्याख्या आहे.'

आणि अशा माणसांच्या गराड्यात तो जगत होता. जीव मुठीत धरून. तो क्वचितच कुणाशी बोलायचा. स्वतःच्या गुन्ह्याचं स्वरूपही त्यानं कुणाला सांगितलं नव्हतं. का? त्याला प्रारंभीच सांगण्यात आलं होतं : 'शेतकरी-कैद्यांना 'जंटलमन' आवडत नाहीत, विशेषतः राजबंदी; ते त्यांना जिवंत खाऊन टाकतील. आणि हे समजण्याजोगं होतं. सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे, तुमची पैदास वेगळी आहे, त्यांच्याहून भिन्न आहे आणि दुसरं म्हणजे ते सर्व शेतमजूर आणि सोजिर होते. तू स्वतःच निर्णय घे, तू आवडू शकशील त्यांना?' ही माहिती त्याला पुरवली होती एका कैद्यानं. तो लष्करी अधिकारी होता. डोस्टोएवस्की म्हणतो, 'त्यांच्याशी मिळूनमिसळून, त्यांच्याशी जवळीक साधून त्यांची मर्जी संपादन करण्याचा मी जर का प्रयत्न केला असता तर... तात्काळ त्यांनी समजूत करून घेतली असती की मी असं करतोय ते भीतीपोटी आणि भ्याडपणामुळे आणि मला त्यांनी तिरस्काराची वागणूक दिली असती.' परिणामी शेतकरी-कैद्यांशी सलोख्याचे संबंध साधण्याचा प्रयत्न त्यानं केला नाही. त्यांच्यापासून दूर राहाण्याचा निर्णय त्यानं घेतला.

आपल्याकडे टाकण्यात येणाऱ्या 'जळजळीत कटाक्षां'ची जाणीव अगदी प्रारंभीच्या दिवसापासूनच डोस्टोएवस्कीला झाली होती आणि त्या दृष्टिक्षेपांचा अर्थ गाझिनच्या भटारखान्यातील वागणुकीनं लख्खपणे त्याला स्पष्ट केला होता. असाच प्रसंग जर का एखाद्या शेतकरी-कैद्यावर ओढवला असता तर इतर मध्ये पडले असते. पण 'जंटलमन'च्या बाबतीत बघ्यांची भूमिका त्यांना पसंत होती. 'आमच्या बचावासाठी एकही शब्द कुणी उठवू नये, गाझिनवर एकानंही आवाज काढू नये,

आमच्याबद्दलचा त्यांचा तिरस्कार एवढा तीव्र होता.' एका पोलिश कैद्याला – तोसुद्धा एक राजबंदी होता – त्यानं भाबडेपणानं विचारलं की शेतकरी-कैद्यांनी त्यांच्या चहापानावर का संतापावं? त्यांच्यापैकी बरेचजण आपापलं खाणं खात असतानाही? त्याला उत्तर मिळालं : 'तुझ्या चहाशी त्याचा संबंध नाही. तुझ्याविषयी त्यांचं मत वाईट आहे याचं कारण एकेकाळी तू 'जंटलमन' होतास, त्यांच्यासारखा नव्हतास. त्यांच्यातल्या बऱ्याचजणांना तुझा अपमान करणं, तुझा पाणउतारा करणं अगदी मनापासून आवडेल. इथं तुझ्या वाट्याला येईल ती कटुता.'

या पोलिश कैद्याच्या उद्गाराचं प्रत्यंतर डोस्टोएवस्कीला काही दिवसांनी आलं. नेमून दिलेल्या कामासाठी तो इतर कैद्यांबरोबर बाहेर पडला होता. 'शारीरिक कामाची सवय नसल्यामुळे प्रत्येक ठिकाणी माझा अडथळा होत होता, प्रत्येक ठिकाणी मला शिवीगाळ करून दूर ढकलण्यात येत होतं. अगदी खालचा पाजी माणूस, जो स्वतः निकृष्ट होता, त्यालाही माझ्यावर डाफरण्याचा अधिकार होता. त्याची सबब काय? त्याच्या शेजारी मी उभा राहिल्यामुळं त्याच्या कामात मी अडथळा आणतोय. शेवटी त्यांच्यातल्या एका तरतरीत कैद्यानं मला रोखठोकपणे भसाड्या आवाजात सांगितलं, "कुठं घुसतोयस? हो बाजूला! तुझी गरज नाहीये तिथं घुसतोयस कशाला?" मला बाजूला व्हावं लागलं. सगळे काम करत असताना असं बाजूला उभं राहाणं आपल्याला शरमिंद करतं. मी बाजूला गेलो. दूर उभा राहिलो. तेव्हा तात्काळ ते ओरडले, "झकास कामकरी दिलाय त्यांनी आम्हाला; काय काम करून घेणार तुम्ही असल्या माणसाकडून? काहीही करून घेता येणार नाही तुम्हाला."

अशा अनुभवांचे डोस्टोएवस्कीच्या संवेदनशील मनावर काय आघात होत असतील याची कल्पना त्याचं सैबेरियनपूर्व व्यक्तिमत्व नजरेसमोर आणल्यानं होऊ शकेल. पीटर्सबर्गच्या साहित्यिक वर्तुळात एक अहंमन्य व्यक्ती म्हणून त्याची ख्याती होती. त्याला कुणी विरोध केला, त्याच्या लिखाणाविषयी कुणी प्रतिकूल मत व्यक्त केलं तर तो खवळून उठत असे. स्वतःला आवर घालणं त्याला शक्य होत नसे आणि आता आत्मप्रतिष्ठा जपणाऱ्या त्या डोस्टोएवस्कीला पदोपदी मानखंडना, अवहेलना सोसावी लागत होती, ती देखील त्याच्याहून सर्वच दृष्टींनी खालच्या पातळीवरील लोकांकडून आणि या वागणुकीविरुद्ध आवाज उठवण्याची धमक त्याच्यात नव्हती. या अपमानास्पद वागणुकीमधून सुटका करून घेणंही शक्य नव्हतं. वाट्याला येणारे भोग निमूट सहन करणे एवढंच त्याच्या हाती होतं.

आपण 'जंटलमन' आहोत म्हणून आपली मानखंडना केली जाते ही यातनाकारक जाणीव तो पालुपदासारखी 'हाऊस ऑफ द डेड' मध्ये आळवताना दिसतो : 'तुरुंगामधल्या जीवनामधली अत्यंत यातनादायी मानसिक पीडा म्हणजे, दुष्मनांच्या कोंडाळयात अष्टौप्रहर जगावं लागतं ही जाणीव. त्याच्यासारखे 'जंटलमन' आणि शेतकरी-कैदी यांच्यामध्ये द्वेषाची भिंत उभी करून त्यांना कायमचं अलग

करण्यात आलं होतं. ही भिंत त्यानं काहीही केलं तरी कोलमडून पडणारी नव्हती. एक अगदी सामान्यातला सामान्य शेतकरी-कैदी तुरुंगात पाऊल टाकल्यानंतर दोन तासात इतरांच्या बरोबरीचा होऊन जातो, त्यांच्यातलाच एक होतो, बाकीच्यांच्या बरोबरीचे हक्क त्याला मिळतात, प्रत्येकजण त्याला समजून घेतो, मित्र म्हणून त्याला सांभाळून घेतलं जातं. पण 'जंटलमनां'च्या बाबतीत त्यांचं वागणं वेगळं. तो परजातीतला. तो भला माणूस असला तरी वर्षानुवर्ष त्याचा तिरस्कार केला जाईल, त्याला जाणून घेतलं जाणार नाही आणि विशेष म्हणजे त्याच्यावर कोणीही विश्वास ठेवणार नाही. तो मित्र होऊच शकत नव्हता. बऱ्याच वर्षांच्या सहवासानंतर त्याचा कुणी अपमान करणार नाही अशी परिस्थिती निर्माण झाली तरीदेखील तो त्यांच्यामधला एक होणार नाही. आपण एकाकी आहोत, सर्वांपासून अलग आहोत ही जाणीव त्याला सतत असेल.'

डोस्टोएवस्कीच्या दुष्मनांपैकी काहींनी त्याच्याशी सख्य जोडलं होतं, त्यापैकी पैत्राव हा एक. त्याचं बायबल चोरणारा, गप्पागोष्टी करण्यासाठी दरदिवशी त्याला आवर्जून भेटायला येणारा. त्याचा सहवास तसा स्वागतार्ह, पण अनुग्रह केल्यासारखी त्याची वागणूक खुपणारी. 'मला वाटतं की मला तो लहान पोर समजायचा. नवजात अर्भकच. साध्यासुध्या गोष्टीही समजू न शकणारा.... स्वतःच्या डोक्याला तकलीफ न देता त्यानं ठरवून टाकलं होतं की इतरांशी तो जसं बोलतो तसं माझ्याशी बोलणं अशक्य आहे. पुस्तकाबाहेरचं मला काही ठाऊक नाही आणि काहीही जाणून घेण्याची पात्रता माझ्यात नाही.' त्याची चोरी करून वर स्वतःच्या चीजवस्तू त्याला नीट सांभाळतासुद्धा येत नाहीत म्हणून पेत्राव त्याची कीव करायचा. 'एक दिवस तो स्वतःहून मला म्हणाला की मी "चांगल्या अंतःकरणाचा माणूस आहे... एवढा सीधा-साधा, एवढा सीधासाधा की तुझ्याबद्दल एखाद्याला दया वाटावी."' कीव केल्यागत दर्शवलेली अशा प्रकारची सहानुभूती उघडपणे केलेल्या पाणउताऱ्याहूनही अधिक यातनाकारक ठरत होती.

भोवतालच्या परिस्थितीनं त्याच्यावर शारीरिक, मानसिक आणि नैतिक दडपण आणलं होतं, नैराश्याच्या गर्तेत त्याला ढकलून दिलं होतं आणि त्यातून बाहेर पडण्याचा मार्ग, कारावासात येऊन वर्ष झालं तरी त्याच्या दृष्टीपथात येत नव्हता. यास्तव तो स्वतःला दोषी ठरवत होता. 'मी सतत माझ्याशी पुनरुच्चार करत होतो : "माझ्या भ्रमंतीची ही अखेर आहे. मी तुरुंगात आहे. बरीच वर्ष हे माझं घर असणार.... आणि कोण जाणे! शक्यता आहे, जेव्हा बऱ्याच वर्षांनी ते सोडण्याची वेळ येईल तेव्हा मला खेद होईल!" मी पुस्ती जोडली, त्यात विखारी सुखाचा अंश होता, असे सुख जे सहेतुकपणे एखाद्याची जखम उघडी करण्यासाठी काही वेळेला आसुसते, जणू काही एखाद्याला स्वतःच्या वेदनेमधून आनंद लुटायचा असतो, जणू काही स्वतःच्या दैन्याची जाणीव प्रत्यक्षात मजा लुटण्याजोगी असते.'

डोस्टोएवस्कीची ही आत्मपीडक आत्मनिर्भर्त्सना म्हणजे भोवतालच्या

परिस्थितीबद्दलच्या त्याच्या प्रतिक्रिया होत आणि आपल्या अवती-भवतीची प्रत्येक गोष्ट जोवर तो तिरस्करणीय समजत होता तोवर भावनांचे असेच उद्रेक होत होते. या प्रारंभीच्या काळातील त्याचं वर्णन 'पिंजऱ्यातील लांडगा' या शब्दात केलंय. त्याचा निस्तेज, फिकुटलेला, खंगलेला चेहरा, गडद डागांनी भरलेला, कधीही हास्यानं न उजळणारा! कामानिमित्त त्याला काही विचारलं तरच त्याचं तोंड उघडायचं. त्याची टोपी भिवयापर्यंत खेचलेली असायची. तो दिसायचा उग्र, अलिप्त, माणूसघाणा. माथा खाली झुकलेला आणि नजर धरणीवर खिळलेली. या एकाकी जीवनात त्याला प्रेम मिळत होतं एका कुत्र्याकडून. त्याचं नाव शरीक. तो कामावरून बराकीमध्ये परतला की शरीक त्याचं स्वागत करायचा. त्याच्यावाचून अन्य कुणीही त्या कुत्र्याला कुरवाळत नसे. 'जगात असा एकमेव प्राणी होता जो माझ्यावर माया करत होता, ज्याचा माझ्यावर लोभ होता, जो माझा मित्र होता – माझा विश्वासू शरीक. हा विचार निश्चितच सुखद होता, जणू काही माझ्या क्लेशाचा मी गर्व करावा.'

या यातनामय काळात डोस्टोएवस्कीच्या मनात, हृदयात खोलवर काय चाललं होतं हे नेमकेपणानं सांगणं कठीण आहे, परंतु स्वतःचे विचार, स्वतःच्या निष्ठा याचं अलिप्तपणानं पुनर्मूल्यमापन करण्याच्या त्याच्या प्रयत्नांना प्रारंभ झाला होता एवढं मात्र निश्चित. 'माझ्या आत्मिक एकांतवासात माझ्या गतायुष्याचं मी सिंहावलोकन केलं, अगदी बारीकसारीक तपशीलसुद्धा वगळले नाहीत, माझ्या गतकालावर चिंतन केलं, मला स्वतःला कठोरपणे, दयामाया न दाखवता जोखलं आणि काही वेळेला या एकांतवासात पाठवल्याबद्दल मी प्राक्तनाचे आभार मानले. (एकांतवासाविना) अशा प्रकारे स्वतःला जोखणं, माझ्या गतायुष्याकडे कठोरपणे पाहाणं मला शक्य झालं नसतं.' या विचारमंथनातून काय निघालं याविषयी मात्र तो मौन पाळतो. परंतु तत्संबंधीची गुरुकिल्ली 'हाऊस ऑफ द डेड' मधील घटनांमधून मिळू शकते. उदाहरणार्थ पुढील घटना ....

एक दिवस तुरुंगाच्या आवारात बरेचसे कैदी अवेळी गोळा झाले असल्याचं डोस्टोएवस्कीच्या नजरेला पडलं. त्याला वाटलं, बहुधा हुकूम फर्मावण्यात आला असावा व आपलं लक्ष नसल्यामुळं तो आपल्याला ऐकू आला नसावा. तो तात्काळ कैद्यांच्या रांगेत जाऊन उभा राहिला. जणू काही आता हजेरी घेण्यात येणार होती. त्याची रांगेतली उपस्थिती इतर कैद्यांच्या तशी नित्यपरिचयाची होती. परंतु यावेळी त्याचं स्वागत करण्यात आलं ते अपमानास्पद आरोळ्यांनी, उपहासभऱ्या शब्दांनी. त्याला ग्रुपमधून बाहेर पडण्यास सांगण्यात आलं. या अनपेक्षित हल्ल्यानं तो गोंधळून गेला. तरीही 'बाहेर हो, बाहेर हो' च्या आरोळ्यांना दाद न देता तो तसाच उभा राहिला. शेवटी काही कैद्यांनी नम्रपणे त्याच्या हाताला घट्ट धरलं आणि कँपाच्या भटारखान्यात नेऊन त्याला सोडलं. तिथं त्यानं पाहिलं, भटारखान्यात

मूठभर शेतकरी-कैदी आणि बाकीचे 'जंटलमन' बसलेले होते. त्यांनी लागलीच त्याला सांगितलं : अलीकडे जेवणाचा दर्जा बिघडलेला आहे म्हणून क्रिवत्सोवविरुद्ध तक्रार व निषेध नोंदवण्यासाठी ते संघटितपणे उभे राहिले आहेत. तत्क्षणी त्याला उमगलं, शेतकरी-कैद्यांनी उत्स्फूर्त आणि एकदिलानं पुकारलेल्या आपल्या या लढ्यात 'एका' जंटलमनला सहभागी करून घेण्याचं नाकारलं होतं, त्याला खड्यासारखं बाजूला करण्यात आलं होतं.

निषेध करणाऱ्या कैद्यांना क्रिवत्सोवनं ढोरासारखं झोडपलं आणि त्यांच्या तक्रारीची वासलात लावून टाकली. मेजरच्या मारहाणीनं कैद्यांची अंग ठणकत होती आणि त्यांनी दिलेल्या वागणुकीचा सल डोस्टोएवस्कीच्या मनात ठसठसत होता. 'यापूर्वी तुरुंगात माझा असा अपमान कधीही केला गेला नव्हता.' त्याला जी अपमानास्पद वागणूक त्यांच्याकडून आजवर मिळत होती त्याहून हा अपमान भयंकर होता. 'या वेळेला मला तो अतिशय जाणवला.' या आधी त्याला कधी अशी तीव्र इच्छा झाली नव्हती की त्यांनी आपल्यातलाच समजून त्याला स्वीकारावं. नंतर त्याला कळून आलं की त्यांच्या लढ्यात ज्यांचा सहभाग नव्हता त्यांच्याविषयी त्या कैद्यांना यत्किंचितही नाराजी नव्हती. चीड नव्हती. तो कोड्यात पडला. त्याच दिवशी त्यानं पेत्रावकडे चौकशी केली.

'मी विचारलं, "मला सांग, पेत्राव, आमच्यावर चिडलेत ते?"

"कशासाठी चिडणार?" जणू काही झोपेतून जागा झाल्यागत त्यानं विचारलं.

"कैदी चिडलेत आमच्यावर – जंटलमनांवर".

"तुमच्यावर कशासाठी चिडतील ते?"

"कारण आम्ही तक्रार करण्यात सहभागी नव्हतो झालो."

"पण तुम्ही तक्रार का करायची?" त्यानं समजावणीच्या सुरात विचारलं. "तुम्ही स्वतःचं जेवण पैसे मोजून घेता".

"कमाल आहे! पण त्यांच्याबरोबरीनं भाग घेणाऱ्यांपैकी तुम्ही काहीजण तुमचं जेवण पैसे मोजूनच घेता? आम्हीही तुमच्यासारखंच करायला हवं होतं – कॉम्रेड्स म्हणून."

"पण...पण तुम्ही आमचे कॉम्रेड्स कसे व्हाल?" त्यानं गोंधळून विचारलं.'

पेत्रावच्या उद्‌गारावरून सामाजिक-राजकीय समस्यांची मेख, शेतकऱ्यांची क्रांती घडवून आणण्याची आकांक्षा एकेकाळी बाळगणाऱ्या त्या उत्साही क्रांतिकारक कटवाल्याच्या ध्यानी आली. स्वातंत्र्य मिळवण्यासाठी आपल्या कुठल्याही उठावात पुढारी म्हणून शेतकरी 'जंटलमनां'चा स्वीकार करतील हा आपला समज म्हणजे निव्वळ भ्रम होता याची जाणीव त्याला झाली. वरील घटना घडली तेव्हा ज्या

बंडखोर नैतिक-सामाजिक प्रेरणांनी तो पेत्राशेवस्की वर्तुळाकडे ओढला गेला होता, त्या प्रेरणा त्यानं अद्याप गमावलेल्या नव्हत्या. म्हणूनच शेतकरी-कैद्यांच्या लढ्यात सहभागी होणं ही आपली नैतिक जबाबदारी होती असं त्याला वाटलं होतं हे निःसंशय.

डोस्टोएवस्कीनं पेत्रॉवचं जे व्यक्तिमत्व अन्यत्र रेखाटलं आहे ते लक्षात घेता, वरील संभाषणाची अर्थपूर्णता प्रकर्षानं जाणवते. पेत्रावचा पिंड निसर्गतःच क्रांतिकारकाचा होता. ज्या शेतकऱ्यांना उठावासाठी आव्हान करण्याची स्पेशनेव आणि डोस्टोएवस्कीआदी त्याच्या सहकाऱ्यांनी मनीषा बाळगली होती, त्यांचं प्रतिनिधित्व करण्यालायक असा पेत्राव होता. धोकादायक अडथळ्यांवर मात करण्यासाठी मागचा पुढचा विचार न करता पुढं सरसावणारा, कुठल्याही धोक्याला निधड्या छातीनं सामोरा जाणारा. प्रक्षुब्ध जनआंदोलनात वा क्रांतीत नेतृत्व करतात ती अशी पेत्रॉवसारखी माणसं. आणि अशा या माणसानं डोस्टोएवस्कीला, ज्याच्याशी त्याचं अतिशय सख्य होतं, विचारलं होतं, "तो आणि एक 'जंटलमन' सामाजिक-राजकीय आंदोलनात कॉम्रेड्स म्हणून एकत्र येणं कसं शक्य आहे?" या परखड प्रश्नानं डोस्टोएवस्कीच्या लक्षात आणून दिलं : रशियन बहुजनसमाजाचा उठाव घडवून आणण्याच्या कामी बुद्धिजीवी वर्गाचे प्रयत्न परिणामशून्य आहेत. खालचा वर्ग आणि बुद्धिजीवी वर्ग याचं कुठल्याही प्रकारचं सहकार्य संभवनीय नव्हतं. संघर्षाच्या काळात जनआंदोलनाचं नेतृत्व करणारा बुद्धिजीवी वर्ग बहुजनसमाजाला विनाशाकडे घेऊन जाईल. नेतृत्व करणारा हा वर्ग बुद्धिमान असतो, प्रामाणिक असतो, परंतु जनआंदोलनाची सूत्रं सांभाळणं, मार्गदर्शन करणं, डावपेच लढवणं यात उणा पडतो. बहुजनसमाजाचं यशस्वीरीत्या मार्गदर्शन करण्याचा वकूब असलेली माणस वेगळी असतात. अशा माणसांची आपल्या वर्गात पूर्ण वानवा होती. आपल्यासारख्यांच्या पदरी नेहमीच अपयश येतं आणि सश्रम कारावासासाठी तुरुंगात रवानगी केली जाते. ज्या निष्ठेनं तो पेत्राशेवस्कीच्या वर्तुळात सहभागी झाला होता, शेतमजुरांचा उठाव करण्याच्या उद्देशाने स्पेशनेवच्या गुप्त संघटनेत सामील झाला होता ते त्यांच्या वैचारिक अपरिपक्वतेचं लक्षण होतं. स्वतःच्या गतकाळाचं कठोरपणे सिंहावलोकन करून डोस्टोएवस्की या निष्कर्षाप्रत येऊन पोचला.

आपल्याप्रमाणेच शेतकऱ्यांविषयी भूतदयावादी दृष्टिकोन असणाऱ्या वाचकांना डोस्टोएवस्की सुनावतो : यांची समजूत असते, त्यांना शेतकरी पूर्णपणे माहीत आहे. पण त्यांचा तो निव्वळ भ्रम असतो. समाजात, नित्याच्या व्यवहारात ज्या शेतकऱ्यांशी त्यांचा संबंध येतो, त्यावरून ते असा समज करून घेतात, पण तो निखालस दिशाभूल करणारा असतो. एखादा 'जंटलमन' परिस्थितीच्या कचाट्यात सापडून आपले पूर्वाधिकार, दर्जा गमावून बसतो, त्याला शेतकऱ्याची अवस्था प्राप्त होते आणि तेव्हाच शेतकरी खरोखरीच कसे असतात याचं ज्ञान त्याला होतं. 'आयुष्यभर तुम्ही त्यांच्या संपर्कात असाल, चाळीस वर्ष दर दिवशी तुमचा त्यांच्याशी संबंध येत असेल, कामकाजाच्या निमित्तानं किंवा निव्वळ स्नेही म्हणून, हितचिंतक

म्हणून वा पालनकर्ता (father) म्हणून – तरीही त्यांची खरीखुरी ओळख तुम्हाला होणंच अशक्य. मला कल्पना आहे, जे कुणी हे वाचतील त्यांना वाटेल, मी अतिशयोक्ती करतोय. पण त्या सत्याबाबत माझी पुरती खात्री पटलीय. माझी अशी खातरजमा व्हायला पुस्तकं कारणीभूत झालेली नाहीत, अमूर्त सिद्धांत कारणीभूत झालेले नाहीत, तर प्रत्यक्ष वस्तुस्थिती आणि ते (सत्य) पडताळून पाहायला माझ्यापाशी भरपूर अवधी होता.'

'हाऊस ऑफ द डेड' मधील डोस्टोएवस्कीच्या शेतकरी-कैद्यांबरोबरच्या संबंधाच्या चित्रणावर इथवर आपण लक्ष केंद्रित केलं. परंतु त्याच्याच सामाजिक स्तरावरील कैदीही त्याच्या बराकीमध्ये होते आणि त्यांच्याशी त्याचे संबंध चांगले होते. 'त्या पहिल्या उन्हाळी मोसमात मी तुरुंगाच्या अवतीभवती भटकायचो, अगदी एकटा, कुणीही मित्र नसायचा.... माझ्याच सामाजिक स्तरावरील मित्र होते मला, परंतु त्या मित्रांनी माझ्या काळजावरील दुःसह भार हलका केला नाही. समोर आलेल्या प्रत्येकाचा मी तिरस्कार करायचो आणि त्यातून सुटका करून घेण्याचा मार्ग माझ्यापाशी नव्हता.' ही मैत्री दिलासा देणारी का ठरली नाही, हे तो सांगत नाही.

या काळात त्याच्या बराकीमध्ये असे बारा कैदी होते. तो अकरा असल्याचे सांगतो. ड्युरोवला तो वगळतो. (बहुधा पुस्तक प्रकाशित करतेवेळी सेन्सॉरची वक्रदृष्टी त्यावर वळू नये म्हणून) या अकरांपैकी तिघे रशियन होते. पहिला : अकिम अकिमिच. खरं नाव यकिम बेलिख. दुसरा : डी. आय. इलिन्स्की. याचा उल्लेख 'पितृवधक' असा केलेला आहे. तिसरा : पॅवेल ॲरिस्टोव. याच्यासाठी 'ए' या आद्याक्षराची निवड करण्यात आली आहे.

अकिमिच हा कॉकेशसमधील रशियन लष्करातला माजी अधिकारी. सीमेवरच्या ठाण्यावरील कमांडर. एका स्थानिक आदिवासी मुखियाला स्वतःच्या अखत्यारीत त्यानं देहांत शासन दिलं होतं. या कामी त्यानं कायदा स्वतःच्या हाती घेतला होता. या गुन्ह्यापायी तो सजा भोगत होता. डोस्टोएवस्कीनं तुरुंगात पाऊल टाकल्याक्षणापासून अकिमिचनं त्याच्याशी संबंध जोडले होते. डोस्टोएवस्कीच्या प्रारंभीच्या खडतर दिवसात त्याच्या मार्गदर्शकाची व उपदेशकाची भूमिका त्यानं स्वतःहून स्वीकारली होती. डोस्टोएवस्कीला सांभाळून घेऊन त्याला सर्वतोपरी साहाय्य करणं हे स्वतःचं कर्तव्य मानल होतं. असं असूनही, डोस्टोएवस्कीला त्याच्याविषयी कधीच सहानुभूती वाटली नाही वा मैत्रीचे संबंध दृढ करावे अशी इच्छाही त्याला झाली नाही. कारण अकिमिच हा अगदीच रुक्ष माणूस होता. तावेदारी त्याच्या रक्तात एवढी भिनली होती की आज्ञाधारकपणा हा त्याचा स्वभावधर्मच बनून गेला होता. तो भला माणूस होता.... 'पण मला कबूल करायला हवं, काही

वेळेला विशेषतः प्रारंभी, त्याच्यामुळं माझ्यात कमालीचं औदासीन्य निर्माण झालं. परिणामी माझं दुःखदैन्य अधिकच वाढलं. काही वेळेला मला ओढ लागायची, जान असलेल्या शब्दांची, भले ते कितीही कडवट, उतावळे वा तुच्छतादर्शक असोत' परंतु त्याची ही मनोकामना कधीच सफल होऊ शकली नाही. अकिमिचच्या तोंडी सदान्‌कदा लष्करी जीवनातील तपशील, भक्तीभावानं उच्चारलेले. 'का ते मलाच ठाऊक नाही (आणि नेहमीच ध्यानीमनी नसताना) मी अकिम अकिमिचचा जवळजवळ तिटकारा करायचो आणि एकाच बिछान्यावर त्याच्या डोक्याशी माझं डोकं टेकवण्याची पाळी माझ्यावर आणल्याबद्दल नशिबाचा उद्धार करायचो.'

'पितृवधक' हा उमराव घराण्यातला. माजी लष्करी अधिकारी. परिस्थितीजन्य पुरावा प्रमाण मानून त्याला शिक्षा ठोठावण्यात आली होती. त्याच्यावर आरोप होता : वडिलांची मालमत्ता आपल्याला मिळावी यासाठी त्यानं वडिलांचा खून केला होता. त्यांचं प्रेत एका चरात गाडून त्यावर फळ्या झाकल्या होत्या. तत्पूर्वी त्या निष्प्राण देहावर त्यानं कपडे चढवले होते. छाटून टाकण्यात आलेलं मुंडकं नीट धडावर ठेवलं होत, त्याखाली उशीही ठेवली होती. 'पितृवधक' हा विनधास्त, खुळचट, अत्यंत बेजबाबदार असा माणूस होता. पण बिनडोक मात्र नव्हता. तो मस्त मजेत वावरत असायचा. हळूहळू आपण खून केला नव्हता असंही तो सांगू लागला होता.

'पितृवधका'ची आनंदी वृत्ती आणि त्याच्या तथाकथित गुन्ह्याचं गांभीर्य यांचं डोस्टोएवस्कीला विलक्षण कुतूहल वाटायचं. आपल्या हातून काही गैरकृत्य घडलंय याचा या माणसाला विसर पडावा? मृत पित्याचा उल्लेख यानं एवढ्या अनादरानं करावा? अशी पाशवी संवेदनाशून्यता अशक्य कोटीतली वाटते. कुठल्यातरी शारीरिक दोषांची, विज्ञानाच्या अद्याप ध्यानी न आलेल्या एखाद्या मानसिक अघोरीपणाची बहुधा ही परिणती असावी. 'पितृवधका'च्या गुन्ह्याची ज्यांना अगदी खडान्‌खडा माहिती होती, त्यांच्या तोंडून ती ऐकल्यानंतरही त्याच्या हातून गुन्हा घडला आहे यावर विश्वास ठेवायला डोस्टोएवस्कीचं मन तयार होत नव्हतं. पुढं 'हाऊस ऑफ द डेड' लिहीत असताना 'पितृवधका'ची निर्दोष मुक्तता करण्यात आली असल्याची बातमी त्याच्या कानावर आली. दुसऱ्या एका गुन्ह्यासाठी गिरफ्दार करण्यात आलेल्या गुन्हेगारानं, 'पितृवधका'च्या बापाची हत्या आपण केल्याची कबुली दिली होती. साऱ्या गोष्टी, पुरावे 'पितृवधका'च्या गुन्ह्याला बळकटी देत असतानाही त्याच्या वागणुकीवरून त्याचा निरपराधीपणा डोस्टोएवस्कीनं जाणला होता. त्याच्या वर्तनावरून त्याच्या मनाचा वेध डोस्टोएवस्कीच्या अंतःप्रेरणेनं घेतला होता. अशाच भेदक निरीक्षणशक्तीच्या आधारे 'क्राईम अँड पनिशमेंट' मधला राझुमिखिन युक्तिवाद करणार होता की निकोलाय या तरुण आणि बिनधास्त घररंगाऱ्यानं, गहाणदारी करणाऱ्या म्हातारीचा आणि तिच्या बहिणीचा खून केलेला नसणार. कारण गुन्हा ज्या समयी घडला होता त्यानंतर काही क्षणच उलटले असतील, निकोलाय आपल्या दुसऱ्या रंगारी सहकाऱ्याबरोबर इमारतीच्या आवारात रमतगमत हिंडताना त्यानं

पाहिलेला होता. 'ब्रदर्स कारमाझोव' मधल्या दृमित्री कारमझोवच्या विरुद्ध पुराव्यांचा डोंगर रचला गेला असला तरी त्याच्यातला माणुसकीचा अंश, त्याच्या रांगड्या, बेमुर्वतखोर वागण्यामधूनही दर्शवत होता की बापाविषयी आत्यंतिक तिरस्कार असूनही दृमित्रीनं त्याचा खून केला नसणार. त्याच्या व्यक्तिरेखेत इलिन्स्कीचा अंश आढळावा तद्वतच तेच नाव 'ब्रदर्स'च्या पहिल्या खर्ड्यात 'दृमित्री'च्या जागी आढळावं यात नवल नाही!

'ए' हा रशियन उमराव होता. अत्यंत दुष्ट वृत्तीचा. टोबोल्स्क येथील डोस्टोएवस्कीच्या मित्रांनी 'ए'च्या संदर्भात त्याला धोक्याचा इशारा दिला होता. परंतु त्यानं रंगवलेल्या चित्राहून 'ए' प्रत्यक्षात कितीतरी पटीनं अधम असल्याचं डोस्टोएवस्कीला नंतर आढळून आलं. माणूस किती खालची पातळी गाठू शकतो, अधःपतित होतो, स्वतःमधली सारी नीतिमत्ता सहजगत्या वा न पस्तावता कशी पायदळी तुडवतो याचा तो नमुना होता. अंगावर शहारे आणणारा. बाहेरच्याली आयुष्य मनमुराद जगता यावं यासाठी खिशात भरपूर पैसा हवा म्हणून अगदी निरपराधी लोकांविरुद्ध तो पोलिसांकडे चुगल्या करायचा, सांगायचा ते राजकीय कटवाले आहेत. तथापि, काही काळानं, पोलिसांना संशय आला आणि त्याचं पितळ उघडं पडलं आणि द्रव्यापहार आणि खोटे दोषारोप करणं या आरोपावरून त्याची अखेरीस तुरुंगात रवानगी करण्यात आली होती. तुरुंगातही त्यानं मेजर क्रिवत्सोवची मर्जी संपादन केली होती. शेतकरी-कैद्यांविरुद्ध कागाळ्या करून तो मेजरचे कान फुंकत होता. डोस्टोएवस्कीनं आपल्या काल्पनिक विश्वात काळ्याकुट्ट रंगात रंगवलेल्या अधमाहून अधम असलेल्या या हाडामासाच्या 'ए'शी वागताना डोस्टोएवस्की अक्षरशः शहारत असे. 'ए' म्हणजे 'दात आणि पोट असलेला मासाचा गोळा', 'लैंगिक आणि अन्य शारीरिक सुखासाठी सदाचा बुभुक्षित असलेला नरपशू' अशी त्याची भावना होती. नवलाची गोष्ट अशी 'त्याचा चेहरामोहरा, त्याची वर्तणूक पाहून त्याच्या नीच मनोवृत्तीची शंकाही कुणाच्या मनाला स्पर्शून गेली नसती. 'तो धूर्त होता, हुषार होता, देखणा होता, सुशिक्षित होता, तसा कर्तबगारही होता.' त्याचा सहवास डोस्टोएवस्कीला दुःसह व्हायचा याचं कारण आपल्या दुर्लौकिकाची तो दिमाखानं बढाई मारायचा; 'त्याचं सदाचं तुच्छतादर्शक हास्य पाहून मला किती शिसारी यायची. तो हैवान होता. त्यानं तुरुंगातल्या माझ्या प्रारंभीच्या दिवसात विष कालवलं आणि ते अधिक दुःखदायक केले. नीचपणा आणि अधःपतन यांच्या ढाच्यात तो बसला गेल्याचं पाहून माझा थरकाप उडाला.... मी कल्पना करू लागलो, इथलं सगळं काही हिणकस आहे, अधःपतित आहे. पण मी चुकत होतो. मी 'ए' वरून सारं जोखत होतो.'

या तीन रशियन कैद्यांच्या बरोबरीनं तुरुंगात आठ पोलिश कैदी होते. उमराव घराण्यातले. त्यांचा गुन्हा : रशियन जोखडातून आपल्या मायभूमीला मुक्त करण्यासाठी केलेल्या कटातील त्यांचा सहभाग. डोस्टोएवस्कीच्या मते त्यातील तिघे सुसंस्कृत होते आणि त्यातील दोघांशी इतर कुठल्याही उच्च वर्गीय कैद्यांपेक्षा त्याची

जास्त जवळीक होती. 'त्यातील एक 'एम' (अॅलेक्झांडर मिरेक्की). पहिल्यापासून 'त्याचं माझं छान जमलं. अतिशय खंबीर आणि भारदस्त माणूस. दुसरा : 'बी' (जोस्जेफ बोगुलावस्की). अतिशय सहृदयी आणि उदार अंतःकरणाचा माणूस. कालांतरानं इतर पोलिश कैद्यांबरोबरचे संबंध डोस्टोएव्स्कीनं तोडून टाकले तरीही 'बी' वरील त्याचे प्रेम कधीच लोप पावलं नाही. टोकार्झेवस्कीबद्दलही तो आपुलकीनं बोलतो. मलामण करणारी त्याची ही भाषा निव्वळ उपचारापुरती खचितच नव्हती. त्याच्या लेखी ते भोवतालचा अंधःकार उजळून टाकणारे प्रकाशाचे किरण होते.

'बी' वगळता अन्य पोलिश कैद्यांबरोबरचे डोस्टोएव्स्कीचे संबंध कालान्तरानं दुरावत गेले याचं मुख्य कारण त्यांच्यामधील मतभिन्नता. डोस्टोएव्स्की झारवादाचा शत्रू गणला गेला होता. साहजिकच पोलिश स्वातंत्र्याच्या लढ्याला त्याचा पाठिंबा, त्याची सहानुभूती, पोलिश कैद्यांना अपेक्षित होती. परंतु डोस्टोएव्स्की मायेफिरू वाटावा एवढा कट्टर देशाभिमानी निघावा, रशियन सत्ता झुगारून मायभूमीला स्वतंत्र करण्याचा पोलिश जनतेचा हक्क त्यानं नाकारावा याचं त्यांना आश्चर्य वाटलं. ज्या पवित्र ध्येयासाठी पोलिश कैदी शिक्षा भोगत होते त्यासंबंधीचा विषय निघाला की डोस्टोएव्स्कीची प्रखर राष्ट्रभक्ती उफाळून येत होती. तो अभिनिवेशानं सांगायचा, जेव्हा सारी राष्ट्रं रशियन स्वामित्वाखाली येतील तेव्हाच तो खूष होईल. युक्रेन, वोलिनिया, पोडोलिया, लिथुआनिया आणि संपूर्ण पोलंड ही राष्ट्र राशियानं गिळंकृत केलीत हे त्याला अमान्य होतं. तो ठामपणे म्हणायचा, पृथ्वीवरील हे सारे प्रदेश मूळचे रशियाचेच होते; हे प्रांत, ही राष्ट्रं न्यायदेवतेच्या पावन हातानीच रशियन झारच्या राजसत्तेखाली आणलीत. तसं घडलं नसतं तर ते वर्षानुवर्ष अशिक्षित राहिले असते. भयंकर दारिद्र्यात त्यांना दिवस कंठावे लागले असते. हे डोस्टोएव्स्कीचं प्रतिपादन नमूद करून टोकार्झेवस्की म्हणतो : 'त्याची ही मतं ऐकून आमची ठाम समजूत झाली की फ्योडोर मिखाइलोविच डोस्टोएव्स्की याच्या डोक्यावर परिणाम झाला आहे!'

हमरीतुमरीवर येऊन वाद घालताना डोस्टोएव्स्की एवढा गोंधळून जात असे की आपण काय बोलतोय याचंही भान त्याला राहात नसे, हे बेलिन्स्कीचं मत. डोस्टोएव्स्की त्याच्या वर्तुळात होता तेव्हाचं त्याचं हे मत उद्धृत करून मादाम पानाएवानं पुस्ती जोडली आहे ती अशी : 'वादविवादात डोस्टोएव्स्कीला कोंडीत पकडला की अत्यंत हास्यास्पद अशा मतांचंही तो पोटतिडिकेनं समर्थन करत असे.' शक्यता आहे, टोकार्झेवस्की आदींशी वाद घालताना त्याची हीच प्रवृत्ती वरचढ ठरत होती. शिवाय, या काळात तो शारीरिकदृष्ट्या, मानसिकदृष्ट्या अधिकच कमकुवत झाला होता. त्यामुळं वादविवादामुळं प्रक्षुब्ध बनलेल्या आपल्या भावनांना काबूत ठेवणं त्याला अशक्य होत असावं. म्हणून त्याची वर उल्लेखिलेली वक्तव्यं म्हणजे त्याची ठाम मतं असा निष्कर्ष काढणं चुकीचं ठरेल. परंतु त्याचं राष्ट्रप्रेम अत्यंत जाज्वल्य होतं एवढं बरीक खरं होतं. त्याला वाटणाऱ्या अवाजवी भीतीचा वा तिरस्काराचा अंश त्याच्या या आक्रमक देशाभिमानात आढळत असे,

अगदी पेत्राशेवस्की वर्तुळात तो असल्यापासून, पाश्चात्य विचारसरणीचा पगडा त्याच्यावर असतानाही. या वर्तुळातील काही सदस्य राष्ट्रीयत्व ही संकल्पना जुनाट व प्रतिगामी असल्याचं हिरीरीनं प्रतिपादन करत असत. त्यांच्या या विचारांशी डोस्टोएवस्की कधीच सहमत झाला नव्हता. युरोपहून सर्वस्वी भिन्न, स्वतःचा असा ऐतिहासिक मार्ग रशिया अनुसरेल अशी त्याची धारणा होती.

पोलिश कैद्यांबरोबरचे डोस्टोएवस्कीचे संबंध दुरावले याला राजकीय मतभेद हे निमित्त झालं होतं. पण तेच एकमेव निमित्त नव्हतं. किंबहुना त्याहूनही महत्त्वाचं असं एक कारण होतं; पोलिश कैदी रशियन शेतकरी-कैद्यांना देत असलेली अपमानास्पद वागणूक. ते शेतकरी-कैद्यांकडे तुच्छतेने पाहात. ते सारे गुन्हेगार प्रवृतीचे निव्वळ बाजारबुणगे आहेत असं समजत आणि त्यांच्याविषयीचा तिरस्कार ते कधी लपवत नसत. तुरुंगात पाऊल टाकल्यानंतरच्या टोकार्झेवस्कीच्या प्रतिक्रिया या संदर्भात अतिशय बोलक्या आहेत. तो सांगतो : 'बाप रे बाप, किती भीषण वाटल्या आम्हाला ह्या आकृत्या. आणि माणसांची, गुन्हेगारांची ही रूपं आमच्यासमोर आली आणि आपले हात त्यांनी पुढं केले. बऱ्याच वेळा रक्तानं माखलेले, कैकदा गुन्ह्यांनी कलंकित झालेले हे हात. आणि अंगावर शहारे आले तरी, घृणा वाटली तरी त्यांच्याशी हात मिळवणं आम्हाला प्राप्त होतं. मी माझा हात मागं खेचला आणि प्रत्येकाला बाजूला सारत, अभिमानानं ताठ मान ठेवून मी बराकीमध्ये पाऊल टाकलं!' परिणामी, रशियन शेतकरी-कैदीही त्यांच्याशी 'जशास तसे' या न्यायानं वागू लागले. डोस्टोएवस्की सांगतो : 'शेतकरी-कैदी रशियन 'जंटलमनां'चा जेवढा तिरस्कार करत त्याहून कितीतरा पटीनं ते विशेषतः पोलिश राजबंद्यांचा करत.'

रशियन शेतकरी-कैद्यांबरोबरची पोलिश कैद्यांची वागणूक डोस्टोएवस्कीला खुपू लागली. परंतु शेतकरी-कैद्यांबरोबरची त्याची स्वतःची वागणूक पोलिश कैद्यांहून भिन्न कुठं होती? तोसुद्धा त्यांच्या एवढाच या काळात शेतकरी-कैद्यांचा तिटकारा करत नव्हता का? ज्यांच्याविषयी त्याला आदर होता, प्रेम होतं, त्याला सुन्न करून टाकणारा त्याचा एकांतवास, काहीकाळ का होईना, ज्यांनी सुसह्य केला होता त्या पोलिश कैद्यांशी राजकीय प्रश्नांवरून तो वितंडवाद घालत होता, रशियाची जोरदार तरफदारी करत होता, तेव्हा त्याच्या मनात पुढील प्रश्न डोकावला नाही: जी माणसं त्याच्या अवतीभवती होती, ज्यांच्या आयुष्याशी त्याचं आयुष्य जखडलं गेलं होतं ते शेतकरी-कैदी रशियन बहुजन समाजातलेच नव्हते का? त्याचेच बांधव नव्हते का? त्यांच्याविषयी स्वतःला वाटणाऱ्या तिरस्काराला मूठमाती दिल्याशिवाय रशियाची बाजू घेऊन तो वादविवाद कसा करू शकत होता?

डोस्टोएवस्कीची ही वैचारिक गुंतागुंतच अंतिमतः त्याच्यामधल्या निष्ठांचं पुनरुज्जीवन करण्यास कारणीभूत ठरली. पोलिश कैद्यांबरोबरच्या त्याच्या मतभेदांनी त्याचे आंतरिक पेचप्रसंग – त्याच्या मानवतावादी निष्ठा नष्ट झाल्यामुळे निर्माण झालेले पेचप्रसंग – अधिक धारदार केले, तीव्र केले, असह्य मानसिक बेचैनीची

परिसीमा त्यांनी गाठली. आपल्या मातृभूमीबद्दलचं आत्यंतिक प्रेम आणि बराकीमधील रशियन कैद्यांबद्दलची आत्यंतिक घृणा यांच्यातली दरी मिटवून त्यांच्या एकात्मतेचा एखादा मार्ग शोधून काढणं ही त्याची भावनिक निकड बनली. हा मार्ग योगायोगानं त्याला गवसला. त्याच्यात परिवर्तन घडून आलं. परंतु, ते कसं घडून आलं याबद्दल मात्र, का न कळे, तो 'हाऊस ऑफ द डेड' मध्ये चकार शब्दही लिहीत नाही. त्यासंबंधी आपल्याला कळून येतं ते त्याच्या 'डायरी ऑफ अ रायटर' (१८७६) या पुस्तकातील 'द पेझन्ट मरे' (Marey) या लेखावरून. त्याच्या निष्ठांचं पुनरुज्जीवन झालं, परंतु या निष्ठांचं स्वरूप त्याच्या सैबेरियनपूर्व काळातील निष्ठांहून बरचसं भिन्न होतं.

'लेन्ट' हा ख्रिश्चनांचा एक महत्त्वाचा धार्मिक विधी. हा विधी चाळीस दिवस चालतो. 'ॲश वेन्स्डे'ला सुरू होऊन तो 'इस्टर-ईव्ह'ला समाप्त होतो. या काळात ख्रिश्चन उपवास करतात, कृतकर्मांचा पश्चात्ताप करतात. ओम्स्कच्या कँपातही 'लेन्ट' साजरा केला जात असे. या काळात सर्व कैद्यांची गटा-गटात विभागणी केली जात असे. एका गटाच्या वाट्याला एक आठवडा. प्रत्येक गट आपली पाळी असेल तेव्हा चर्चच्या धार्मिक विधीत भाग घेत असे. डोस्टोएवस्की ज्या गटात होता त्याची पाळी सहाव्या आठवड्यात, म्हणजे 'इस्टर'च्या थोडे दिवस आधी होती. कामाच्या रामरगाड्यातून मोकळीक मिळालेले कैदी आठवडाभर दिवसातून दोन-तीन वेळा चर्चमध्ये जात असत. आठवड्याचा हा काळ डोस्टोएवस्कीला अत्यंत प्रिय होता. चर्चमध्ये तो बरीच वर्षे गेलेला नव्हता. ''लेन्ट''चा विधी माझ्या चांगल्या परिपाठातला होता. अगदी माझ्या बाळपणापासून, माझ्या वडिलांच्या घरी होतो तेव्हापासून. गंभीर प्रार्थना, साष्टांग प्रणिपात – हे सारं माझा खूप जुना काळ जागा करत असे, माझ्या बालपणीचे दिवस नजरेसमोर पुन्हा आणत असे.' कैदी चर्चच्या मागील बाजूला उभे राहात असत. डोस्टोएवस्कीच्या बाळपणात शेतकरी राहायचे तसे. तेव्हा खांद्यावर फितीच फीती लावलेला बडा अधिकारी, धट्टाकट्टा जंटलमन, नट्टापट्टा करून आलेली पापभीरू बाई यांना हे शेतकरी गुलाम असल्यागत वाट करून द्यायचे आणि आपल्या विशेष हक्काच्या जागेवरून तो हे सारं पाहायचा. त्या काळीही त्याला जाणवायचं : 'चर्चच्या दाराशी आम्ही जसे प्रार्थना करत होतो तसे ते करत नव्हते. पण ते प्रार्थना करत असत, लीनतेनं, कळकळीनं, स्वतःला कमी लेखून, स्वतःच्या दीन अवस्थेचं भान ठेवून.'

ज्या काळात डोस्टोएवस्कीची धार्मिक श्रद्धा अढळ आणि निर्मळ होती त्या बालपणातील धार्मिक कणव, 'लेन्ट'चं पवित्र वातावरण तुरुंगाच्या कँपात पसरू लागलं की, जागी होत असे. शेतकऱ्यांना बेमुर्वतखोरपणे बाजूस सारणाऱ्या उद्धट सत्ताधारी वर्गापेक्षा शेतकऱ्यांच्या भक्तिभावना 'ख्रिश्चानिटीला' अधिक निकटच्या असतात या त्याच्या बाळपणीच्या समजाला अद्याप धक्का लागलेला नव्हता आणि १८५१ मधील 'इस्टर'च्या सप्ताहात, बहुधा पहिल्यांदाच, शेतकरी-कैद्यांशी भावनिक समत्व साधणं शक्य असल्याचं त्याला आढळून आलं असावं. कैदी अतिशय

तळमळीनं प्रार्थना करत असत आणि त्यांच्यातला प्रत्येकजण मेणबत्ती घेण्यासाठी व पेटीत दान करण्यासाठी प्रत्येक वेळेला गरीबाघरचा पैपैसा घेऊन येत असे आणि दान करत असताना बहुधा त्यांना वाटत असावं, "मीसुद्धा एक माणूस आहे. परमेश्वराच्या नजरेत आम्ही सारे समान आहोत. "मास"च्या अगदी सुरुवातीला आम्ही "सॅक्रमेंट"मध्ये सहभागी व्हायचो. (मस्तकावर पाणी शिंपडण्यासाठी) हाती प्याला धरून पाद्री वाचू लागायचा..." हे सर्व शक्तिमान, चोर असलो तरी माझा स्वीकार कर".' पाद्रयाचे हे शद्ब शद्बशः आपल्याला लागू आहेत या भावनेनं जवळजवळ त्यांच्यातला प्रत्येकजण बेड्यांच्या खळखळाटात धरणीवर गुडघे टेकून वाकायचा. शेतकरी हे अधम ॲरिस्टोवच्या ओबड-धोबड प्रतिकृती आहेत हा त्याचा समज डळमळायला हे दृश्य निश्चितच कारणीभूत ठरलं. या संदर्भात, परंपरानिष्ठ 'इस्टर' विधीच्या संभाव्य परिणामाकडे दुर्लक्ष करता कामा नये. या विधीच्या केंद्रस्थानी आहे खिस्ताच्या पुनरुत्थानाचं गूढ. या विधीचा विशेष भर होता तो बंधुभाव आणि क्षमाशीलता यावर, जे या अद्‌भुत सोहळ्याच्या प्रसंगी साऱ्या भाविकांना हर्षभरानं एकत्रित आणू शकत होते. या परंपरानिष्ठ 'इस्टर' विधीच्या अंतिम क्षणी प्रार्थनेकरता जमलेल्या साऱ्यांनी एकमेकांना आलिंगन देणं, एकमेकांचं चुंबन घेणं हा परिपाठ होता.

या काळातील उदात्त धार्मिक भावनांनी डोस्टोएवस्की भारून गेलेला असतानाच अंगावर शहारे आणणाऱ्या घटनेला त्याला साक्षी व्हावं लागलं.

'इस्टर' सप्ताहाचा दुसरा दिवस होता. डोस्टोएवस्कीच्या बराकीमधील कैद्यांना कामातून मोकळीक देण्यात आली होती. बरेचसे कैदी चिक्कार प्यालेले होते. चहूबाजूंनी शिव्याशापांचा गदारोळ क्षणाक्षणाला उठत होता. घाणेरड्या, अश्लील गाण्यांना ऊत आला होता. फळकुटांच्या अंथरुणाखाली फतकल मारून जुगारांचे अड्डे जमले होते. यथेच्छ मार खाऊन अर्धमेले झालेले कैदी फळकुटावर आडवे झाले होते. विश्रांती घेऊन ताजेतवाने झाले की पुन्हा राडा करण्याची इच्छा तरीही त्यांच्या मनात चुळबुळत होती. कैकदा सुरे परजले जात होते – आणि या साऱ्या गोष्टींनी होणाऱ्या वेदनांनी डोस्टोएवस्कीची दशा आजारी माणसागत केली होती. तेवढ्यात दांडगट शेतकरी, एकत्रितपणे, तार्तर गाझिनला नरम करण्यासाठी त्याच्यावर तुटून पडले आणि त्याला मारझोड करू लागले. दातओठ खात त्यांनी त्याला बदडून काढलं – एवढ्या मारहाणीनं उंटही गतप्राण झाला असता. परंतु त्यांना माहीत होतं की या हर्क्युलसचा जीव जाणं अशक्य कोटीतलं आहे, यास्तव ते न भिता त्याला बुकलत होते.

हे भयानक दृश्य पाहाणं डोस्टोएवस्कीला असह्य झालं. एखाद्या भ्रमिष्टागत त्यानं बाहेरच्या लख्ख प्रकाशात, निळ्याभोर आकाशाखाली धाव घेतली. नित्याच्या सवयीनं तो पावलं उचलत होता. परंतु त्याच्या काळजात खदखदणारा क्रोध निसर्गाचं सौंदर्य नित्याप्रमाणं या वेळी शांत करू शकत नव्हतं. अखेरीस त्याचं हृदय खुन्नसनं

पेटून उठलं आणि नेमक्या त्याच वेळी पोलिश कैदी मिरेक्की याच्याशी त्याची गाठ पडली. तोसुद्धा बराकीमधील दृश्य त्याच्याने पाहावेना म्हणून बाहेर पडून त्या निर्मनुष्य पायवाटेवर फिरत होता. 'त्यानं विषण्णपणे माझ्याकडे पाहिलं, त्याचे डोळे चमकले आणि त्याचे ओठ थरथरू लागले : 'Je hais ces brigands!' (त्या जंगली गुंडाचा तिरस्कार वाटतो मला!) – तो तोंडातल्या तोंडात पुटपुटला, दाबून धरलेल्या नरड्यातून आवाज फुटावा तशा सुरात आणि निघून गेला.'

मिरेक्कीच्या उद्‌गारांनी डोस्टोएवस्कीवर असा परिणाम केला की तो झटकन मागे वळला आणि जेमतेम पंधराएक मिनिटांपूर्वी जियून तो पिसाट्यसारखा बाहेर पडला होता तिथंच माघारी आला. आपण दिशा का बदलली याचं स्पष्टीकरण तो करत नाही. परंतु जे सांगण्याचं त्यानं टाळलेले आहे ते एव्हाना त्याला कळून चुकलं आहे. मिरेक्कीनं डोस्टोएवस्कीच्या मनातले विचार जाणले होते. डोस्टोएवस्कीच्या आत जे खदखदत होतं त्या आत्यंतिक विषमय विचारांना, त्या क्रोधाला मिरेक्कीनं वाचा फोडली होती आणि याचा त्याला जबरदस्त हादरा बसला होता. त्या हादऱ्यानं त्याला जाणीव करून दिली, निदान ती जाणीव पृष्ठभागावर आणली, त्याच्या रशियन बांधवांच्या विरोधात तो पोलचा सांगाती होता आणि तो बराकीकडे परतला होता, आपल्या देशबांधवांशी आपलं समत्व आहे या सुप्त जाणीवेपोटी. तो आला खरा, पण बराकीत चाललेल्या गुंडगिरीचं समर्थन करणं त्याला अद्यापही अशक्य होत होतं. आपल्या फळकुटावरील अंथरुणात तो आडवा झाला आणि त्यानं झोपेचं सोंग घेलं. झोपलेल्यांना सतावलं जात नसे त्यामुळं तो नेहमी या क्लृप्तीचा अवलंब करत असे. 'पण यावेळी स्वप्नरंजन मला अशक्य झालं. माझं काळीज धडधडत होतं आणि मिरेक्कीचे शब्द माझ्या कानात निनादत असल्याचं मला ऐकू येत होतं : 'Je hais ces brigands!'

डोस्टोएवस्कीच्या अंतर्यामीचा संघर्ष पराकोटीला पोचल्याचं वरील उतारा स्पष्टपणे सूचित करतो. या संघर्षामुळं अस्वस्थ झालेल्या त्याच्या मनाला वर्तमानाचा विसर पाडणं जड जात होतं. यापूर्वी असं कधीच घडलं नव्हतं. त्याचं मन कैकदा भूतकाळात मनमुराद हिंडत असे. बंदिवासाच्या चार वर्षांत या स्वैर कल्पनाविहाराच्या तंत्राचा तो अवलंब करत होता, विकृत 'फिक्सेशन', मानसिक अडसर या योगे एखाद्या मानसशास्त्रज्ञाच्या कौशल्यानं दूर करत होता. जिथं त्याला पांढऱ्यावर काळं करण्याची बंदी होती अशा प्रतिकूल परिस्थितीतही त्याची कलात्मक सृजनशक्ती जिवंत ठेवण्यास हे तंत्र साहाय्यभूत ठरत होतं. या कल्पनाविहाराच्या संदर्भात तो लिहितो : 'सुरुवात व्हायची एखाद्या टिंबानं, एखाद्या छटेनं – काही वेळेला अगदी अमूर्त – आणि नंतर, हळूहळू संपूर्ण चित्र आकार घेत जायचं – एखादं ठळक दृश्य. या दृश्याचं मी विश्लेषण करायचो, बऱ्याच वर्षांपूर्वी घडून गेलेल्या गोष्टीत नवी भर घालायचो आणि अत्यंत महत्त्वाचं म्हणजे – सुधारणा करायचो. सातत्यानं त्यात सुधारणा करायचो.' अशा प्रकारे मनश्चक्षूसमोर साकार झालेल्या दृश्यांवर,

घटनांवर, व्यक्तींवर तो मनातल्या मनात काम करायचा, कथा-कादंबऱ्या लिहिताना त्यानं केलं असतं तसं परिष्करण करायचा.

या समयी त्याच्या मनात अवतीर्ण झाली विस्मृत झालेली त्याच्या बाळपणीची एक आठवण. 'इस्टर'च्या सोहोळ्यानं त्याच्या आयुष्यातला हा काळ आधीच जागवलेला, चेतवलेला होता आणि त्यात आता अंतर्भूत झाल्या होत्या, बराकीत दारूच्या नशेत घातल्या गेलेल्या थैमानानं निर्माण केलेल्या भीतीच्या, धास्तीच्या भावना. तो नऊ वर्षांचा होता तेव्हाची ही घटना. आपल्या वडिलांच्या छोट्या इस्टेटीमधल्या जंगलात तो हिंडत होता. एकाएकी त्याला वाटलं, आसपासच्या भागात लांडगा फिरत असल्याची कुणीतरी आरोळी ठोकली. त्या भागात वेड्यावाकड्या घळणी होत्या. त्यातून क्वचित लांडगा बाहेर पडायचा आणि त्याच्या आईनं त्याला नीट सांभाळून जाण्याचा इशार दिला होता. तो भयभीत झाला. त्यानं धूम ठोकली आणि जवळच्या शेतावर नांगरणी करत असलेल्या शेतकऱ्याकडे धाव घेतली. हा शेतकरी त्याच्या वडिलांच्या शेतमजुरांपैकी एक होता आणि त्याचं नाव मरे होतं एवढंच त्याला ठाऊक होतं. भीतीनं पांढराफटक पडलेल्या, थरथरणाऱ्या आपल्या धन्याच्या मुलाला पाहून मरे आश्चर्यचकित झाला. त्यानं काम थांबवलं. घाबराघुबरा झालेल्या त्या मुलाला त्यानं धीर दिला, सांगितलं, "कुणीही आरोळी ठोकलेली नाही आणि जवळपास लांडगाबिंडगा कुणीही नाही." आईच्या वात्सल्यानं त्याच्याशी हसणारा, त्याच्यावर आणि स्वतःवर क्रुसाचं चिन्ह करून आशीर्वाद देणारा आणि त्याच्यावर नजर ठेवू असं आश्वासन देऊन त्याला घरी पाठवून देणारा मरे डोस्टोएवस्कीला आठवला : 'हे अवचित माझ्यासामेर पुन्हा आलं, का ते मला ठाऊक नाही, आश्चर्य वाटावं एवढ्या ठळकपणे आणि बारीकसारीक तपशीलासकट. मी एकदम डोळे उघडले, फळकुटाच्या अंथरुणावर उठून बसलो आणि मला आठवतं,त्या आठवणीचं मंद हास्य माझ्या चेहऱ्यावर तेव्हाही कायम होतं.'

या एका भेटीनंतर आपण मरेशी पुन्हा कधीही बोललो नव्हतो आणि ही घटना आपण पूर्णपणे विसरून गेलो होतो, असं डोस्टोएवस्की ठासून सांगतो. 'आणि अचानक आता – वीस वर्षांनंतर, सैबेरियात – ती भेट एवढ्या ठळकपणे, प्रत्येक तपशीलासह मी आठवत होतो.' कुणी म्हणेल, 'लहान मुलाला कुणीही धीर दिलाच असता, त्यात एवढं नवल वाटण्याजोगं काय?' पण या सर्वसाधारण प्रतिक्रिया विचारात घेणं त्याला जरूरीचं वाटत नाही. कारण त्याची खातरजमा झाली होती की जंगलातील या भेटीत सर्वस्वी आगळंवेगळं असं काहीतरी घडून आलं होतं आणि सच्चा प्रेमानं उजळून निघालेल्या चेहऱ्यानं त्याच्याकडे पाहाण्यास मरेला कुणीतरी भाग पाडलेलं होत. 'तो होता एक शेतमजूर आणि मी त्याच्या धन्याचा मुलगा. तो किती मायेनं वागला हे कुणालाही कळणार नव्हतं आणि त्याला त्यासाठी कुणी बक्षिसही देणार नव्हता.... ही भेट झाली होती निर्मनुष्य स्थळी, चिटपाखरू नसलेल्या शेतावर. कदाचित फक्त परमेश्वरानं वरून पाहिलं

असेल. आपण मुक्त होऊ अशी अपेक्षाही ज्यानं कधी केली नसेल, तो विचारही ज्याच्या मनात कधी डोकावलाही नसेल, त्या रांगड्या, ढोरागत अडाणी असलेल्या रशियन शेतकऱ्याचं काळीज स्त्रीचा हळुवारपणा लाभलेल्या नाजुक नि गाढ भावनांनी भरून येऊ शकतं!'

आणि अचानक दिलासा देणाऱ्या या स्मृतीचा इष्ट परिणाम झाला असल्याचं त्याला उमगून आलं. त्याला आढळून आलं की त्याच्याबरोबरच्या कैद्यांबरोबरच्या त्याच्या संपूर्ण वागणुकीत जादूची कांडी फिरवल्यागत परिवर्तन घडून आलं आहे. 'मला आठवतं, मी फळकुटाच्या अंथरुणात उठून बसलो आणि सभोवार नजर फिरवली, मला अकस्मात जाणवलं की या दुर्दैवी जीवांकडे मी अगदी वेगळ्या नजरेनं पाहू शकतो, आणि एकाएकी जणू काही चमत्कार घडून, माझ्या काळजातून सारा तिटकारा आणि क्रोध नाहीसा झाला. मला भेटणाऱ्या चेहऱ्यांकडे लक्षपूर्वक पाहात नी इकडेतिकडे फेऱ्या घातल्या. भादरलेल्या डोक्याचा आणि डागाळलेल्या चेहऱ्याचा तो तिरस्करणीय शेतकरी, दारू ढोसून त्याच्या भसाड्या आवाजात गाणं गात झोकांडणारा – का, तो तोच मरे असू शकेल, त्याच्या काळजात डोकावणं मला शक्य झालेलं नाही. त्याच दिवशी संध्याकाळी त्याची मिरेक्कीशी पुन्हा गाठभेट झाली. एव्हाना आपण अंतर्यामी सुरक्षित असल्याचं त्याला कळून चुकलं होतं. गरिबांबद्दलची श्रेष्ठतम करुणा त्याच्या हृदयात जागी झाली होती. त्या आधारे मिरेक्कीच्या 'Je hais ces brigands!' या आरोपातला फोलपणा त्याला उमगल्यामुळे मिरेक्कीला निःसंदेहपणे सामोरं जाणं त्याला शक्य झालं होतं. बिच्चारे पोल्स!

मरेच्या स्मृतींनी डोस्टोएवस्कीला सत्याचा, सौंदर्याचा साक्षात्कार घडवला. बाह्य रूपावरून आपण एखाद्याचं मूल्यमापन करत होतो त्यामुळं त्या रूपाआडील सौंदर्य आपणास प्रतीत होत नव्हतं याची जाणीव त्याला झाली. अंतिमतः रशियन शेतकऱ्याचं सौंदर्य त्याच्या गढूळ जंगलीपणापासून वेगळं करण्यास आणि या उकिरड्यामधून हिरे शोधून काढण्यास तो शिकला. जी निष्ठा तो गमावून बसला होता ती त्याला पुन्हा लाभली. परंतु त्याची ही निष्ठा परमेश्वराशी संबंधित नव्हती तर रशियन बहुजन समाजाशी, एका अर्थी ख्रिस्ताच्या मानवी प्रतिमेशी. आता त्याच्या दृष्टीनं प्रत्येक रशियन शेतकरी हा एक संभाव्य मरे होता, ज्यानं त्याच्या अंतःकरणात श्रेष्ठतम आणि अत्यंत उदात्त ख्रिश्चन नीतीमूल्यं अबाधित राखण्यास हातभार लावला होता. प्रथमदर्शनी असं वाटण्याची शक्यता आहे की, त्याच्या सैबेरियनपूर्व काळातील निष्ठाच केवळ पुनर्प्रस्थापित झाल्या. पण जे घडून आलं होतं ते सर्वस्वी भिन्न होतं, त्याच्यात परिवर्तन घडून आलं होतं ते व्यामिश्र परिस्थितीखाली, जिनं लोकांबद्दलच्या त्याच्या दृष्टिकोनाला सर्वस्वी नवीन अर्थपूर्णता मिळवून दिली होती. एका अर्थी, त्या दृष्टिकोनाच्या केंद्रस्थानी आता रशियन सामान्य जन होता. शेतकरी-कैद्यांशी रशियन या नात्यानं काहीही करून समत्व साधण्याची निकड त्याला प्रकर्षानं भासली होती.

डोस्टोएवस्कीची कल्पनाशक्ती सदैव नाट्यात्म उत्कर्षबिंदूकडे आणि भावभावनांच्या आकस्मिक व धारदार स्थित्यंतराकडे झेपावत असे आणि त्याच्या साहित्यसृष्टीतील पात्रंही त्यांच्या आयुष्यात तणाव वा संघर्ष यांच्या आवर्तात न चुकता पकडली जातात. तद्वतच, जेव्हा जेव्हा त्यानं स्वतःच्या आयुष्याविषयी लिहिलं, तेव्हा तेव्हा याच पद्धतीनं त्यानं चित्रण केलं. मरे शेतकऱ्यावरील त्याच्या लेखानं असाच एक क्षण पकडला, त्या क्षणाचा कृतनिश्चय शब्दरूप केला ('माझ्या काळजातून सारा तिटकारा आणि क्रोध नाहीसा झाला') आणि बोधपर शेवट केला : डोस्टोएवस्की आता एक नवीन माणूस बनला. तथापि, हे त्याचं म्हणणं शब्दशः स्वीकारणं आणि त्याच्या आत्मिक उत्क्रांतीच्या प्रत्यक्षातील रूपरेषांशी, चरित्रातल्या घटनेचं त्यानं केलेल्या कलात्मक अविष्काराशी सांगड घालणं चुकीचं ठरेल.

त्यानं वर्णन केली आहे तशीच मरे शेतकऱ्याची घटना घडली होती का आणि ती कथन करत असताना त्यानं त्यात किती कलात्मक सुधारणा केल्या हे निश्चितपणे ध्यानी येणं अशक्य आहे. पण या अनुभवाद्वारे जे व्यक्त करायचं आहे त्याची सत्यता, ती घटना कुठल्याही प्रकारे प्रत्यक्षात घडलेली असली तरीही, डोस्टोएवस्कीचा दृष्टिकोन बदलायला कारणीभूत ठरलेल्या नैतिक-आत्मिक परिवर्तनाच्या मुळाशी होती हे निर्विवाद. तथापि, अंतःप्रेरणेनं उजळून निघालेल्या या क्षणानं प्रवृत्त केलेल्या पुनरुज्जीवनाच्या प्रक्रियेनं, त्यानं सांगितल्याप्रमाणे 'प्रदीर्घ कालावधी' घेतला होता.

आतापावेतो 'माझ्या भोवतालचं सारं काही शत्रुत्वाचं होतं, भयानक होतं, प्रत्यक्षात प्रयेक गोष्ट तशी नसली तरी मला तशी ती वाटत होती... अर्थात्, तेव्हा माझ्या ध्यानात न आलेलं असं बरंच काही होतं, माझ्यासमोर जे काही घडत होतं त्या गोष्टींविषयी मला कल्पना नव्हती.' मरे शेतकऱ्याच्या दृष्टांतानं डोस्टोएवस्कीची नजर निर्मळ करण्याचं आणि त्याच्या अवतीभवती जे घडत होतं ते प्रथमतःच अचूकपणानं निरीक्षण करण्यास प्रवृत्त करण्याचं कार्य केलं. 'हाऊस ऑफ द डेड' मधील पुष्कळशा घटना पुनर्शिक्षणाची ही प्रक्रिया सविस्तरपणे कथन करतात. निवेदनाचा सूर तटस्थ असला तरी त्यामध्ये काही गोष्टी सूचित करण्यात आल्या आहेत. उदाहरणार्थ, आश्चर्य वाटल्यामुळे झालेल्या निवेदकाच्या प्रतिक्रिया आणि वाचकाला अधूनमधून एखाद्दुसऱ्या गोष्टीकडे नीट अवधान देण्यासाठी त्यानं दिलेल्या ताकीदवजा सूचना – हे 'क्ल्यू', बाह्य जग अवलोकन करण्याची त्याची दृष्टी हळूहळू कशी बदलली होती, त्याच्या निष्ठा कशा पुनरुज्जीवीत होत गेल्या याचा मागोवा घेण्यास साहाय्यभूत ठरतात.

पाश्चात्य विचारसरणीनं भारलेल्या रशियन विचारवंतांचा ग्रह होता की रशियन शेतकरी अडाणी आणि अकार्यकुशल कामकरी आहेत. या विचारवंतांहून डोस्टोएवस्कीचा दृष्टिकोन वेगळा नव्हता. याचा पुरावा त्यानं लिहिलेल्या प्रारंभीच्या एका कथेत आढळतो. त्यातील एक तरुण आणि उदारमतवादी नोकरशहा –

निश्चितच लेखकाचा प्रवक्ता – असं विधान करतो : 'रशियन लष्कराच्या युरोपिअन शिस्तीत पढवला गेलेला निवृत्त लष्करी जाणकार काम कसं करावं हे जाणतो. शेतकऱ्यांपेक्षा तो कितीतरी पटीनं वरचढ असतो कारण त्याचं कसब, कामाची माहिती आणि तल्लख बुद्धी. तो शेतकऱ्याप्रमाणं गडबडगुंडा करणार नाही. प्रत्येक गोष्ट तो न किरकिरता आणि शिस्तीनं स्वतः करतो.' डोस्टोएवस्कीच्या हाडीमासी खिळलेला हा ग्रह कालांतरानं बदलत गेला.

शेतकरी-कैद्यांबरोबर तो पहिल्यांदा काम करण्यासाठी बाहेर पडला तो आपला हा पूर्वग्रह घेऊनच आणि हा ग्रह यत्किंचितही चुकीचा नसल्याचं प्रत्यंतर त्याला आलं. शारीरिक कामात तो स्वतः अकुशल असूनदेखील लिहितो : "काम करणारे धिप्पाड होते, दणकट होते. पण काम कसं करावं हे न समजल्यामुळं ते गोंधळून गेले होते. त्यांची ही अवस्था चीड आणणारी होती. इर्तिश नदीवरील एका मालवाहू गलबताच्या काही न मोडलेल्या फळ्या नीट, मोडतोड न करता बाजूला काढून ठेवण्याचं काम त्यांच्यावर सोपवण्यात आलं होतं. त्यांनी प्रथम त्यातल्या त्यात लहान फळी बाहेर काढण्याचा प्रयत्न सुरू केला. प्रयत्नांती त्यांनी फळी काढली पण तोवर ती मोडली गेली होती. माफी मागितल्यागत त्यांनी मुकादमाच्या कानावर घातलं : 'आपसूकच मोडली'. त्यानंतर नवीन हत्यारांची वाट पाहाण्याच्या मिषानं बसून राहिले. आपण वेळ वाया घालवत आहोत याची त्यांना फिकीरही नव्हती. दुसरा मुकादम आला. कोणत्या कैद्यानं कुठलं काम करायचं हे त्यानं समजावून दिलं आणि सांगितलं की त्यांनी काम लौकर संपवलं तर त्यांच्या वेळेच्या आधी त्यांना बराकीत परतता येईल. लगलीच प्रत्येक जण जोषात कामाला लागला. ते याचीच वाट पाहात होते हे उघड होतं. 'सुस्तीचा मागमूसही नव्हता, अपात्रतेचं लक्षणही आढळत नव्हतं.... कुऱ्हाडी गिरक्या घेऊ लागल्या... मी चकित झालो. फळ्या न मोडतोड होता बाहेर येऊ लागल्या. वणव्यागत काम चालू होतं. अचानक प्रत्येकजण आश्चर्य वाटावं अशा रीतीनं डोकं वापरत होता. नेहमीच्या वेळेआधी अर्धा तास काम संपवण्यात आलं आणि कैदी आपापल्या निवासात परतले. दमले भागलेले पण खूष'. शेतकऱ्यांचे पूर्वापार चालत आलेले हे डावपेच : 'हेतुपुरस्सर नासधूस करून हुकुमांचा अवमान करणं आणि अडाणीपणाचा बुरखा पांघरून आज्ञाभंग करणं.'

पाश्चात्य विचारसरणीनं प्रभावित झालेल्या रशियनांना स्वतःच्या लोकसंस्कृती-विषयी तुच्छता वाटत होती. असंस्कृत भूतकाळाचा ओबडधोबड आविष्कार असंच त्यांचं त्याविषयीचं मत होतं. बेलिन्स्की लोकगीतांना काडीचंही महत्त्व द्यायला तयार नव्हता. पुष्किनच्या 'द ब्रायडग्रुम' च्या संदर्भात त्यानं असं विधान केलं होतं की, 'या एका गीतात लोकगीताचा जेवढा कस आहे तेवढा सर्व रशियन लोकगीतं एकत्र करूनही मिळणार नाही.' याचाच अर्थ असा होता की अस्सल साहित्यिक मूल्य प्राप्त होण्यासाठी लोकसाहित्य अभिजात रशियन-युरोपिअन संवेदनांमधून शुद्ध होऊन येणं आवश्यक आहे. असाच दृष्टिकोन सैबेरियन काळातील डोस्टोएवस्कीचाही

असणं संभवनीय आहे. त्यामुळंच ख्रिसमसच्या सणात रशियन कैद्यांच्या साध्यासुध्या, गावठी वाद्यांचा ऑर्केस्ट्रा ऐकून त्याला अनपेक्षित आनंद झाला असणं स्वाभाविक होतं. तो सांगतो : 'विश्वास ठेवा माझ्या शद्बावर, तोवर मला कल्पना नव्हती, शेतकऱ्यांच्या गावठी वाद्यांनी काय साधता येतं. स्वरांचा मेळ, त्याहून विशेष, चैतन्य, कल्पकता आणि तालाची उपजत जाण थक्क करणारी होती. रशियन नृत्यामधल्या गीतातला वेहोष आनंद, वेबंदपणा मला प्रथमतःच कळून आला.' असाच अनुभव 'फिलाट्का आणि मिरोश्का' या संगीत प्रहसनाच्या प्रयोगाच्यावेळी आला. हा प्रयोग शेतकरी कैद्यांनी सादर केला होता. त्यांना डोस्टोएवस्कीनं आपल्यापरीनं मदत केली होती. परंतु बाक्लुशिन या कैद्यानं केलेली फिलाट्काची भूमिका त्यानं पाहिलेल्या आधीच्या नटांच्या भूमिकेहून त्याला उजवी वाटली. बाक्लुशिनचा अभिनय सरस होता. पीटर्सवर्गच्या रंगभूमीवरील नट व्यावसायिक होते, युरोपिअन पद्धतीच्या अभिनयाचे संस्कार त्यांच्यावर झालेले होते. डोस्टोएवस्कीला जाणवलं, त्यांचा अभिनय नाटकी होता, उलट बाक्लुशिनचा अभिनय जातिवंत रशियन शेतकऱ्याला साजेसा होता. हा शेतकरी असस्ल होता, पीटर्सवर्गमधल्या रंगमंचावरील शेतकऱ्याचं रुपडं कमअस्सल होतं.

उच्चवर्गीय कैदी आणि शेतकरी कैदी यांच्या संबंधातील जटील गुंतागुंतीचा उलगडा करणं डोस्टोएवस्कीला सुरुवातीला कठीण गेलं होतं. आपण बांधलेले आडाखे चुकीचे असल्याचं त्याच्या ध्यानी आलं होतं. त्याची अपेक्षा होती, शेतकरी-कैदी त्याला आपल्यातला एक समजून त्याच्याशी मैत्री करतील, परंतु कडवट वर्गीय द्वेषानं त्याला झिडकारण्यात आलं होतं. आता त्याला वाटू लागलं होतं, जगाकडे पाहाण्याचा शेतकऱ्यांचा दृष्टिकोन समजून घेऊन त्यानुसार त्यांच्याशी एखादा वागला तर त्यांची दुष्मनी दूर करणं, निदान काही प्रमाणात तर सौम्य करणं शक्य आहे.

'तुरुंगात पाऊल टाकताना माझ्यापुढं प्रश्न होता, मी कसं वागायला हवं, या लोकांबरोबर वागताना कोणती अवधानं मी पाळायला हवीत?' डोस्टोएवस्कीला पडलेल्या या प्रश्नाचं उत्तर त्याला मिळालं, मरेची स्मृती जागी झाली त्या काळात. पोलिश-कैद्यांप्रमाणेच त्यानं शेतकरी-कैद्यांचा जो धसका घेतला होता तो एवढा जबरदस्त होता की शेतकऱ्यांबरोबरचे त्याचे संबंध जुजबी आणि कामापुरते होते. तथापि, दरम्यानच्या काळात त्याच्या अवतीभवती जे घडत होतं त्याबाबत डोस्टोएवस्की पूर्णपणे अंधारात राहिलेला नव्हता, त्याच्या पूर्वग्रहांशी मिळतं जुळतं असं बरचसं त्याच्या अवलोकनात आलं होतं. उदाहरणार्थ, आपल्या वर्गाला साजेसंच त्यानं वागायला हवं, हा शेतकरी-कैद्यांचा आग्रह पाहून त्याला अचंबा वाटला. तो उदारमतवादी होता, पुरोगामी वृत्तीचा होता. त्यामुळं सुरुवातीला शेतकऱ्यांच्या पातळीवर आपण असल्याचं मानून शक्यतोवर त्यांच्याशी बरोबरीच्या

नात्यानं वागला होता. परंतु त्याला आढळून आलं होतं, आपली ही वागणूक त्यांच्याविषयीच्या सद्भावनांची निदर्शक आहे असं त्यांना वाटतच नव्हतं, उलट या त्याच्या प्रयत्नांमुळे तो टिंगलटवाळीचा विषय झाला होता. तो म्हणतो : 'त्यांच्या कल्पनेनुसार माझा आव मी राखायला हवा आणि त्यांच्यापेक्षा आपण उच्च-वर्गीय आहोत याचा अभिमान बाळगायला हवा, प्रत्येक गोष्टीला नाक मुरडायला हवं, म्हणजेच, प्रतिष्ठित "जंटलमन" प्रमाणं वागायला हवं.... अर्थात् मी जर का असा वागलो असतो तर त्यांनी मला शिव्या हासडल्या असत्या. परंतु आतून त्यांनी माझ्याविषयी आदर बाळगला असता.' पुढं तो म्हणतो की अशा तऱ्हेनं वागणं त्याला जमणारं नव्हतं, कारण "जंटलमन"ची त्यांची जी कल्पना होती तसा "जंटलमन" मी कधीच नव्हतो. म्हणजे असं, उच्च वर्ग आणि प्रतिष्ठा यामुळं प्राप्त झालेले हक्क पुरेपूर वसूल करून घेणारा असा "जंटलमन".

सामाजिक दर्जा, प्रतिष्ठा, वरिष्ठांकडून सांभाळली जायला हवी ही शेतकऱ्यांची इच्छा, अधिकाऱ्यांशी ते ज्या तऱ्हेने वागत त्यावरून स्पष्टपणे जाणवत होती. 'आणखीन एका चमत्कारिक गोष्टीचा उल्लेख मला करायला हवा. आपल्या अधिकाऱ्यांनी अगदी सलगीनं आणि अगदी नरमाईनं वागावं हे कैद्यांनाच रुचत नसे. त्यांची इच्छा, त्यांच्यावर अधिकार गाजवणाऱ्यांविषयी त्यांना आदर वाटायला हवा आणि त्यांची थोडीशीदेखील नरमाई त्यांच्याविषयीचा आदर नष्ट करून टाकील. आपल्यावर हुकूमत गाजवणारे अधिकारी पदकांनी विभूषित असले तर ते त्यांना पसंत असत, तो नीटनेटका असलेला त्यांना पसंत असे, त्याच्याहून वरिष्ठ असलेल्या अधिकाऱ्याच्या मर्जीतला तो असणं त्यांना पसंत असे; त्यानं कडक, भारदस्त आणि चोख असलेलं त्यांना पसंत असे आणि त्यानं स्वतःचा आव राखलेला त्यांना पसंत असे. असला अधिकारी कैद्यांना पसंत असे. त्यांना वाटायचं की तो स्वतःचा आव राखतो आणि त्यांचा अपमान करत नाही आणि म्हणून त्यांना वाटायचं सारं काही ठीकठाक आहे, जसं असायला हवं तसं.'

आपल्या दर्जाची शान राखून वागणारे अधिकारी शेतकरी-कैद्यांना पसंत पडत असत. परंतु अशा तऱ्हेनं वागूनही जे आपल्या अधिकाराची बढाई मारत नसत वा आपल्याहून खालच्या दर्जाच्या माणसाकडे गुर्मीनं आणि तुच्छतेनं पाहात नसत अशा अधिकाऱ्यांविषयी त्यांना खरोखरीच आत्मीयता वाटत असे. डोस्टोएवस्कीनं कुतूहल वाटून नमूद केलं आहे की लेफ्टनंट स्मॅकेलोव इतरांप्रमाणेच निर्दयपणे फटक्यांच्या शिक्षेची अंमलबजावणी करत असूनही कैदी त्याच्याविषयी नेहमी आत्मीयतेनं बोलतात. विशेष म्हणजे, त्याच्या झोडपण्याची आठवण ते मायेनं आणि समाधानी वृत्तीनं काढतात. एवढं यश त्यानं संपादन केलं होतं. 'आणि कसं? आणि कशी मिळवली होती त्यानं एवढी लोकप्रियता?.... कसं वागायचं हे स्मॅकेलोवला समजलं होतं म्हणून ते त्याला आपल्यातलाच एक समजत होते आणि ही एक श्रेष्ठ कला आहे. नेमकेपणानं सांगायचं तर, उपजत प्रवृत्ती, ती ज्यांच्यापाशी असते त्यांच्या ते ध्यानीमनीही नसतं.... त्यांच्या हुकुमतीखाली असलेल्यांचा ते

तिरस्कार करत नाहीत, त्यांना तुच्छ लेखत नाहीत, यातच मला वाटतं, स्पष्टीकरण सापडेल. त्यांच्यात अव्वल 'जंटलमनां'ची लक्षणं नसतात, त्यांच्यात उच्च-वर्गीय असल्याचा (दर्जाचा) मागमूसही नसतो.... अत्यंत दयाळू अधिकाऱ्यांहून अधिक कडक अधिकारी ते पसंत करतील, जर का कडक अधिकाऱ्याच्या फटकाऱ्यांत घरगुती लज्जत असेल.'

कैद्यांना वाटणाऱ्या शुत्रत्वाची धार बोथट करण्याच्या कामी चमत्कार घडवू शकणाऱ्या या गूढ प्रवृत्तीचं डोस्टोएवस्कीला कौतुक वाटलं होतं हे उघड आहे आणि त्याची स्वतःची प्रवृत्ती अशा अधिकाऱ्यांशी मिळती-जुळती होती. शेतकऱ्यांना जेवढं औचित्यपूर्ण वाटत होतं तेवढं वर्गीय अंतर त्यानं राखलं. त्याचबरोबर आपल्याविषयीची त्यांची अविश्वासाची भावना नष्ट होण्याइतपत त्यांच्याशी मैत्रीचे संबंध तो जपत राहिला. 'शक्यतोवर साधेपणानं आणि स्वतंत्रपणानं वागायचं असा मी निश्चय केला; त्यांच्याशी घसट व्हावी असा कुठलाही प्रयत्न करायचा नाही, परंतु मित्रत्वानं वागण्याची त्यांची इच्छा असल्यास मात्र त्यांना झिडकारायचं नाही. त्यांच्या धमकावण्यांना आणि तिरस्काराला घाबरायचं नाही आणि शक्य होईल तेवढं तिकडे दुर्लक्ष करायचं.... पोलिश कैदी जसे वागत तशा थंड्या आणि अंतर राखून दर्शविलेल्या नम्रतेनं त्यांच्यापासून चार हात दूर राहाण्याची माझी इच्छा नव्हती.'

काही काळानंतर डोस्टोएवस्कीच्या या प्रयुक्त्यांनी त्याची मनोकामना सफल झाली. परिणामी त्याचा स्वाभिमान जपला गेला, शेतकऱ्यांच्या वृत्तीचा आदर राखण्यात आला आणि त्यांच्या हाडीमासी खिळलेल्या शुत्रत्वाचा त्यांना विसर पडावा अशी परिस्थिती निर्माण झाली. 'लोकांचा (विशेष करून अशा या लोकांचा) विश्वास संपादन करणं आणि त्यांचं प्रेम मिळवणं याहून दुस्तर गोष्ट अन्य नाही. जवळजवळ दोन वर्ष तुरुंगात घालवल्यानंतर कैद्यांची मर्जी संपादन करण्यात मला यश आलं.... त्यांच्यातल्या बऱ्याच जणांचा माझ्यावर लोभ जडला आणि एक "भला माणूस" म्हणून मला ते ओळखू लागले' हे त्याचं यश महत्त्वपूर्ण होतं. त्यामुळं आपल्या बंदिवासाच्या उर्वरित काळातील मानसिक दडपणाशी जुळवून घेणं त्याला जमून गेलं. अस्तित्वात असलेल्या आणि कालौघात प्रस्थापित झालेल्या समाजाहून अन्य समाजाची कल्पना करणं शेतकऱ्यांच्या आकलनशक्तीच्या पलीकडलं असलं तरी अस्तित्वात असलेल्या वर्गीय संबंधानं निर्माण केलेल्या वैरभावनेवर मात करणं शक्य आहे हे त्यानं स्वतः अनुभवलं आणि ही जाणीव त्याच्या मनात घट्ट रुजली गेली. पुढील काळात तो अभिनिवेशानं प्रतिपादन करत असे की रशियात सामाजिक-राजकीय क्षेत्रात बदल घडवून आणण्यासाठी जे प्रयत्न केले जातील त्या प्रयत्नांनी नव्हे तर बहुजनसमाजाविषयी उच्च वर्गीयांच्या ज्या प्रवृत्ती आहेत त्यात नैतिकदृष्ट्या बदल झाल्यानंतरच खरीखुरी सुधारणा घडून येईल.

जगाकडे पाहाण्याचा शेतकऱ्यांचा जो दृष्टिकोन होता तो सहानुभूतीपूर्वक

विचारात घेतल्यापासून डोस्टोएवस्कीच्या लक्षात आलं की उच्च सामाजिक स्तरांवरील लोकांशी समान पातळीवरून वागणं शेतकऱ्यांना नामंजूर होतं. ही वृत्ती त्यांच्यामध्ये उपजतच असते ही जाणीव ख्रिसमसमधील नाट्यप्रयोगाच्या वर्णनात प्रकर्षानं व्यक्त झालेली जाणवते. त्याच्या स्वतःच्या भावभावनात परिवर्तन घडवून आणण्यास कारणीभूत ठरलेली ही एक महत्त्वपूर्ण घटना होती. शिवाय, या प्रसंगी त्याच्या अकस्मात ध्यानी आलं की नाट्यानुभवाच्या प्रामाणिक आणि निष्कपटी आनंदानं शेतकरी-कैद्यांचंही 'पुनरुज्जीवन' झालेलं आहे.

'सर्वांचे चेहरे व्यक्त करत होते साधीभोळी अपेक्षा.... निर्मळ, लहान मुलांना वाटावा अशा आनंदाचा, निर्भर मधुर खुषीचा अनोखा प्रकाश त्यांच्या सुरुकुतलेल्या आणि डागाळलेल्या कपाळावर, गालावर, त्यांच्या सदैव दुर्मुखलेल्या आणि उदास चेहऱ्यावर, क्वचित प्रसंगी धगधगत्या आगीनं फुलणाऱ्या त्यांच्या नजरेत, उजळून निघाला होता.' प्रयोगाच्या वेळी 'अगदी मोकळेपणानं ते आनंद व्यक्त करत होते' आणि प्रयोग संपल्यानंतर ते पांगले तेव्हा ते खुषीत होते, समाधानी होते. 'ते नटाचं कौतुक करत होते, ते सार्जंटचे आभार मानत होते.... प्रत्येकजण कधी नव्हे एवढा समाधानी होता, कुठल्या रात्री झोपला नसेल एवढा गाढ झोपी गेला होता, अगदी शांतचित्तानं – आणि एखादा अचंबा करतो, का? या गरीब लोकांना हवं तसं करायला थोड्या प्रमाणात का होईना, इतर माणसांप्रमाणेच मौजमजा करायला, तुरुंगात नसल्यागत तासाभराचा काळ व्यतीत करायला मोकळीक देण्यात आली होती – काही क्षणापुरतं का होईना त्यांच्यात नैतिक परिवर्तन घडून आलं होतं.'

डोस्टोएवस्की प्रयोगाला आला तेव्हा ज्या तऱ्हेनं त्याचं स्वागत करण्यात आलं त्याचासुद्धा त्याच्यावर खोल परिणाम झाला. आतापावेतो, इतरांकडून त्याला अनादरानं वागवलं जात असे, त्याला खिजगणतीतही घेतलं जात नसे; कामाच्या वेळी त्याचा अडथळा नको म्हणून त्याला दूर सारण्यात येत असे, पण आता, जिथं प्रयोग होणार होता त्या मिलिटरी वॉर्डमध्ये त्यानं प्रवेश करताच ज्या तऱ्हेनं त्याचा सन्मान करण्यात आला त्यानं तो चकित झाला. त्या जागेत प्रचंड दाटीवाटी झाली होती. काही कैदी उभे राहिले होते, बिछान्यांवर बसलेले होते, कामचलाऊ रंगमंचाच्या पाठीमागून बघत होते आणि डोस्टोएवस्कीला मात्र पुढल्या रांगेतलं आसन देण्यात आलं. याचं कारण पेत्रावनं त्याला सांगितलं ते असं : 'कैद्यांच्या बक्षिसीसाठी फिरवल्या जाणाऱ्या थाळीत त्यानं जास्त पैसे टाकावेत हा कैद्यांचा अंतस्थ हेतू होता.' पण त्यांचा हेतू स्वार्थी होता हे पेत्रावचं म्हणणं त्याला मान्य नव्हतं. तो ठासून सांगतो की कैद्यांनी त्याला जी वागणूक दिली होती त्याचं कारण त्यांच्याहून त्याची नाट्यविषयक जाण अधिक आहे हे त्यांनी जाणलं होतं. 'ते माझ्याकडे अशा तऱ्हेनं पाहायचे की मी एक दर्दी आहे. बाक्लुशिन या काळात बऱ्याच वेळा सल्लामसलत घेत असताना आणि माझ्याशी आदरानं वागताना त्यांनी पाहिलेलं होतं आणि या प्रसंगी मला पुढील जागेचा मान देण्यात आला होता.'

आपण असं म्हणतो त्यात तथ्यांश आहे हे वाचकांच्या मनावर ठसवण्यासाठी तो सांगतो : 'त्यांच्या कामात मी कुचकामी असल्याचं पाहून कैदी हसत असत. आम्हा "जंटलमनां"कडे अल्पाशोव तुच्छतेनं पाहात असे आणि संगमरवरी दगडाला जाळायचं कसं याचं ज्ञान आपल्याला आहे म्हणून आमच्यासमोर प्रौढी मिरवत असे. त्यांच्या या गांजणुकीमध्ये, तुच्छतेमध्ये आणखीन एक बाब मिसळलेली आहे : एकेकाळी आम्ही "जंटलमन" होतो, ज्यांच्याविषयीच्या त्यांच्या स्मृती सुखद नव्हत्या, अशा त्यांच्या पूर्वीच्या धन्यांच्याच वर्गातील आम्ही होतो. परंतु आता प्रयोगाच्या वेळी त्यांनी मला जागा करून दिली होती. त्याच्या मते, त्यांच्या वागणुकीत झालेला हा फरक स्पष्टपणे सूचित करत होता की यात वरिष्ठ वर्गीयांची खुशामत करण्याचा भाग नव्हता (आणि तसं असेल कसं, कारण माशी झटकल्यागत कैद्यांनी त्याला सहजी झटकून टाकलं असतं) तर आदर व्यक्त करण्याची भावना होती. या भावनेपोटीच, ज्या क्षेत्रात आपलं प्रभुत्व गाजवणं त्यांच्या कुवतीबाहेरचं होतं तिथं स्वतःचा अधिकार गाजवणं त्यांना उचित वाटत नव्हतं. 'ज्यांना मी थोडादेखील आवडायचो नाही (मला याची खात्री आहे) त्यांना आता प्रयोगाला माझ्याकडून दाद मिळवण्याची उत्सुकता लागून राहिली होती. मला अत्युत्तम जागा दिली त्यात खुषामतीचा अल्पांशही नव्हता.' तर त्याच्याविषयीच्या आदराची भावना होती. 'हा आदर पैशाचा नव्हता तर व्यक्तीचा....(शेतकरी-कैद्यांमधला) असा एकही मला आठवत नाही, ज्यानं पैशाखातीर स्वतःकडे कमीपणा घेतला असेल.'

या घटनेमधून डोस्टोएवस्कीनं तात्पर्य काढलं : 'पात्रता असो वा नसो, प्रत्येक प्रसंगी आणि काहीही करून पुढंपुढं मिरवण्याच्या इच्छेचा मागमूसही सामान्य जनात आढळत नाही. एखाद्याला एवढंच करायला हवं, लादलं गेलेलं बाहेरचं आवरण बाजूला करायला हवं आणि जगाकडे जवळून, लक्षपूर्वक आणि पूर्वग्रह बाजूला सारून पाहायला हवं, आपण कधी कल्पनाही केली नसेल अशा गोष्टी आमच्यातील काही जणांना या लोकांमध्ये दिसून येतील. आमची शहाणीसुरती माणसं त्यांना अधिक काही शिकवू शकणार नाहीत. उलट, मला वाटतं, या लोकांकडून शहाण्यासुरत्यांनी धडे घ्यायला हवेत.'

पुढील काळात डोस्टोएवस्की ज्या काही निष्ठा जोपासणार होता त्यातील एका निष्ठेच्या मुलस्त्रोताशी आपण या ठिकाणी येऊन पोचलो आहोत. रशियन शेतकरीवर्गात नीतिमत्तेची सचोटी मुरलेली आहे, जी एक अलौकिक आदर्श म्हणून 'महाजनां'च्या उपयोगी पडेल असा उद्घोष तो प्रेषिताच्या आवेशानं पुढं करणार होता. आणि या विचाराची त्याचे विरोधक सतत टवाळी उडवत असतानाही आपल्या या निष्ठेच्या सत्यतेविषयी त्याच्या मनात तिळमात्र संदेह निर्माण होणार नव्हता. कारण ही निष्ठा त्याच्या तुरुंगामधील अनुभवावर घट्टपणे पाय रोवून होती. ते स्वानुभवाचे बोल होते. शेतकरी-कैद्यांचं प्रेम संपादन करणं त्यानं आणि इतरांनी कसं जमवलं वा नाट्यप्रयोगाच्या प्रसंगी त्याच्यावर पाशवी शक्ती गाजवण्यास त्यांनी

दिलेला नकार आणि त्या नकारामधून व्यक्त झालेली त्यांची त्याच्याविषयीची आदराची भावना यांचा विसर त्याला कधीच पडणार नव्हता. त्याचा ठाम विश्वास होता की अशा अनुभवांनी रशियन समाज-मनाचा अज्ञात तळ गाठण्याची अलौकिक सूक्ष्म दृष्टी त्याला दिलेली होती. तुरुंगातून सुटल्यावर त्यानं मिखाईलला जे पहिलं पत्र पाठवलं होतं त्यात त्यानं लिहिलं होतं : 'एकंदरीत माझा वेळ वाया गेलेला नाही. मी रशिया पाहिलेला नसेन, पण रशियन माणसं मला चांगल्या प्रकारे समजलीत, कदाचित् तेवढ्या चांगल्या प्रकारे फारच थोड्यांना ती समजली असतील. शक्यता आहे, यात प्रौढीचा अंश असेल, परंतु मला आशा आहे, ती क्षम्य आहे.'

तुरुंगवासाच्या प्रारंभीच्या दिवसात डोस्टोएवस्कीनं आत्मपीडक उपहासानं स्वतःचं समाधान करण्याचा प्रयत्न केला की बाहेरच्या जगातील लोकांमध्ये जसं भल्याबुऱ्याचं मिश्रण असतं, त्याच मिश्रणानं बहुधा तुरुंगामधील व्यक्तींना घडवलेलं असाव. 'मी असा विचार केला तरी ती कल्पना मी डोक्यातून हुसकावून लावायचो. माय गॉड! ती चुकीची नव्हती हे तेव्हा माझ्या ध्यानी येतं तर!' आपल्याबरोबरचे कैदी म्हणजे अधम आणि दुष्ट ॲरिस्टोवच्या प्रतिकृती आहेत अशा दृष्टीनंच तो त्यांच्याकडे बघत होता. परंतु मरे शेतकऱ्याच्या दृष्टांताच्या प्रभावानं त्याचा दृष्टिकोन सर्वस्वी पालटला. आपली चूक त्याला उमगली.

कँपात असे बरेचसे कैदी होते ज्यांनी एखादा तरी खून केलेला होता. असं असलं तरी त्यांच्यामध्येही 'चांगली' माणसं होती असं विधान डोस्टोएवस्कीनं करावं, ही बाब प्रथमदर्शनी गोंधळात टाकणारी आहे. तद्वतच त्याच्याविषयीचे गैरसमज पसरायला कारणीभूत ठरलेली आहे. असं वारंवार म्हटलं जात की एका विवक्षित टप्प्यानंतर उचित आणि अनुचित यामधला भेद डोस्टोएवस्कीला करता येईनासा झाला आणि गुन्हेगारांच्या 'सामर्थ्या'चं तो बारेमाप कौतुक करू लागला (हेच यापूर्वी स्तांधालनं केलं होतं आणि नित्से पुढे करणार होता). तथापि, हे मत, डोस्टोएवस्कीचं लिखाण बारकाईनं आणि पूर्वग्रहाविना वाचल्यानंतर न टिकणारं आहे. गुन्ह्याची तरफदारी त्यानं कधीच केली नव्हती. तो सांगतो : 'वस्तुतः असे काही दृष्टिकोन आहेत ज्यायोगे गुन्हेगाराची तरफदारी करण्यास एखादा प्रवृत्त व्हावा. परंतु, हे सारे संभाव्य दृष्टिकोन असूनही प्रत्येकजण मान्य करील की असे काही गुन्हे असतात, जे जगाच्या प्रारंभापासून, सदैव आणि सर्वत्र, सगळ्या कायद्यांनुसार, व्यवस्थेनुसार विनासंदेह गुन्हेच समजले गेलेले आहेत आणि जोवर मानवजात राहील तोवर ते गुन्हेच समजले जातील. अत्यंत उत्स्फूर्तपणे आणि लहान मुलांप्रमाणं हसतखिदळत सांगितलेल्या अत्यंत भीषण, निर्घृण हत्यांच्या कहाण्या मी तुरुंगातच ऐकल्यात.' यावेळी त्याच्या नजरेसमोर बहुधा गाझिन असावा : 'मला नेहमी वाटायचं की त्याच्याहून अधिक क्रूर, अधिक राक्षसी असं काहीही नसेल... असं सांगितलं जात असे की पूर्वी लहान मुलं कापणं त्याला आवडायचं – केवळ मौज म्हणून;

एकांत स्थळी तो मुलाला लालूच दाखवून घेऊन जायचा, सुरुवातीला तो त्याला घाबरवायचा, छळायचा आणि त्या लहानग्याची भीतीनं गाळण उडालेली पाहून त्याचं पूर्ण समधान झालं, की तो त्याचा गळा कापायचा; थंडपणानं, सावकाश मौज लुटत.' आणि याच क्रूरकर्म्याविषयी तो म्हणतो : 'तुरुंगात तो स्वतः अत्यंत समजूतदारपणे वागायचा, कुणाशीही भांडत नसायचा, भांडण टाळायचा, जणू काही इतरांविषयी तुच्छता वाटत असल्यानं, जणू काही इतरांहून स्वतः चांगले आहोत या समजुतीनं.'

यावरून गुन्हा आणि गुन्हेगारी वृत्ती यांच्याविषयी डोस्टोएवस्कीला सहानुभूती होती असं अनुमान काढणं सर्वथैव गैर आहे. 'गुड' (मंगल) आणि 'इव्हील' (अमंगल) यामधील सीमारेषेची गल्लत न करणाऱ्या नैतिक संकेतांच्या स्वीकृतीवर माणसाची माणुसकी अवलंबून असते, ही त्याची धारणा होती आणि ती त्यानं कधीही दृष्टीआड होऊ दिली नव्हती. आपल्या बराकीतील कैद्यांची त्याला जसजशी अधिकाधिक ओळख पटू लागली तसतसं त्याच्या ध्यानात येऊ लागलं की काही तथाकथित गुन्हे अशा काही कारणांनी घडून आलेत, ज्यांना तो पूर्णपणे निंद्य म्हणू शकत नव्हता. त्याला आढळून आलं होतं की काही गुन्हे चुकीनं आणि ध्यानीमनी नसताना घडून आले होते आणि त्यांच्यामागील उद्देश नैतिकतेचा अभाव वा दुष्टपणा निश्चितच नव्हता. इतरांच्या बाबतीत, असह्य छळातून स्वतःचा बचाव करण्याचं ते एकमेव साधन होतं; असह्य मानहानी होत असताना आपली शान आणि प्रतिष्ठा अबाधित राखण्यापायी वा अन्यायाविरुद्ध उफाळून आलेल्या प्रतिकारापायी गुन्हे घडले गेले होते.

अकिम अकिमिच, तार्तर अली आणि उदासवाणा सुशिलोव हे दुर्दैवानं तुरुंगात येऊन पडले होते. अकिमिचला गुन्हेगार समजणं निश्चितच चुकीचं होतं. कपटी स्थानिक मुखियाला मारणं हे रशियन अधिकाऱ्याचं परमकर्तव्य होतं असं तो समजत होता आणि त्या कर्तव्याचं त्यानं केवळ पालन केलं होतं. अलीलाही गुन्हेगार म्हणणं गैर होतं. आर्मेनियन व्यापारी आणि त्याचे अंगरक्षक यांचा खून करण्यात आणि त्यांचा तांडा लुटण्यात आपल्या वडील बंधूंच्या बरोबरीनं त्यानं भाग घेतला, कारण त्याच्या वडील बंधूंची तशी आज्ञा होती. ज्या वडिलधाऱ्या माणसांविषयी त्याला आदर होता, त्यांच्याविषयीच्या निर्विवाद आज्ञाधारकपणाचा तो शिकार बनला होता. तो एखाद्या सुशील पोरीगत निर्मल होता आणि तुरुंगातील कुठलंही विद्रूप, घाणेरडं अन्यायी कृत्य त्याच्या सुंदर डोळ्यात तिरस्कार फुलवायचं; अशा वेळी त्याचे डोळे अधिकच सुंदर होत. डोस्टोएवस्कीच्या मार्गदर्शनाखाली मुस्लीम अली रशियन भाषेतला 'नवा करार' वाचायला शिकला. त्यातील 'क्षमा करा, प्रेम करा, दुसऱ्यांना दुखवू नका, तुमच्या शत्रूंवरही प्रेम करा' या ख्रिस्ताच्या आज्ञांनी तो विलक्षण प्रभावित झाला होता. अलीचे ख्रिस्ताबद्दलचे उत्साहभरित शब्द डोस्टोएवस्कीच्या थेट काळजाला भिडले आणि 'सर्वांभूती क्षमाशील वृत्ती बाळगा' या ख्रिस्ताच्या विश्वव्यापी आवाहनावरची त्याची श्रद्धा दृढ करण्यास निश्चितच साहाय्यभूत ठरले.



अनुक्रमणिका

सुशिलोव हा डोस्टोएवस्कीचा सेवेकरी होता. शेतकरी-कैदी खरोखरीच कसे आहेत हे प्रारंभी लक्षात येणं किती अवघड आहे याचं उत्तम उदाहरण म्हणून तो सुशिलोवंचा निर्देश करतो. या निरुपद्रवी शेतकऱ्याची रवानगी सैबेरियात का करण्यात आली होती हे कळण्यास मार्ग नाही. बहुधा दुर्दैवाचा फटका. सैबेरियात त्याला आणलं जात असताना अत्यंत अट्टल गुन्हेगारांच्या बरोबरीनं एका 'कनूव्हॉय'-मध्ये डांबण्यात आलं होतं, तरीही गुन्हा समजला जावा असं काही त्याच्या हातून घडलेलं नसावं. तो या गाडीत आला, जन्मठेपेची सजा झालेल्या एका बदमाश गुन्हेगाराच्या भूलथापांना फसून. त्या कैद्यानं त्याला प्रथम व्होडका पाजला. नंतर त्याला एक सिल्वर रुबल आणि एक लाल सदरा दिला. आपण काय करून बसलो हे त्याच्या ध्यानी आलं तेव्हा बराच उशीर झाला होता. आणि सुशिलोव बेमुदत सजा भोगणाऱ्या अत्यंत खतरनाक कैद्यांच्या 'खास विभागात' चमत्कारिकरीत्या येऊन पडला. 'सुशिलोव एक दयनीय असामी होती. त्याच्यात अजिबात दम नव्हता. तो विनम्र होता. त्याला कुणीही वाईट वागवत नव्हते तरी बघावं तेव्हा रडतोंड्या. त्याचा तो प्रकृतीस्वभावच बनून गेला होता.' डोस्टोएवस्कीवर त्याची अलोट भक्ती. एक दिवस डोस्टोएवस्कीच्या एका छोट्या कामाकडे त्याचं दुर्लक्ष झालं म्हणून त्याला डोस्टोएवस्कीनं खडसावलं, सांगितलं की त्याच्या कामाचे पैसे दिले जातात. त्यानंतर बरेच दिवस तो उदास उदास होता. एक दिवस डोस्टोएवस्कीनं त्याला काही पैसे देऊ केले तेव्हा ते त्यानं नाकारले आणि तो धावत बाहेर गेला आणि आपलं डोकं त्यानं मेढेकोटावर आपटलं आणि तो ढसाढसा रडू लागला. तो डोस्टोएवस्कीची सेवाचाकरी करत होता ती त्याच्यावरील प्रेमापोटी, पैशासाठी नव्हे हे डोस्टोएवस्कीनं जाणलं नाही याचं त्याला भारी दुःख झालं होतं. म्हणजेच निरिच्छ मानवी भक्तीच्या अत्युत्तम भावना संवर्धन करण्याची क्षमता रडतोंड्या सुशिलोवमध्ये होती.

सुशिलोवसारखी नरम प्रकृतीची आणि निरुपद्रवी माणसं अपवादात्मक होती. त्याहूनही अगदी भिन्न प्रकृतीचे, दहशत वाटावी असे कैदीही होते. त्यांच्याकडेही सहृदयतेनं पाहाण्यास डोस्टोएवस्की शिकला. त्याला कळून चुकलं होतं की या कैद्यांचं नैतिक अधःपतन झालेलं नाही. त्यांच्या गुन्ह्यांची कारणं डोस्टोएवस्की उघडपणे सांगत नसला तरी त्यानं वेळोवेळी दिलेले तपशील अत्यंत बोलके आहेत. कँपातला अत्यंत खतरनाक माणूस पेत्राव. तो सोजिर होता. ड्रिलच्यावेळी एक दिवस कर्नलनं त्याला तडाखा दिला. शक्यता आहे, यापूर्वीही त्यानं त्याला कैकदा तडाखे दिले असतील. पण यावेळी तो सहन करणं पेत्रावला अशक्य झालं. त्यानं तुकडीच्या डोळ्यांदेखत, लख्ख सूर्यप्रकाशात त्या कर्नलला भोसकलं.

ल्युका कुझ्मिच आपण क्रूरकर्मा असल्याची बढाई मारत असे पण त्याची फारशी दखल कुणी घेत नसे. त्याला प्रथम अटक करण्यात आली ती एका क्षुल्लक अपराधासाठी : तो मनमानी भटक्या होता. जेवणाची व्यवस्था पाहाणाऱ्या मेजरवर त्याचा खुन्नस होता. तो मेजर खाणं खराब द्यायचा आणि उर्मटपणे वागायचा. कुझ्मिचनं ठरवलं, त्याला धडा शिकवायचा. एक दिवस 'मी झार आहे,

मी परमेश्वरसुद्धा आहे' अशी आरोळी ठोकून त्यानं प्रवेश केला. त्याच्या त्या आरोळीनं प्रत्येकाच्या छातीचे ठोके चुकवले. मेजरनं त्याला दमात घेतलं तेव्हा त्यानं सुनवलं की, 'परमेश्वरानं स्वतःहून आपल्या सर्वांवर एक परमेश्वर आणि एक झार नेमलेला आहे.' मेजरच्या रागाचा पारा चढला. तो अद्वातद्वा बोलला आणि कुझ्मिचनं घवताळून त्याच्या पोटात सुरा खुपसला. ही कथा सांगून डोस्टोएवस्की स्पष्टीकरण देण्याची तसदी घेतो, अर्थात्, फक्त भूतकाळाशी आपलं भाष्य काळजीपूर्वक मर्यादित ठेवून. तो सांगतो की दुर्दैवानं जुन्या काळात बरेचसे वरिष्ठ अधिकारी अशाच तऱ्हेनं वागत असत आणि त्याची परिणती अशीच होत असे. 'आत्मगौरवाची ही मग्रुरी, आपण काहीही करू शकतो ही अवास्तव कल्पना, विनम्र माणसामध्येही तिरस्कार जागा करते आणि त्याची सहनशक्ती खतम करून टाकते.'

आणखीन एक कैदी, सिरोट्कीन. सौम्य प्रकृतीचा, देखणा. समलिंगसंभोगी. लष्करी जीवनाची कडक शिस्त आपल्या अंगवळणी पाडण्यास तो पूर्णपणे असमर्थ ठरला. तशात एका अधिकाऱ्यानं त्याचा पुरा पिच्छाच पुरवला. या भोगातून सुटका करून घेण्यासाठी त्यानं आत्महत्त्या करण्याचाही प्रयत्न केला, तो अयशस्वी ठरला आणि त्यानंतर एक दिवस रागाच्या भिरकीत त्यानं आपल्याला त्रास देणाऱ्याचा जीव घेतला. सुस्वभावी बाक्लुशिनलाही अट्टल गुन्हेगार समजणं डोस्टोएवस्कीला जड जात होतं आणि त्यानं स्वतःविषयी जे सांगितलं होतं त्याच्या सत्यतेविषयी डोस्टोएवस्कीच्या मनात तिळमात्र संदेह नव्हता. त्यानं सांगितलं होतं : ज्या वयस्कर जर्मनाचा त्याच्या हातून खून झाला होता त्याला फक्त भेडसावण्याची त्याची इच्छा होती. एका सुरेख जर्मन मुलीशी विवाह करण्यापासून त्याला परावृत्त करण्यासाठी त्याला धाक दाखवणं एवढाच त्याचा हेतू होता. त्या मुलीच्या इच्छेविरुद्ध तिचं लग्न ठरवण्यात आलं होतं. बाक्लुशिन सामान्य होता, एक कफल्लक सोजिर होता, तरी त्याच्यावर तिचं प्रेम होतं. तिनं तशी कबुलीही दिली होती. म्हणून बाक्लुशिन त्या जर्मनाला वेळोवेळी धमकावत होता आणि 'माझ्यावर गोळी झाडण्याएवढी हिंमत आहे कुठं तुझ्या अंगी' असं म्हणून जर्मन त्याला खिजवत होता. एक दिवस बाक्लुशिनचं माथं भडकलं. स्वतःच्या रागाला काबूत ठेवणं त्याला मुष्किल झालं. त्यानं त्या जर्मनाचा गोळ्या झाडून मुडदा पाडला. भावनेच्या भरात झालेल्या या गुन्ह्यापायी त्याला त्या मानानं साधी कैद झाली असती. पण त्याच्याकडून आणखीन एक आगळीक घडली. त्याच्या कॅप्टननं न्यायालयात आपल्यासंबंधी अर्वाच्य शब्द वापरले म्हणून त्यानं हरकत घेतली आणि न्यायदेवतेसमोर आपला अपमान केला म्हणून कडक शब्दात त्याची हजेरी घेतली. न्यायालयाची शान राखण्याविषयीची त्याची कळकळ आणि अवहेलना स्वीकारण्यास त्यानं दिलेला नकार, त्याला 'खास विभागात' घेऊन गेला.

ज्यांच्यावर तडकाफडकी दोषारोप करणं डोस्टोएवस्कीला जड जात होतं अशा गुन्हागारांची ही वानगीदाखल काही उदाहरणं. 'हाऊस ऑफ द डेड' मध्ये असा एक परिच्छेद आहे, ज्यात बऱ्याचशा कैद्यांना सर्वसाधारणपणे निर्दोष ठरवण्यात

आलं आहे. अर्थात्, त्यांच्या व्यक्तिगत इतिहासाचा तपशील मात्र देण्यात आलेला नाही. अशी काही माणसं आहेत जी सश्रम कारावासाची सजा आपल्याला व्हावी या हेतूनंच गुन्हे करतात. बाहेरच्या जगात त्यांना खडतर कष्टाची कामं करावी लागत, अगदी निकृष्ट अवस्थेत जगावं लागे, पुरेसं अन्न खायला मिळत नसे आणि पिळवणूक करणाऱ्यांसाठी सकाळपासून रात्रीपर्यंत मरेस्तोवर राबावं लागे. यातून सुटका व्हावी म्हणून ते गुन्हेगारीचा आश्रय घेत. निर्दय जमीनदाराकडे वेठबिगार म्हणून जगण्यापेक्षा सश्रम कारावासातील जगणं त्यांना अधिक पसंत असे. त्यांच्या या निवडीबाबत डोस्टोएवस्की नाराजीचा वा तक्रारीचा सूर काढत नाही. त्याच्या या धारणांच्या संदर्भात या पुस्तकातील एक अत्यंत प्रसिद्ध असा परिच्छेद विचारात घ्यावा लागेल. हा वारंवार उद्धृत केला जातो आणि बऱ्याच वेळा त्याचा चुकीचा अर्थ लावला जातो. तो सांगतो : 'काही झालं तरी, आपण संपूर्ण सत्य सांगायलाच हवं; ही माणसं असाधारण माणसं होती. कदाचित, आपल्या लोकांमधील सर्वात गुणवान आणि कणखर असे ते होते. त्यांचे गुन्हे त्यांच्या व्यक्तिमत्वाच्या कणखरपणामधून आणि अंतःप्रेरित नीतिमूल्यांची जपणूक करण्यापायी उफाळून आले होते, तेही अशा परिस्थितीत जियं दुसरे पूर्णपणे नेस्तनाबूत झाले असते.'

एक गुन्हा आणि दुसरा गुन्हा यामधील नैतिकदृष्ट्या असलेल्या भेदाची डोस्टोएवस्कीची जाणीव, तो स्पष्ट करतो त्यानुसार, 'तो तुरुंगात असेपर्यंत सदासर्वकाळ त्याला झपाटून टाकणाऱ्या विचारास प्रवृत्त करती झाली.' जिचा पूर्णपणे उलगडा करता येणं शक्य नव्हतं अशी एक समस्या. ही समस्या अशी होती : एकाच प्रकारच्या गुन्ह्यांना, कायद्यान्वये साधारण एकाच प्रकारची शिक्षा मिळत असते, जरी ज्या कारणांसाठी ते घडले होते ती, नैतिकदृष्ट्या सांगायचं झालं तर, अतिशय भिन्न भिन्न असत. एखाद्यानं खून केला असेल, उगाचच. एखाद्या कांद्यासाठी त्यानं हमरस्त्यावर एका शेतकऱ्याचा खून पाडला, नंतर त्याला आढळून आलं की त्याच्यापाशी काहीही नव्हतं, फक्त एक कांदा होता (तुरुंगात एक म्हण प्रचलीत होती : 'शंभर खून आणि शंभर कांदे (एका कांद्याचा एक कोपेक) आणि तुमच्या हाती एक रुबल.' दुसरा एखादा स्वतःच्या वाग्दत्त वधूच्या, बहिणीच्या वा मुलीच्या शीलाचं रक्षण करण्यासाठी कामुक अरेराव्याचा मुडदा पाडतो. दुसरा एखादा असतो फरारी. (म्हणजे पळून गेलेला वेठबिगारी) त्याचा शोध घेणाऱ्या तुकडीकडून त्याला टिपून काढण्यात येतं. तो स्वतःचं जीवन भुकेकंगाल असलं तरी स्वतःच्या बचावासाठी खून करतो; आणि दुसरा एखादा बालकांना जीवे मारतो, मौजेखातर; जीव घेण्यातील मौज, स्वतःच्या हातावर त्याचं ऊन ऊन रक्त अनुभवण्यातली मौज, त्यांचा थरकाप आणि सुऱ्याखाली कबुतरागत चाललेली त्यांची अखेरची तडफड पाहाण्यातली मौज. तरीही या सर्वांची सश्रम कारावासासाठी रवानगी करण्यात येते. शिक्षेच्या मुदतीचा काळ कमी-अधिक केल्यानं ही समस्या सुटू शकत नव्हती, कारण 'जेवढ्या व्यक्ती तेवढ्या विविध छटा'. डोस्टोएवस्की अखेर हार

मान्य करतो. ती न सुटणारी समस्या आहे, वर्तुळाचा चौकोन करू पाहाण्यासारखी.

पुढील काळात न्यायालयीन कामकाजाबाबत डोस्टोएवस्कीच्या मनात जो मनस्वी तिटकारा आपल्याला आढळून येतो त्याची पूर्वसूचना त्याच्या वरील विचारसरणीत मिळते. त्याच्या मते, गुन्हा शाबीत करण्याकरता न्यायालयात कायद्याचा कीस काढला जातो, पण गुन्हेगाराचं हृदय आणि मन यांचा शोध घेण्याचा प्रयत्न मात्र क्वचितच केला जातो. 'क्राईम अँड पनिशमेंट' मधला रास्कोल्निकोवला गुन्ह्यासाठी प्रवृत्त करणाऱ्या प्रेरणा समजावून घेणारा सहृदयी पॉरीफिरी पेत्रोविच अपवादात्मकच. या संदर्भातील आपल्या चीडीला तो वाट मोकळी करून देणार होता दूमित्री कारमाझोवच्या कथित गुन्ह्याचं चित्रण करतेसमयी.

तूर्त आपण पाहू शकतो ते एवढंच : आपल्या बरोबरच्या नाना तऱ्हेच्या कैद्यांमधील विविध मानवी प्रवृत्तींच्या आकलनानं सैबेरियनपूर्व काळातील डोस्टोएवस्कीच्या भूतदयावादी निष्ठांच्या कक्षा रुंदावल्या गेल्या होत्या – 'गुड' आणि 'इव्हील' यामधील भेदाभेद पुसून टाकण्यास त्याला प्रवृत्त न करता, शेतकरी-कैद्यांविषयीची अनिवार सहानुभूती समाजमान्य नैतिकतेच्या सीमा कोलमडून पाडण्याइतपत विस्तारताच, दुर्बल आणि मूलतः अनाग्रही असलेल्या व्यक्तीकडे बघण्याच्या त्याच्या कीवसदृश भावविवशतेला आता शोकात्मिक व्यामिश्रतेचं परिमाण लाभलं. गुन्ह्यांहून अधिक महत्त्वाच्या होत्या त्यामागील प्रेरणा, भोवतालची मानवनिर्मित परिस्थिती, ज्या मार्गे गुन्हा आपलं डोकं वर काढतो. दयनीय सुशिलोव डोस्टोएवस्कीच्या साहित्यिक भूतकाळाकडे निर्देश करतो, तर तुरुंगातील त्याच्या बऱ्याच सोबत्यांविषयीचा त्याचा आदर निःसंदिग्धपणे भविष्याकडे नजर लावतो.

शेतकरी-कैद्यांच्या गुन्ह्यांमागील कारणांशी अधिकाधिक परिचय होत गेल्यामुळं त्यांच्याबरोबरच्या डोस्टोएवस्कीच्या वागणुकीवर परिणाम झाला. ख्रिश्चन नीतिमत्तेविषयी त्यांच्या मनात वसत असलेली पूज्य बुद्धी, तिचा स्वीकार करण्याची त्यांची उपजत वृत्ती त्यानं पाहिली आणि त्यानंही तो प्रभावित झाला. आपल्या कृत्यांविषयी ते कुठल्याही प्रकारे पश्चात्ताप व्यक्त करत असल्याचं त्याला आढळून आलेलं नसलं तरी तशी शक्यता असल्याचं तो नाकारत नाही. त्यांच्या काळजाचा तळठाव त्यानं गाठला होता कुठं? शिवाय, त्यानं एक सिद्धांत विकसित केला होता, तो असा : शेतकरी आणि उच्च वर्गीय यांची सद्सद्विवेकबुद्धी एकाच मापानं जोखली जाता कामा नये. शेतकऱ्यांच्या दृष्टिकोनानुसार, त्यांच्या वरिष्ठांविरुद्धचे त्यांचे गुन्हे हे गुन्हे नव्हेतच; त्या दोन वर्गात चाललेल्या शाश्वत वर्गलढ्यातील केवळ नाममात्र घटना हे त्यांचं स्वरूप आहे. '(शेतकरी) गुन्हेगाराला ठाऊक असतं, त्याबाबत त्याला तिळमात्र संदेह नसतो की त्याच्या स्वतःच्या वर्गाचा निवाडा त्याला दोषमुक्त करील, तो कधीही त्याला दोषी ठरवणार नाही (किंबहुना त्याला पूर्णपणे निर्दोष ठरवील), जोवर त्यानं त्याच्या बरोबरचे, त्याचे भाऊ, त्याचे सहकारी शेतकरी यांच्याविरुद्ध त्यानं अपराध केलेला नाही.' अशा गुन्ह्यांबद्दल

शेतकरी-कैदी पश्चात्ताप करत नाहीत याचा अर्थ असा नव्हे की त्यांच्यामध्ये नीतिमत्तेचा पूर्णपणे अभाव होता; नेमकं उलटं प्रत्ययाला येत होतं. आपण यापूर्वीच पाहिलेलं आहे की इस्टर सोहळ्याच्या वेळी शेतकरी-कैद्यांचा भक्तिभाव किती उचंबळून येत असे. कँपातल्या जीवनातील निर्दयता आणि अमानुषता काही प्रमाणात तरी सौम्य करण्यासाठी 'ख्रिश्चन' श्रद्धा साहाय्यभूत ठरलेली आहे या संदर्भात डोस्टोएवस्की बरीच उदाहरणं देतो.

तुरुंगात पाऊल टाकल्याटाकल्याच डोस्टोएवस्कीला कळून चुकतं की सारे कैदी निलाजरेपणानं आणि सातत्यानं एकमेकांच्या चोऱ्या करत असतात. या गोष्टीचा त्याला विषाद वाटतो. त्यानंतर त्याला असंही आढळून येतं की झाडून सारेजण चोरीचा माल, 'ऑर्थोडोक्स' चर्चला आग लावल्यामुळे तुरुंगात आलेल्या स्तोरोदुवोवस्की याच्याकडे देत. कारण त्याच्या हाती सुपूर्द केलेला माल सुरक्षित राहाणार याविषयी प्रत्येकजण निःशंक असतो. आपल्या सात्विक वृत्तीमुळं त्यानं सर्वांचा विश्वस संपादन केला होता. आणखीनही एक वयस्कर कैदी होता. तो पोलिश होता. नाव झेड. (झोकोवस्की). तुरुंगात त्यानं पाऊल टाकताक्षणीच त्याला फटकारून काढण्यात आलं होतं. कैद्यांना त्याच्याविषयी आदर होता. कारण अंगावर सपासप फटकारे बसत असतानाही त्यानं डोळ्यातून टिपूस काढलं नव्हतं. त्याहूनही विशेष, मारझोड संपल्यानंतर तात्काळ गुडघे टेकून त्यानं भक्तिभावानं प्रार्थना केली होती. अशी धार्मिक कणव कैद्यांना नेहमीच भावत असे. आपल्या रक्षक-संताचा दिवस शेतकरी-कैदी नेमाने साजरा करत असे. ज्याची ऐपत असे तो कैदी मेजवानी, दारू यांची चंगळ करत असे. परंतु, डोस्टोएवस्की नमूद करतो : या दिवशी उठल्याबरोबर कैदी पवित्र प्रतिमेसमोर मेणबत्ती लावून प्रार्थना करत असे.

आपल्याला ठाऊक आहे की बराकीमधील माणसांचा सहवास बऱ्याचवेळा डोस्टोएवस्कीच्या मस्तकात जात असे आणि त्याला उदास करून टाकत असे. म्हणून धार्मिक सणासुदीच्या काळात, काही काळापुरता का होईना, शेतकरी-कैद्यांच्या वर्तणुकीमध्ये जो बदल घडून येत असे, तो त्याला सुखद वाटत होता. ते धार्मिक विधीचे काटेकोरपणे पालन करत. ते प्यालेले असले तरी धार्मिक विधीविषयी आदर बाळगून वागत. या उदात्त वातावरणाचा भंग करण्याचा अजाणता का होईना कोणी प्रयत्न केल्यास बाकीचे कैदी आरडाओरड, शिवीगाळ करत त्याच्या अंगावर जात. धार्मिक भावनांचा अनादर केलेला त्यांना खपत नसे. नेहमीच्या त्यांच्या बेबंद वागणुकीच्या संदर्भात हे वागणं त्याला निश्चितच दिलासा देणारं होतं. त्याचबरोबर त्यांच्या 'ख्रिश्च्यानिटी'नं एक महत्त्वपूर्ण भूमिका बजावली असल्याचं त्याच्या ध्यानी आलं होतं : कैद्यांचा गुन्हा कुठलाही असो, एक घटक म्हणून त्याला मानवी समाजात सामावून घेतलं जात असे. 'त्या महान दिवसाविषयी त्यांना उपजत श्रद्धा असे. शिवाय, त्यांना वाटत असे, का ते त्यांचं त्यांनाही सांगता आलं नसतं, की ख्रिसमस पाळल्यानं अवघ्या जगाशी ते संबंध राखून आहेत, ते बहिष्कृत आणि हरवून गेलेले नाहीत, वाळीत टाकले गेलेले नाहीत. बाहेरच्या माणसात असल्याप्रमाणेच





अनुक्रमणिका

तुरुंगात असणं होतं' आणि हा त्यांचा भ्रम नव्हता.

धार्मिक सुट्टीच्या दिवशी दानधर्म केला जात असे. 'गावात मध्यम वा कनिष्ठ वर्गातली अशी एकही गृहिणी नसेल, जिनं जे शिजवलं असेल त्यातली एखादी तरी वस्तू ख्रिसमसच्या शुभेच्छा म्हणून कैद्यांना पाठवली नसेल. 'रशियातील उच्च वर्गीयांना कल्पना नाही, आपले व्यापारी, वाणी आणि शेतकरी यांना "दुर्दैवी जीवाविषयी" किती गाढ आत्मियता असते.' या वृत्तीचा उच्च आणि शिक्षित वर्गात अभाव असतो असं डोस्टोएवस्कीला प्रामाणिकपणे वाटतं. भेटी आणि दाते यांच्यात भेदभाव न करता साऱ्या भेटी कृतज्ञतेनं स्वीकारल्या जात. भेट स्वीकारताना कैदी आपली टोपी काढत, नतमस्तक होत, आपल्या ख्रिसमसच्या शुभेच्छा देत आणि भेट स्वयंपाकघरात घेऊन जात. सर्व भेटींचा ढिगारा झाल्यानंतर ज्येष्ठ कैद्यांना बोलावण्यात येई आणि ते कैद्यांमध्ये त्यांची समान वाटणी करत. दमदाटी वा भांडाभांडी होत नसे. हे काम प्रामाणिकपणे व डावं उजवं न करता होत असे. डोस्टोएवस्कीच्या बरॅकीत अकिम अकिमिच आणि दुसरा एक कैदी वाटणी करत असत. ते आपल्या हातांनी प्रत्येक कैद्याला त्याचा वाटा देत. अशा प्रसंगी थोडीशी देखील नाराजी नसे, यत्किंचितही असूया नसे, सर्वजण समाधानी असत. भेटी दडवून ठेवण्यात आल्या आहेत वा अन्यायकारकरीत्या वाटणी करण्यात आली आहे असा कुणीही संशय घेत नसे. एकमेकांच्या वस्तू सतत लंपास करणं आणि नित्याची भांडणतंटे या पार्श्वभूमीवर हे चित्र किती आगळंवेगळं आणि हृद्य होतं!

धार्मिक सणासुदीनिमित्तच केवळ गावातील लोक दानधर्म करत असं नव्हे, तर वर्षाचे तिनशेपासष्ट दिवस या ना त्या स्वरूपात त्यांचा दानधर्म चालत असे. ओम्स्कमधील रस्त्यावर कैदी काम करत असताना त्यांना काही वेळेला पैसे दिले जात. अशी भिक्षा डोस्टोएवस्कीला तो तुरुंगात आल्याआल्याच मिळाली होती. एका तरुण सोजिराची दहा वर्षाची एक मुलगी आपल्या मरणोन्मुख वडिलांना भेटण्यासाठी लष्कराच्या हॉस्पिटलात आली होती तेव्हा तिनं डोस्टोएवस्कीला तिथं पाहिलं होतं. त्यानंतर एक दिवस ती वडिलधाऱ्यांबरोबर रस्त्यामधून चालली असताना डोस्टोएवस्कीच्या शेजारून पुढं गेली. पुढं गेल्यावर तिला ओळखीचा चेहरा आठवला. ती धावत माघारी आली. "गरीब बिचारा, हा घे कोपेक, ख्रिस्ताच्या नावानं." मला गाठून ती ओरडली आणि माझ्या हातात तिनं नाणं कोंबलं.... तो कोपेक बरीच वर्षं मी जपून ठेवला होता.' तो पुढे बऱ्याच वर्षांनी हरवला तेव्हा डोस्टोएवस्की अत्यंत अस्वस्थ झाला होता. 'क्राइम अँड पनिशमेंट'मध्ये एका छोट्या मुलीनं दान केलेलं वीस कोपेकचं नाणं रास्कोल्निकोव नेवाच्या पात्रात भिरकावून देतो. ही त्याची प्रतीकात्मक कृती, मानवजातीबरोबरचे आपले संबंध त्यानं झिडकारून टाकल्याचं, सहानुभूती आणि करुणा या प्रेरणा अव्हेरल्याचं सूचित करते. यावरून सैबेरियात मुलीनं दिलेला कोपेक जीवापाड जपून ठेवण्यामागील डोस्टोएवस्कीच्या भावना आपण जाणू शकतो.

तळागाळातल्या रशियनांची ही धार्मिक वृत्ती पाहून डोस्टोएवस्की हेलावून गेला होता. त्या लोकांच्या संपर्काचा शेतकरी-कैद्यांवर, अल्पसा का होईना, चांगला परिणाम झाल्याची प्रचीती त्याला आली होती. परिणामी मरे शेतकऱ्याच्या दृष्टांताला अधिकच बळकटी लाभली होती. त्याहूनही विशेष, त्याला कळून चुकलं : सैबेरियनपूर्व काळातील त्याच्या साहित्यकृतींमधून मानवतावादी आदर्शाचं जे चित्रण त्यानं केलं होतं, त्याला रशियन जीवनात पाश्चात्य विचारसरणीच्या रशियन बुद्धिवंतांनी आणलेले पुरोगामी विचार कारणीभूत झाले होते हा त्याचा समज हा एक भ्रम होता; वस्तुतः ज्यांचा तिरस्कार केला जात होता, ज्यांच्याविषयी तुच्छतेनं बोललं जात होतं त्या रशियन शेतकऱ्यांच्या अंतःप्रेरित नैतिक धारणेमध्ये ते आदर्श वास करत असतात. म्हणूनच पुढील काळात, ख्रिश्चन मूल्य बाजूला सारून नैतिकतेच्या अन्य कल्पना रुजवू पाहाणाऱ्यांचा डोस्टोएवस्की कडवा विरोधक बनला यात आश्चर्य वाटायला नको. त्याची पुरती खात्री झाली होती की पुरोगाम्यांची ही कृती म्हणजे त्याला परिचित झालेल्या रशियन जीवनाचा मूळ नैतिक पायाच उखडून टाकणं.

कारावासाची मुदत संपेस्तोवर, 'जंटलमन' म्हणून परकेपणाची भावना दूर करणं जरी डोस्टोएवस्कीला शक्य झालं नव्हतं, तरी तो कल्पनाही करू शकला नसता एवढी नैतिकदृष्ट्या आणि भावनिकदृष्ट्या बऱ्याचशा कैद्यांशी एकात्मता साधणं त्याला शक्य झालं होतं. त्याच्या निष्ठांच्या पुनरुज्जीवनाच्या प्रक्रियेमध्ये महत्त्वपूर्ण योगदान करणाऱ्या त्याच्या प्रखर राष्ट्रीयत्वानं ही एकात्मता वाढीला लावली. १८५६ मध्ये त्यानं माइकोवला लिहिलं होतं : 'मी खात्रीनं सांगतो तुला की रशियाशी संबंधित असलेल्या प्रत्येक गोष्टीशी माझं एवढं रक्ताचं नातं जडलंय की कैदीही मला भेडसावत नव्हते: ते रशियन होते, विपत्तीमधील माझे बंधू आणि दरोडेखोराच्या हृदयाचा मोठेपणा आढळून आल्यामुळं मला कैकदा आनंद झाला आहे, कारण मी त्याला जाणू शकत होतो, याचं कारण मीसुद्धा रशियन होतो.'

वारंवार असं म्हटलं जातं की तुरुंगाच्या कँपात डोस्टोएवस्कीला मानवी प्रवृत्तीमधल्या 'इव्हील' चा शोध लागला आणि या शोधानं, मानवजातीच्या अंगभूत दुष्टाव्याच्या विरोधात नैतिकतेचा एकमेव संरक्षक तट म्हणून 'सुपरनॅचरल' श्रद्धांचा स्वीकार करण्यास त्याला भाग पाडलं. यावर एखादा असा प्रतिवाद करील की हा शोध काही त्याला नव्यानं लागला नव्हता. दुष्ट प्रवृत्तीची माणसं त्याच्या प्रारंभीच्या कथांमधूनही आढळतात. शिवाय हा दृष्टिकोन 'हाऊस ऑफ द डेड' मधील पुराव्याशी क्वचितच जुळतो. वस्तुतः त्याला शोध लागलाच असेल तर तो नेमका उलटा. त्याचा प्रारंभी विश्वास बसणंही अशक्य होतं अशी भली माणसं शेतकरी-कैद्यांमध्ये त्याला आढळून आलेली होती. अर्थात्, काही कैद्यांमधील दुष्ट प्रवृत्तींनी त्याच्यापुढं काही प्रश्न खडे होते एवढं बरीक खरं होतं. मात्र, त्या अनुषंगानं त्यानं जो विचार केला होता त्या विचारमंथनामधून तो ज्या निष्कर्षाप्रत पोचला होता त्याचा त्याच्या आजवरच्या धार्मिक दृष्टिकोनाशी संबंध नव्हता.

डोस्टोएवस्कीची धार्मिक श्रद्धा आणि अशी श्रद्धा बाळगणं ही मानवाची नितांत गरज आहे ही त्याची धारणा, मानवी दुष्ट प्रवृत्तीत सुधारणा संभवनीय नाही या भीतीपोटीच होती, असं अनुमान काढणं चुकीचं ठरेल. ही तथाकथित भीती निर्माण होण्याआधी बऱ्याच काळापासून ख्रिस्तावर त्याची श्रद्धा होती. या ठिकाणी हेही लक्षात घेणं जरूरीचं आहे की मानवी प्रकृतीला 'इव्हिल'चं अनावर आकर्षण वाटतं, त्याच्या मुळाशी 'आद्य पाप' आहे या विचारप्रणालीचा प्रभाव रोमन कॅथॉलिक व प्रोटेस्टंट यांच्यावर जेवढा असतो तेवढा पौर्वात्य ख्रिश्चनांमध्ये नसतो. मानव ही परमेश्वराचीच प्रतिकृती आहे ही भावना 'ऑर्थोडॉक्सी'मध्ये एवढी प्रबळ असते की 'आद्य पापा'ची कल्पना 'ऑर्थोडॉक्स' चर्चमध्ये कधीच रुजू शकली नाही. 'ऑर्थोडॉक्सी'च्या मते पाप 'घातक' आहे, 'परमेश्वराच्या प्रतिमेवरील कलंक आहे', पण माणसाची मूळ उदात्तता ते त्याच्यापासून हिरावून नेऊ शकत नाही. हा दृष्टिकोन, माणूस हा मूलतःच 'इव्हिल' आहे या पाश्चात्य ऑगस्टीनियन तत्त्वप्रणालीहून, डोस्टोएवस्कीला तुरुंगाच्या कँपात जे आढळून आलं होतं त्याच्याशी अधिक मिळताजुळता होता. अर्थात्, आजवर त्याला जे ठाऊक होतं त्याहून कितीतरी पटीनं दुष्टपणाचा अर्क काही व्यक्तींमध्ये असतो याची जाणीव त्याला कारावासात झाली हे सत्य आहे. त्याचबरोबर, त्याला असंही आढळून आलं होतं की त्याच्या बऱ्याचशा सहकारी कैद्यांमध्ये माणुसकी शिल्लक राहिली होती याचं कारण त्यांची परंपरानिष्ठ 'ख्रिश्चानिटी' आणि असेही काही कैदी होते जे 'गुड' आणि 'इव्हिल' यातला भेद जाणण्याची सारी क्षमता गमावून बसले होते; हे कैदी वेगळ्याच जातकुळीतले होते. त्यातील ठळक नमुना म्हणजे ॲरिस्टोव. गाझिनही याच जातकुळीतला. त्याच्याकडे पाहिलं की डोस्टोएवस्कीला वाटायचं : तो 'माणसाच्या आकाराच्या एका अजस्त्र कोळ्याकडे पाहातोय' (संपूर्ण 'इव्हिल'चं प्रतीक म्हणून डोस्टोएवस्की बऱ्याचदा कोळ्याचा वापर करतो.)

दहशत वाटावी अशी आणखीनही एक व्यक्ती म्हणजे कोरेनेव, दरोडेखोरांचा म्होरक्या. डोस्टोएवस्की टोबेल्स्कमध्ये मुक्कामाला होता तेव्हा त्यानं कोरेनेवला पाहिलं होतं. 'तो अक्षरशः एक हिंस्त्र पशू होता आणि तुम्ही त्याच्या जवळ उभे राहिलात तर त्याचं नाव तुम्हाला कळायच्या आधी तुम्हाला आतून जाणवायचं की तुमच्या सन्निध एक भयंकर प्राणी आहे.' त्या माणसाची आत्मिक मृतावस्था डोस्टोएवस्कीला प्रकर्षानं जाणवली. 'शारीरिक वासनांचा त्याच्या साऱ्या आत्मिक प्रवृत्तीवर एवढा वरचष्मा होता की, पहिल्याच दृष्टिक्षेपात त्याच्या चेहऱ्यावरून तुमच्या ध्यानी आलं असतं की शारीरिक उपभोगाची तीव्र लालसा, वैषयिकता, हाव यावाचून त्याच्यात काहीही उरलेलं नव्हतं.'

आणखीन एका दरोडेखोरांच्या म्होरक्याचा उल्लेख डोस्टोएवस्की करतो. त्याचं नाव, आर्लोव. कोरेनेवएवढाच खतरनाक, पण त्याच्याहून भिन्न प्रकृतीचा. त्याच्याविषयीच्या 'रंगतदार कहाण्या' डोस्टोएवस्कीनं ऐकलेल्या होत्या, 'त्याच्या तोडीचे कैदी फारच थोडे होते.' त्यानं निघृणपणे म्हाताऱ्यांना आणि मुलांना जीवे मारले

होते. जबर इच्छाशक्ती असलेला आणि आपल्या या शक्तीचा अभिमान बाळगणारा असा हा कणखर माणूस. कोरेनेवप्रमाणे विषयवासनेच्या आधीन जाऊन त्यानं माणुसकी गमावलेली नव्हती. डोस्टोएवस्कीच्या मते 'कामवासनेवर संपूर्ण विजय मिळवणारा असामी'. स्वतःवर त्याचा पूर्ण ताबा होता. हरप्रकारच्या यातना आणि शिक्षा तो कस्पटासमान लेखत होता. जागतल्या कुठल्याही गोष्टीची भीती त्याला नव्हती. त्याची 'घमंड' डोस्टोएवस्कीला विशेषत्वानं जाणवली. तो प्रत्येकाकडे तुच्छतेनं पाहात असे. त्याच्याकडे उदात्त भावनाही होत्या, परंतु त्या जोपासण्याची खबरदारी घेण्याचा प्रयत्न करावा असा विचार त्याच्या मनाला कधी स्पर्शून गेला नव्हता.

आर्लोव आणि डोस्टोएवस्की लष्करी हॉस्पिटलमध्ये दाखल झाले होते तेव्हाची गोष्ट. डोस्टोएवस्कीनं त्याला त्याच्या 'साहसा'संबंधी खोदूनखोदून विचारायला सुरुवात केली. तेव्हा आर्लोवच्या लक्षात आलं की प्रश्न विचारणारा आपली सद्सद्विवेकबुद्धी जागी करण्याचा आणि त्यात पश्चात्तापाची एखादी तरी खूण पाहाण्याचा प्रयत्न करत आहे. यावर त्याच्या प्रतिक्रिया : डोस्टोएवस्कीकडे 'तुच्छतेनं आणि मग्रूरीनं' टाकलेला दृष्टीक्षेप. 'जणू काही त्याच्या दृष्टीनं मी अकस्मात एक मुर्ख बालक बनलो होतो. जाणत्यांबरोबर चर्चा करतात तशा चर्चा माझ्याशी करणं अशक्य होतं. त्याच्या चेहऱ्यावर माझ्याबद्दलची काहीशी कीवही पसरली. थोड्या वेळानं माझ्याकडे पाहून तो खदखदून हसू लागला, कुठल्याही उपहासापासून मुक्त असलेलं अगदी मनमोकळं हास्य.'

दोघांनीही एकाच वेळी हॉस्पिटल सोडलं. हॉस्पिटलमधून बाहेर पडल्यावर आर्लोवला शिक्षेला सामोरं जायचं होतं. त्याला ठोठावण्यात आलेली शिक्षा : पलटणीच्या दोन रांगांमधून त्यानं पळत जायचं आणि तो पळत असताना सोजिरांनी त्याच्यावर दंडुक्यांनी प्रहार करायचे. ही शिक्षा भोगण्यासाठी त्याचा जीव आसुसला होता. यातून तो जिवंत परतणार नव्हता. निरोप घेताना त्यानं डोस्टोएवस्कीशी हस्तांदोलन केलं. त्याची ही कृती म्हणजे आपल्याविषयी 'त्याला वाटत असणाऱ्या विश्वासाची खूण', अशी डोस्टोएवस्कीची भावना झाली होती तथापि, डोस्टोएवस्की पुढं सांगतो : 'तो माझा तिरस्कारच करणार, त्याचाही नाइलाज. आणि एक दुबळा, कीव करण्यालायक, नमतं घेणारा प्राणी, प्रत्येक गोष्टीत त्याच्याहून डावा असं मला तो समजत होता हे निःसंशय.'

इथं रास्कोल्निकोवचं स्मरण होणं अपरिहार्य आहे. सद्सद्विवेकबुद्धीची चाड असलेला तो एक कंगाल बुद्धिजीवी माणूस होता – या काळातील तंतोतंत डोस्टोएवस्की – तरी आर्लोवप्रमाणं वागता यावं म्हणून स्वतःवर कोरडे ओढून स्वतःच्या मनाची तयारी करण्याचा प्रयत्न त्यानं केला होता. वास्तव मानवजातीचे दोन भाग त्यानं पाडले होते. त्यातील एक बहुसंख्यांक – थरकापणारे प्राणी, निमूट आज्ञा पाळणं हाच त्यांचा धर्म : दुसरा : अल्पसंख्यांक – ज्यांच्यापाशी सत्ता असते, ज्यांना सर्व काही क्षम्य असतं. त्यानुसार त्यानं तो खूनही केला होता.

परंतु, अंतिमतः रास्कोल्निकोवला आढळून आलं होतं की आपल्या कृत्याचे भयंकर परिणाम सोसणं नैतिकदृष्ट्या अवघड आहे.

'हाऊस ऑफ द डेड' जेव्हा नित्शेच्या वाचनात आलं तेव्हा त्या पुस्तकानं तो विलक्षण भारावून गेला होता. आर्लोवमध्ये त्याच्या कल्पनेतला महामानव त्याला आढळला होता? धनी आणि दास यांच्यातल्या नैतिकतेमधला त्याला अपेक्षित असलेला भेद आर्लोव आणि डोस्टोएवस्की यांच्यामधल्या संभाषणामधून सूचित केला गेला असल्याचं त्याला जाणवलं होतं? 'द विल टु पॉवर' (खंड ३) मध्ये तो म्हणतो: 'To return a good conscience to an evil human being has this been my spontaneous effort? And the evil human being precisely in so far as he is the strongest human being? Here one should bring in the judgement of Dostoevsky about the criminals in the prison camp.'

परिस्थितीच्या रेट्यात काही काळापुरता का होईना, रास्कोल्निकोव आर्लोव बनू शकतो असा विचार डोस्टोएवस्कीच्या मनात डोकावलाही असेल. कारण त्याच्या मते प्रत्येक माणसाच्या काळजात निद्रिस्त आर्लोव असण्याची शक्यता असते. निष्ठूर आणि अमानुष चालीरीतीची कुठल्याही प्रकारची स्वीकृती वा सवय अंतिमतः नैतिकतेची भावना फार बोथट करून टाकतात. या संदर्भात, वानगीदाखल तो एक उदाहरण देतो :

फटक्यांची शिक्षा भोगत असताना प्रत्येक कैद्यानं कळवळून टाहो फोडलाच पाहिजे, दयेची याचना करायलाच पाहिजे असा जणू काही दंडक कँपात होता. या शिक्षेची अंमलबजावणी करणारा अधिकारी डोस्टोएवस्कीच्या परिचयाचा होता. तो सुस्वभावी होता, प्रामाणिक होता, त्याच्याविषयी समाजात आदराची भावना होती. सुरुवातीला कैद्याला फारसा दमात तो घेत नसे. परंतु 'मायबाप, माझ्या पित्या, दया करा, तुमच्यासाठी आयुष्यभर मी परमेश्वराची प्रार्थना करीन' वगैरे वगैरे नित्याचे करुणाष्टक त्याच्या कानी पडलं नाही तर मात्र त्याला तो व्यक्तिगत अपमान वाटायचा. तो खवळून उठायचा. कैद्यांच्या तोंडून किंकाळ्या आणि दयेची याचना बाहेर पडेस्तोवर तो त्याला फटक्यांची शिक्षा सुनवायचा. कैद्यानं याचना केल्यानंतरच त्याचा जीव शांत व्हायचा.

यावर डोस्टोएवस्की भाष्य करतो : 'ज्या मातीतून स्वतः घडलेला आहे त्याच मातीतून घडलेल्या बांधवांच्या – ख्रिस्ताच्या आदेशानुसार बंधू – देहावर, रक्तावर आणि आत्म्यावर ही सत्ता, ही अमर्याद हुकूमत एकदा कुणी अनुभवली, ज्यानं कुणी अनुभवली असेल ही सत्ता आणि परमेश्वरावरहुकूम घडवलेल्या दुसऱ्या जीवाला आत्यंतिक अवहेलना भोगावयास लावण्याचा पूर्ण परवाना, तो स्वतःच्या संवेदनांवरची हुकूमतही गमावून बसतो.... मला ठामपणानं वाटतं की माणसांमधला सर्वोत्तम माणूसही निर्ढावला जाईल आणि पशुतूल्य बनून जाईल.' नैतिक संवेदना अशा बधीर होऊ न देण्याच्या कामी ख्रिश्चन सद्सद्विवेकबुद्धी अंतर्गत प्रतिबंध

म्हणून साहाय्यभूत होऊ शकते, यास्तव ती शाबूत ठेवणं महत्त्वाचं आहे याबद्दल डोस्टोएवस्की निःशंक होता. पुढं १८६० च्या दशकातील 'रॅडिकलां'चा डोस्टोएवस्की कट्टर शत्रू बनला होता याचं एक कारण, त्यांची राजकीय-सामाजिक उद्दिष्टे त्याला नामंजूर होती. पण त्याहूनही महत्त्वाचं असं दुसरं कारण, ते उद्घोषित असलेली नीतितत्त्वं, नैतिक बधीरतेपासून वाचवू शकणारी अत्यंत महत्त्वाची अशी ख्रिश्चन सद्सद्विवेकबुद्धीची संरक्षण-फळी नष्ट करून टाकतील याची धास्ती त्याला वाटत होती.

मानवी मनाच्या अबोध प्रेरणा केंद्रस्थानी ठेवून डोस्टोएवस्कीनं 'हाऊस ऑफ द डेड' मधील घटनांचं विश्लेषण करण्याचा प्रयत्न केलेला आहे. या अनुषंगानं आत्म-प्रकटीकरणाची मनाची अनिवार्य गरजही त्यानं विशद केलेली आहे. ही मूलभूत गरज, तुरुंगातील दडपशाहीच्या वातावरणात निकडीची बनते, परिणामी सर्व प्रकारच्या अतार्किक, ॲब्सर्ड आणि आत्मविध्वंसक रूपात, प्रथमदर्शनी स्पष्टीकरण करता येऊ न शकणाऱ्या आणि पूर्णपणे असंबद्ध अशा कृत्यात तिचा उद्रेक अटळ ठरतो, या निष्कर्षाप्रत डोस्टोएवस्की येऊन पोचला होता. स्वातंत्र्याच्याअभावी निर्माण झालेल्या विरूपतेचं भान सैबेरियनपूर्व काळात त्याला होतं. या काळातील त्याच्या उत्कृष्ट साहित्यकृती, मनाच्या भावनिक गरजा आणि प्रेरणा, आत्माविष्काराच्या हक्कासाठी चाललेल्या या गरजांच्या आग्रही मागण्या यावर केंद्रीभूत झाल्या होत्या. या मागण्या रशियातील प्रबळ सामाजिक परिस्थिती कठोरपणे धुडकावून लावत होती आणि तो समजत होता की त्यानं रेखाटलेली कमकुवत मनाची पात्रं ही अशा परिस्थितीची बळी होती. परंतु अशा गरजांमधील संभाव्य स्फोटकता, त्या दडपल्या गेल्यामुळे निर्माण होणारे हानीकारक परिणाम हे सारं तुरुंगाच्या कँपात त्याच्या नजरेला पडत होतं. मानवी व्यक्तिमत्वामधील अतार्किक प्रेरणांची अमर्याद शक्ती आणि या प्रेरणांचा मानवी वर्तनाच्या तथाकथित तार्किक घटकांवरील निर्णायक वरचष्मा याचं प्रत्यंतर त्याला आलं होतं.

तुरुंगाच्या कँपातलं कैद्यांचं सामूहिक जीवन. वरवर पाहाता, हे जीवन सुरळीत वाटतं. परंतु ते तसं नसतं असं डोस्टोएवस्की स्वानुभवावरून सांगतो. त्याच्या मते, हे सामूहिक जीवन कैद्यांवर लादलं गेलेलं होतं. कळपागत एकत्र डांबल्यानं, एकमेकांचा सहवास टाळू म्हणता टाळता येणं अशक्य होतं. हे सक्तीचं निकट साहचर्य त्यांच्या आत्यंतिक बेचैनीला आणि चिडचिडेपणाला कारणीभूत ठरत होतं. अर्थात् याची जाणीव कैद्यांना नव्हती, डोस्टोएवस्कीला होती. खाण्यापिण्याएवढीच एकांत ही माणसाची 'एक नैसर्गिक गरज असते'. 'माणसावर सामूहिक जीवन लादलं गेलं तर तो मानवजातीचा तिटकारा करू लागेल.'

फटक्यांची शिक्षा झालेल्या कैद्यांसंबंधी लिहिताना डोस्टोएवस्की अतार्किक

प्रेरणांचं माणसाच्या वर्तनावरील वर्चस्वाचं अत्यंत नाट्यात्मक वर्णन करतो : 'शिक्षेचा क्षण पुढे ढकलण्यासाठी.... काही वेळेला कैदी खतरनाक युक्तीचा आसरा घेतात : एखाद्या अधिकाऱ्याला वा सहकारी कैद्याला ते भोसकतात. परिणामी त्यांच्यावर नवा खटला भरण्यात येतो. त्यांची शिक्षा दोनेक महिने पुढं ढकलली जाते. त्यांचं उद्दिष्ट साध्य होतं. दोनेक महिन्यानंतर त्यांना जी शिक्षा होणार असते ती आधीच्या शिक्षेच्या तुलनेत कितीही कठोर असली तरी त्याचं त्यांना काही वाटत नाही. हॉस्पिटलमधील एक रुग्ण आपली शिक्षा लांबणीवर पडावी म्हणून व्होडकात तपकीर मिसळून प्याला होता. त्यात तो मृत्यू पावला होता.

कँपाच्या जाचक आणि जुलुमी परिस्थितीमुळं उद्‌भवणाऱ्या कैद्यांच्या अशा प्रकारच्या प्रतिक्रिया म्हणजे कुचंबलेल्या भावनांचा अनावर उद्रेक होता. त्यातील अतार्किक प्रेरणांना प्रवृत्त करणारं निमित्त फारसं अनाकलनीय नव्हतं. तथापि, कैद्यांच्या अशाही काही प्रतिक्रिया असत ज्यांचा कार्यकारणसंबंध लक्षात येणं अवघड होतं. आणि या 'ॲब्नॉर्मल' प्रतिक्रियांचा तळठाव गाठण्यासाठी डोस्टोएवस्की आपली प्रतिभा पणाला लावतो. उदाहरणार्थ, शेतकरी-कैद्यांच्या जीवनातील एक खास आणि गूढ वैशिष्ट्य : पैशासंबंधीचा त्यांचा सर्वसाधारण दृष्टिकोन. कैद्यांना खाणंपिणं, कपडालत्ता दिला जात असे. तरीही पैसा हाती असणं ही बाब कैद्यांच्या लेखी अत्यंत महत्त्वाची होती याकडे डोस्टोएवस्की लक्ष वेधतो. जादा खाणं, तंबाकू, व्होडका, संभोगसुख यांसारख्या निर्बंध असलेल्या सर्व प्रकारच्या चैनी करण्यास पैशांची मदत होत असे. जगणं अधिक सुसह्य करण्याच्या कामी पैसा साहाय्यभूत ठरत असे. यावरून एखादा अशी समजूत करून घेईल की महागड्या आयुष्यासाठी कैदी आपला पैसा अत्यंत काटकसरीनं वापरत असतील. परंतु परिस्थिती नेमकी उलटी होती. आपला पैसा काळजीपूर्वक जपून ठेवण्याऐवजी, पुरेशी रक्कम जमली की प्रत्येक कैदी 'नेम डे'ला वा धार्मिक सणासुदीच्या प्रसंगी दारू पिण्यासाठी मिजाशीत खर्चून टाकत असे. अशा प्रकारे चोरून, लांडीलबाडी करून, अतिशय धूर्तपणानं, क्वचित प्रसंगी निर्दयपणे जमवलेला पैसा, कैदी, डोस्टोएवस्कीच्या शब्दात, 'पोरकट निर्बुद्धपणानं' उधळून टाकत असे. परंतु तो पुढं लागलीच पुस्ती जोडतो की 'प्रथमदर्शनी तसं वाटलं तरी त्याला (पैशाची) किंमत कळत नाही हे यावरून सिद्ध होत नाही.' उलट 'तो ते कचऱ्यागत उधळून टाकतो 'जे (पैशाहून) अधिक मौल्यवान आहे असं तो समजतो, त्यावर तो ते उधळून टाकतो' – आणि पैशामुळं मिळणाऱ्या ऐहिक सुविधांहून अधिक मौल्यवान असं असतं काय कैद्याला? डोस्टोएवस्की उत्तर देतो : स्वातंत्र्य वा स्वातंत्र्याचं स्वप्न. आपण समजून घेतलं पाहिजे की, 'ज्याला स्वतःची इच्छा नाही याहून अन्य अर्थ "कैदी" या शब्दाला नाही. आणि पैसा खर्च करण्यानं तो स्वतःची इच्छा प्रदर्शित करत असतो.' मनसोक्त दारू ढोसून, तुरुंगाच्या नियमांचा भंग करून दैन्यावस्थेतील आपल्या सोबत्यांना धमकावून, कैदी आपल्या सोबत्यांना भासवतात – आणि काही काळापुरतं का होईना स्वतःलाही भासवतात, – समजलं जातं त्याहून कितीतरी पटीनं त्याच्यापाशी

सत्ता असते, स्वातंत्र्य असतं, दुसऱ्या शब्दात सांगायचं तर, 'ज्या गोष्टी त्या बिचाऱ्याला प्राप्त होणं दुरापास्त, त्या आपल्याला मिळाल्यात अशी स्वतःच्या मनाची तो समजूत घालू शकतो.' स्वतःच्या इच्छेनुरूप आपण वागू शकतो आणि अशा प्रकारे आपलं स्वातंत्र्य आपण उपभोगू शकतो या जाणीवेहून अन्य कशाचंही महत्त्व कैद्याला वाटत नाही. या क्षणिक (आणि भ्रामक) पण लाखमोलाच्या समाधानासाठी तो स्वीकारणार नाही अशी कुठलीही जोखीम नाही, सहन करणार नाही अशी कुठलीही सजा नाही.

'स्वातंत्र्य गमावणं याहून भयंकर यातना अन्य नाही. रोटी म्हणजे काय? रोटी खाल्ली जाते, जगता यावं म्हणून, पण इथं तर जगणंच नाही! प्रयत्न करून बघा, एक प्रासाद बांधा. संगमरवर, चित्रं, सोनं, स्वर्गीचे पक्षी, झुलत्या बागा, अगदी एकूण एक गोष्टींनी तो सजवा.... आणि त्यात प्रवेश करा. शक्यता आहे, बाहेर जायची तुम्हाला इच्छाही व्हायची नाही! कदाचित, तुम्ही बाहेर पडणारही नाही! प्रत्येक गोष्ट इथं उपलब्ध आहे. अत्युत्तम हा उत्तमाचा वैरी असतो. पण अचानक एक क्षुल्लक गोष्ट घडते, तुमच्या प्रासादाभोवती कुंपण घातलं जातं आणि तुम्हाला सांगण्यात येतं, सर्व काही तुमचंच आहे, मौज लुटा! पण एक गोष्ट, इथून एकही पाऊल बाहेर टाकायचं नाही आणि विश्वास ठेवा माझ्यावर, तत्क्षणी तुमच्या स्वर्गातून सुटका करून घेण्याची आणि कुंपणाबाहेर पाऊल टाकण्याची इच्छा तुम्हाला होईल. शिवाय हा सारा थाटमाट, ही सारी चैन तुमचे क्लेश वृद्धिंगतही करील. निव्वळ या ऐश्वर्यामुळंच तुम्हाला तो (प्रासाद) तिरस्करणीय वाटेल.'

'हाऊस ऑफ द डेड'च्या अखेरीस एक प्रसंग आहे. एक गरूड घायाळ अवस्थेत कैद्यांच्या हाती सापडतो. ते त्याच्यावर उपचार करतात, त्याला माणसाळावयाचा प्रयत्न करतात. पण त्यांचे प्रयत्न निष्फळ ठरतात. शेवटी ते ठरवतात, गरूडाला सोडून द्यायचं, मुक्त करायचं. एक दिवस भोजन आटोपलेलं असतं. कामावर जाण्याचा डंका पिटला जातो. डझनभर कैदी गरूडाला घेऊन तुरुंगाबाहेर पडतात, तटबंदीपाशी येतात. गरूड कुठं जातो हे बघण्याची उत्सुकता प्रत्येक कैद्याला असते, जणू काही त्याच्याबरोबरीनं त्यांनाही थोडीफार मुक्तता लाभलेली असते.

'त्या चवताळलेल्या पक्ष्याकडे मायेनं पाहात त्याला धरून ठेवणारा म्हणाला, "या सैतानाला बघा, त्याला चांगलं वागवलं तुम्ही, पण तुम्हालाच तो सारखा टोचून काढतोय."

"जाऊ दे त्याला, मिकीट्का!"

"आकाशात एक ठिपका होऊन जाईल तो, इतरांसारखाच. दे त्याला स्वातंत्र्य, खरंखुरं स्वातंत्र्य."

त्यांनी भिंतीवरून गरूडाला माळरानावर सोडून दिला. सरत्या शरदामधला तो सर्द आणि झाकोळलेला दिवस होता. उघड्या माळरानावरून वारा भणाणत

होता आणि पिवळ्या, सुकलेल्या गवतांच्या पुंजक्यामधून सळसळत होता. इजा झालेले आपले पंख फडफडवत गरूडानं एका सरळ रेषेत झेप घेतली, जणू काही आमच्यापासून दूर जाण्यासाठी, कुठंही का असेना. त्यानं गवतामधून भरारी घेतली तेव्हा कैद्यांनी उत्सुकतेनं त्याच्या दिशेनं आपल्या माना वळवल्या.

"तो बघ निघाला!" एकजण विचारपूर्वक म्हणाला.

"आणि तो इकडेतिकडे पाहातही नाहीये," दुसऱ्यानं पुस्ती जोडली. "गड्यांनो, त्यानं एकदाही इकडेतिकडे पाहिलं नाही, तो नुसता उडत चाललाय."

"त्यानं माघारी वळून तुझे आभार मानावेत अशी अपेक्षा आहे की काय तुझी?" तिसऱ्यानं पृच्छा केली.

"हे स्वातंत्र्य, बाजी लावा तुमच्या जीवाची. तो स्वातंत्र्य भोगतोय."

"खराय, मुक्तता आहे ती."

"गड्यांनो, दिसेनासा झालाय तो आता."

"उभे कशाला राहिलाय तियं? उचला पावलं!" गार्ड्स गरजले आणि प्रत्येकजण मूकपणे कामावर जाण्यासाठी पाय उचलू लागले.'

स्वतःच्या इच्छेनुसार वागण्याची मानवी व्यक्तिमत्वाची गरज आणि त्यायोगे आत्मस्वातंत्र्याची भावना अनुभवणं या मनाच्या जोरकस प्रेरणा आहेत इकडे डोस्टोएवस्की लक्ष वेधतो. या प्रेरणा फलद्रूप होण्यासाठी माणसं इतर साऱ्या गोष्टींचा आणि मूल्यांचा त्याग करतील आणि कुठल्याही प्रकारे (दारू पिऊन धिंगाणा घालणं हा एक 'आऊटलेट') त्यांची पूर्ती ते करू शकले नाहीत तर त्याची परिणती विनाशकारक होऊ शकते. आपला हा मुद्दा विशद करण्यासाठी ज्याचं वर्तन बरीच वर्ष निर्दोष आहे, वरिष्ठांच्या मर्जीला जे पात्र ठरले आहेत, अशा आदर्श कैद्यांच्या बाबतीत क्वचित प्रसंगी काय घडतं, याची सोदाहरण चर्चा तो करतो.

असा एखादा आदर्श कैदी एक दिवस काहीही कारण नसताना खवळून उठतो, जणू काही सैतानानं त्याला पछाडलेलं असतं, तो माकडचेष्टा करतो, पितो, आरोळ्या ठोकतो आणि क्वचित प्रसंगी भयंकर गुन्ह्याला प्रवृत्त होतो.... त्याला आपण समजतो असं समजणारा वरिष्ठ वर्ग गोंधळून त्याच्याकडे बघतो आणि अचंबा करतो; परंतु काय घडलं आहे हे डोस्टोएवस्कीच्या ध्यानी येतं. ज्याच्याकडून अशा वागण्याची यत्किंचितही अपेक्षा करण्यात आली नसती त्या माणसामधल्या आकस्मिक उद्रेकाचं कारण : आत्माविष्काराची तीव्र उन्मादक लालसा, स्वतःची अस्मिता प्रकट करण्याची त्याची अबोध ओढ, चिरडून टाकण्यात आलेलं स्वतःचं व्यक्तिमत्व पुनर्प्रस्थापित करण्याची उद्दाम इच्छा. ही इच्छा अचानक त्याचा ताबा घेते आणि चीड, तुच्छता, मानसिक संभ्रम, फेफरे आणि नर्व्हस झटके यांचा कळस गाठते. जिवंतपणी गाडला गेलेला एखादा माणूस शवपेटीत जागा होतो. पेटीचं झाकण उघडण्यासाठी निकराचे प्रयत्न करतो. आपले हे सारे प्रयत्न निष्फळ



अनुक्रमणिका

आहेत याची खात्री तर्कबुद्धी त्याला पटवून देऊ शकेल. पण गोची अशी आहे की इर्थ प्रश्न तर्काचा नाही, तो आहे नर्व्हस झटक्यांचा.

अशा प्रकारचे उद्रेक व्हायला तुरुंगामधील अत्यंत जाचक निर्बंधच केवळ कारणीभूत होत होते असं नव्हतं, बाहेरच्या जगातली परिस्थिती याहून वेगळी नसते आणि त्याविरुद्ध खवळून उठल्यामुळेच बरेचसे कैदी तुरुंगात येऊन पडले होते. कुणी शेतकरी होता, घरगडी होता, सोजिर होता तर कुणी कामगार. ही माणसं बरीच वर्षं स्वास्थ्यपूर्ण आयुष्य कंठत होते, स्वतःच्या शिरावरील भार धीरानं, तोंडावाटे ब्र न काढता सोसत होते. 'अचानक त्याच्यामधलं काहीतरी खंडित होतं, त्याचा धीर सुटतो आणि त्याच्या दुष्मनाच्या आणि छळणूक करणाऱ्याच्या देहात तो सुरा खुपसतो. अशा प्रकारचं कृत्य 'क्रिमिनल' असलं तरी अनाकलनीय नसतं.' परंतु यानंतर काही वेळेला जे घडतं ते आकलनाच्या पलिकडील असतं. कारण तोच नम्र आणि शांत माणूस ऊठसूठ जीव घ्यायला सुरूवात करतो. मौज म्हणून, अपमानास्पद शब्दाचा, दृष्टीक्षेपाचा बदला म्हणून किंवा निव्वळ "माझ्या मार्गातून बाजूला हो, माझ्या वाटेला येऊ नको, मी येतोय." तो माणूस प्यालेला असतो, भ्रांतचित्त असतो. जणू काही, पवित्र सीमारेषा एकदा ओलांडल्यानंतर, आपल्याला पवित्र असं काही राहिलेलं नाही यात तो आनंद मानू लागतो....' अशा गुन्हेगारांचा 'रेकॉर्ड' बहुधा खराब असतो, परंतु कुठल्याही प्रकारे अशी माणसं अविचारी नसतात, एकदा तो झटका ओसरला की ती तात्काळ शांत होतात आणि त्यांचा मूळ स्वभाव जागा होतो.

मानसिक संतुलन राखणं शेतकरी-कैदी कसं जमवत असत हे समजून घेण्यास 'हाऊस ऑफ द डेड'मधील बरेच तपशील आपल्याला सामान्यपणे साहाय्यभूत ठरतील. आणि या ठिकाणीही भर देण्यात आलेला आहे तो कैद्यांच्या अतार्किक प्रवृत्तीवर. त्यांच्या स्थिर मनोवृत्तीमागील एक महत्त्वाची प्रेरणा म्हणजे ते करत असलेली कामं. परंतु जबरदस्तीनं लादलेलं काम आणि स्वेच्छेने केलेलं काम यात डोस्टोएवस्की फरक करतो. नियमानुसार कामाच्या वेळात नुसतं काम करत राहाण्यापेक्षा कैद्यांवर एखादी 'कामगिरी' सोपवली तर ते त्यांना अधिक पसंत असतं. त्यासाठी फार श्रम पडले तरी त्याची तमा त्यांना नसते. कारण ही कामगिरी पार पाडल्यानंतर त्यांना थोडा वेळ मिळतो, थोड्याफार प्रमाणात स्वतःच्या इच्छेनुसार जगण्याची उसंत लाभते. सर्वसाधारणपणे, प्रत्येकजण लादलं गेलेल्या कामाचा तिटकारा करतो, ते कमी कष्टाचं असलं तरी त्याला ते भारभूत वाटत.

त्यांच्या वागणुकीमधला हा फरक ठळकपणे जाणवतो जेव्हा लादलं गेलेलं काम आणि कामाच्या वेळेनंतर कैदी करत असलेले उद्योग यांची डोस्टोएवस्की तुलना करतो तेव्हा. त्यांच्यामधले बरेचसे कुशल कारागीर होते. आपला उद्योगधंदा करून, त्या वस्तू गावात विकून ते थोडे पैसे मिळवत असत. अशा कामावर सामान्यपणे अधिकारी वर्गाकडून मनाई करण्यात येत नसली तरी ही कामं करायला





अनुक्रमणिका

लागणारी हत्यारं जवळ बाळगण्यास कैद्यांना मनाई होती. याचं कारण, त्यांचा वापर शस्त्र म्हणून केला जाण्याची शक्यता. असं असलं तरीही, बहुतेक सर्व कैद्यांपाशी अशी हत्यारं होती आणि डोस्टोएवस्की शंका प्रदर्शित करतो : नियमाचा असा भंग केला जात असताना तिकडे 'अधिकारी बऱ्याचदा डोळेझाक करतो.' अधिकाऱ्यांना आतून जाणवलेलं असतं की अशा प्रकारचं काम म्हणजे कैद्यांसाठी 'सेफ्टी व्हाल्व' असतो. लादल्या गेलेल्या कामामुळं दडपल्या गेलेल्या संतापाला वाट मोकळी करून देणाऱ्या भावनिक परिहाराची त्यांना गरज असते. 'स्वतःच्या खाजगी कामात तनमनानं पूर्णपणे गुंतून गेला नाही तर माणूस तुरुंगात जगू शकणार नाही,' असं डोस्टोएवस्की सांगतो. खाजगी काम नसतं तर कैद्यांनी काचेच्या भांड्यातल्या कोळ्याप्रमाणं 'एकमेकांना गिळंकृत करून टाकलं असतं.' तुरुंगाच्या कँपातील वास्तव्यानं डोस्टोएवस्कीची खात्री पटवून दिली की खाजगी मालमत्ता हे साऱ्या 'इव्हील' चं मूळ आहे, या युरोपिअन समाजवाद्यांच्या म्हणण्यात तथ्य नाही. व्यक्तीला स्वतःची अस्मिता आणि नैतिक स्वायतत्ता या भावना अबाधित राखण्यास, मनाचा समतोल राखण्यास खाजगी काम साहाय्यभूत ठरतं, तुरुंगाच्या कँपामधील विनाशक शक्तीविरुद्ध स्वतःचं रक्षण करण्यायोग्य एक प्रभावी साधन बनतं.

माणूस अविचारी कृत्याकडे आणि आत्मविध्वंसाकडे ढकलला जाऊ शकतो, तद्वतच, त्या टोकाला जाण्यापासून रोखणारी अतार्किक स्वरूपाची आत्मरक्षणाची शक्तीही त्याच्यात असते. ही शक्ती म्हणजे आशा बाळगण्याची माणसाची क्षमता. कैद्यांच्या आयुष्यात आशेचं स्थान अनन्यसाधारण असतं. डोस्टोएवस्की सांगतो : त्याच्यासारख्या बऱ्याचश कैद्यांना त्या मानानं कमी शिक्षा झालेली असते, साहजिकच, त्यांचे विचार आपल्या सुटकेच्या अपेक्षित दिवसाभोवती घोटाळत असतात. 'तुरुंगाच्या माझ्या अगदी पहिल्या दिवसापासून मी मुक्त झालो असल्याचं स्वप्न रंगवत होतो.' परंतु तो थक्क झाला, प्रभावितही झाला, जेव्हा त्याच्या ध्यानात आलं की इतर कैदीही तशीच आशा बाळगून असतात. 'वीस वर्षं ही जणू काही दोन वर्षं असल्यागत तो समजतो आणि त्याची पूर्ण खात्री असते की तो पन्नासाव्या वर्षी तुरुंग सोडेल तेव्हा आता पस्तीस वर्षांचा असताना त्याचा जो जोम आहे, जीवनेच्छा आहे ती त्यावेळीही कायम असेल.'

जन्मठेपेची सजा झालेले कैदीही नशिब आपल्यावर प्रसन्न होईल अशी आशा बाळगून असतात – समजा, पीटर्सबर्गहून अकस्मात फर्मान निघेल. त्यानुसार त्यांची खाणीत पाठवणी करण्यात येईल, त्यांची सजा कमी करण्यात येईल; असा दैवी चमत्कार घडून येण्याची सुतराम शक्यता नसतानाही. डोस्टोएवस्कीला वाटतं की ही अवाजवी अपेक्षाच कैद्यांच्या निरंतर बेचैनीला कारणीभूत होत असली तरी ती त्यांना मायेफिरू कृत्यापासून दूर ठेवते.

बलवत्तर आशा काय किमया करू शकते याचं एक उदाहरण डोस्टोएवस्की देतो. टोबोल्स्कच्या तुरुंगात कैद्यांना साखळदंडांनी भिंतीला जखडून

टाकलेलं त्यानं पाहिलं होतं. त्यांना अशा अवस्थेत पाच पाच वर्षं, काही वेळेला दहा वर्ष ठेवलं जात होतं आणि तरीही त्या साऱ्यांची वागणूक चांगली होती, सगळे शांतपणे सजा भोगत होते. आणि 'आपल्या शिक्षेची अखेर होईल म्हणून प्रत्येकजण अत्यंत उत्सुक होता. का? एखाद्याला विस्मय वाटेल. मी सांगतो तुम्हाला का? : गुदमरून टाकणाऱ्या अंधाऱ्या खोलीतून त्याला बाहेर पडायला मिळेल आणि तुरुंगाच्या आवारात त्याला चालायला मिळेल.... बस्स, एवढंच. तशी परवानगी त्याला कधीच मिळणार नव्हती. त्याला ठाऊक असतं, साखळदंडात जखडलेल्याला सदासर्वकाळ कोठडीतच ठेवलं जातं आणि त्याच्या अखेरच्या श्वासापर्यंत तो साखळदंडातच अडकलेला असणार. त्याला हे ठाऊक असतं आणि तरीही साखळदंडातला आपला कालावधी संपण्याची अत्यंत उत्सुकतेनं तो प्रतीक्षा करत असतो. ही उत्कट इच्छा नसेल तर न मरता, भ्रमिष्ट न होता तो पाच सहा वर्ष बेड्यातच कसा काय तग धरील? त्यांच्यातल्या काहीजणांना तर ते सोसणंच अशक्य होईल.' म्हणजेच, आत्यंतिक जीवघेण्या परिस्थितीतही माणसाला जिवंत ठेवते, त्याची बुद्धी शाबूत राखते, ती आशा. माणूस साऱ्या आशा गमावतो तेव्हा 'त्याच्या विपत्तीत तो बऱ्याचदा, हैवान बनतो'

ज्यांनी आशा गमावलेली आहे असं डोस्टोएवस्कीला वाटतं अशा दोन कैद्यांची तो उदाहरणं देतो. त्यातला एक होता पापभीरू भाविक, ज्याच्यापाशी कैदी आपले पैसे विश्वासानं ठेवत असत. त्यानं 'साऱ्या आशा गमावलेल्या होत्या' आणि 'त्याचं आंतरिक दैन्य भयानक होतं – यातून सुटका करून घेण्याची त्याची साधनं होती, त्याचा तोडगा होता, तो असा – प्रार्थना आणि हौतात्म्य.' दुसरा कैदीही अत्यंत भाविक होता. तो सतत 'बायबल' वाचत असे. त्यानं अगदी स्वेच्छेनं आणि तद्दन कृतक हौतात्म्याद्वारे स्वतःची सुटका करून घेण्याचा मार्ग चोखाळला. एक दिवस तिरस्करणीय मेजर क्रिवत्सोवच्या अंगावर तो वीट घेऊन धावून गेला. का? त्याचा जीव घ्यायचा म्हणून. त्याचा हा प्रयत्न अयशस्वी ठरला. त्यानंतर काही दिवसांनी हॉस्पिटलमध्ये मृत्यूशय्येवर असताना त्यानं सांगितलं की आकसापोटी त्यानं हे कृत्य केलेलं नव्हतं, 'क्लेश भोगायचे' एवढीच त्याची इच्छा होती. ही कहाणी डोस्टोएवस्कीनं दुसऱ्यांच्या तोंडून ऐकली होती पण या कथेनं त्याच्यावर विलक्षण प्रभाव टाकला होता. क्रुसावर चढवलेल्या आणि अपमानित करण्यात आलेल्या ख्रिस्ताचा आदर्श रशियन जनतेनं किती आत्मसात केला होता याचा पुरावा म्हणून वरील दोन्ही 'हुतात्म्यां'ना पुढील काळात प्रतीकात्मक मूल्य लाभायचं होतं.

हौतात्म्याचा आदर्श अशा प्रकारे साऱ्या आशा गमावून बसलेल्या कुण्या एखाद्याला सोसण्याची ताकद देत असेल वा योजनाबद्ध आत्मसमर्पणाला क्वचित प्रवृत्त करत असेल. परंतु मुक्त होण्याच्या स्वप्नात सदैव दंग असलेले कैदी सुदैवानं नैराश्याच्या टोकापर्यंत कधीच पोचत नव्हते. मानवी जीवनात आशेचं महत्त्व किती अनन्यसाधारण असतं ही गोष्ट ठसवण्यासाठी डोस्टोएवस्की अशी परिस्थिती शोधून

काढतो, जिच्यात 'आशा' पद्धतशीरपणे नष्ट केली जाते.

लादण्यात आलेलं काम वाईट असलं तरी कैद्यांना ते अगदीच असह्य होत नव्हतं, कारण त्या कामाला काही ना काही अर्थ होता, त्या योगे काहीतरी उपयुक्त हेतू साध्य होत होता. हे काम, त्यांना परिचित असलेल्या जगाचाच एक भाग होता. या जगात मुक्त होण्याची त्यांची ओढ दृष्टीपथात नसलेल्या आणि भाकीत करणं अशक्य व्हावं अशा गोष्टींबद्दलची त्यांची आशा फलद्रूप होऊ शकत होती, कारण मानवी जीवनात दैवयोग घडून येऊ शकतात, दुराग्रही सत्ताधाऱ्यांचं मनही पालटणं शक्य असतं अशी त्यांची धारणा होती. परंतु जर का कैद्यांना जाणुनबुजून, हेतुपुरःसर पूर्णपणे कुचकामी, पूर्णपणे अमानुषी कार्याला जुंपण्यात आलं तर? या प्रश्नाचं डोस्टोएवस्की उत्तर देतो :

'माझ्या मनात विचार डोकावला : माणसाला पूर्णपणे चिरडून टाकायचं असेल, नेस्तनाबूत करून टाकायचं असेल, अत्यंत खतरनाक खुन्यांचाही थरकाप उडेल व ती शिक्षा होणार म्हणतातच ते धास्तावतील अशी अतिशय कठोर शिक्षा त्यांना करायची असेल तर एखाद्यानं फक्त एवढंच करायचं की पूर्णपणे कुचकामी आणि विनडोकपणाचं काम त्याला द्यायचं. सांप्रत, बळजबरीनं लादलेलं कष्टाचं काम कैद्याला नीरस आणि रटाळ वाटत असलं तरी ते विनडोकपणाचं नसतं. कैदी विटा बनवतो, खोदकाम करतो, प्लास्टरिंग करतो, वास्तू उभारतो. अशा कामाला अर्थ असतो, प्रयोजन असतं. कैदी-कामगाराला काही वेळेला त्यात रुची उत्पन्न होते, ते काम अधिक कौशल्यानं, तत्परतेनं, चांगलं करण्याचा तो प्रयत्न करतो. परंतु जर का त्याला एका बादलीतून दुसऱ्या बादलीत व त्या दुसऱ्या बादलीतून परत पहिल्या बादलीत असं सतत पाणी ओतायचं असेल, वाळू कांडायची असेल, मातीचा ढिगारा एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी हलवणं आणि तिथून पुन्हा पहिल्या ठिकाणी हलवायचा असेल – मला खात्री आहे, अशी अवहेलना, असला शरमिंदेपणा, असल्या यातना सोसण्यापरीस कैदी थोड्याच दिवसात स्वतःला फास लावून घेईल किंवा हजारो गुन्हे करील.'

पुढील काळात डोस्टोएवस्कीची अशी धारणा झालेली होती की परमेश्वरावर आणि अमरत्वावर विश्वास न ठेवणं म्हणजे अर्थशून्य जगात जगण्याची सजा भोगणं आणि या आत्म-भानाची पातळी गाठणाऱ्या त्याच्या श्रेष्ठ कादंबऱ्यातील पात्रांना स्वतःचा नाश ओढवून घेणं अटळ ठरतं कारण, आशेविना जगण्याच्या यातना सोसण्याचं नाकारून त्यांच्या विपत्तीत ते हैवान बनतात.

डोस्टोएवस्कीनं तुरुंगातून सुटल्यानंतर लागलीच मादाम फोन्विझिना हिला पत्र लिहिलं होतं. त्यावरून कळून येतं की तुरुंगात असताना त्यानं स्वतःपुरतं एक अतिशय साधं असं प्रतीक (credo) तयार केलं होतं : ख्रिस्ताहून सुंदर

आणि परिपूर्ण असं अन्य काहीही असू शकणार नाही आणि सत्य ख्रिस्ताबाहेर असल्याचं त्याला पटवून देण्यात कुणाला यश आलं तरी तो सत्यावरोवर राहाण्यापेक्षा ख्रिस्तावरोबर राहाणं पसंत करील.

या निर्णयाप्रत डोस्टोएवस्की पोचला याला दोन अत्यंत महत्त्वपूर्ण अनुभव कारणीभूत झाले. पहिला : मरे शेतकऱ्याचा दृष्टांत. या दृष्टांतानं त्याच्या आत्मिक पुनरुज्जीवनाला चालना दिली. आंतरिक निराभय शांततेचे क्षण लाभणं, तद्वतच, इतर कैद्यांवरोवर एकात्मता साधणं त्याला शक्य झालं. पुनरुज्जीवनाची प्रक्रिया चालू असतानाच आपलं प्रतीक तो सुसूत्रित करू शकला. दुसरा : मानवी जीवनातील प्रवळ प्रेरणा म्हणून अतार्किक शक्तीचं त्याला नव्यानं झालेलं आकलन. परिणामी, सत्य बाजूला सारून निःसंदिग्धपणे ख्रिस्ताची निवड त्याला करता आली.

ख्रिस्ताचं सौंदर्य आणि त्याची परिपूर्णता यासंबंधी जे काही डोस्टोएवस्कीनं मादाम फोन्विझिना हिच्या पत्रात लिहिलं आहे, ते प्रारंभीच्या काळातही तो लिहू शकला असता हे निःसंशय. १८४७ मध्ये संभाषणाच्या ओघात, डाव्या विचारसरणीच्या रशियनांना नुकत्याच परिचित झालेल्या हेगेलियन युक्तिवादाच्या आधारे, बेलिन्स्कीनं ख्रिस्तावर हल्ला चढवला होता, त्याच्याविषयी तो तुच्छतेनं बोलला होता. या काळात, डोस्टोएवस्कीच्या लेखी, ख्रिस्त हा एक देव-माणूस होता. बंधुभाव आणि आत्मिक समानता या ख्रिस्ताच्या संदेशाकडे, सामाजिक परिवर्तनाची एक तत्त्वप्रणाली म्हणून मुख्यत्वेकरून तो पाहात होता. परंतु ख्रिस्ताचा आदर्श आणि संदेश यांना कारावासाच्या काळात त्याच्या लेखी नवा अर्थ प्राप्त झाला होता. तो मृत्यूला सामोरा गेला होता त्या क्षणी ख्रिस्तावरील श्रद्धेनं त्याला आधार दिला होता. तुरुंगातील आणि तुरुंगाबाहेरील त्याचे देशबांधव आणि तो यांच्यामध्ये एकात्मता घडवून आणण्यामध्ये या श्रद्धेचा सिंहाचा वाटा होता. 'या शतकाचा पुत्र' म्हणून डोस्टोएवस्कीचे जे काही संदेह होते – आणि ते त्याला बेलिन्स्कीशी ओळख होण्याआधीपासून होते – त्यावर मानवी प्रवृत्तीच्या मानसिक-भावनिक गरजांविषयी त्याला नव्यानं झालेल्या आकलनानं मात केली होती. असले संदेह त्याची श्रद्धा कधीच डळमळवू शकणार नव्हते, कारण मृतांच्या निवासस्थानातील प्रत्येक गोष्टींनी, अनुभवांनी त्यांच्या विरोधात कौल दिलेला होता आणि घोषित केलं होतं की अटीतटीच्या प्रसंगी मानवी अस्तित्व टिकवून ठेवण्याच्या कामी तर्ककठोर विचारशक्ती दुबळी ठरते, लटकी पडते.

मृतांच्या निवासस्थानी ख्रिस्ताच्या दैदिप्यमान व्यक्तिमत्वानं डोस्टोएवस्कीच्या जीवनात पाऊल टाकलं आणि हळूहळू त्याला मध्यवर्ती स्थान प्राप्त झालं – अगदी कायमचं. दरोडेखोरांच्या कोंडाळयात त्याला ख्रिस्ताचा साक्षात्कार झाला, ख्रिस्तानं त्याला प्रकाशाचा मार्ग दाखवला आणि कारावासानंतरच्या त्याच्या साऱ्या साहित्यकृतींमधून त्याचा प्रकाश फाकला. या संदर्भात 'क्राईम अँड पनिशमेंट' मधील उपसंहार लक्षणीय आहे.

९ ऑक्टोबर १८५९ रोजी डोस्टोएवस्कीनं आपल्या भावाला लिहिलेल्या पत्रात 'हाऊस ऑफ द डेड' च्या बरोबरीनं आणखीन एका कादंबरीचा उल्लेख आढळतो : 'तुला आठवत नाही, मी 'कन्फेशन' संबंधी तुझ्याकडे बोललो होतो – जी कादंबरी माझी सर्व कामं पूर्ण केल्यानंतर मला लिहायचीय, म्हणालो होतो की अजूनही त्यासाठी काही दिवस घालवावे लागतील. आता उशीर न करता ती लिहिण्याचं मी नक्की ठरवलंय.... या कादंबरीत मी माझं सर्वस्व ओतणार आहे. माझी शिक्षा भोगत होतो तेव्हा मला ती सुचली. तेव्हा फळकुटाच्या अंथरुणावर पडून होतो. औदासिन्यानं आणि आत्मनाशाच्या विचारांनी मला घेरलं होतं त्या दुःसह क्षणी.... 'कन्फेशन' माझं नाव चिरस्थाई करील.'

रास्कोल्निकोवच्या कबुलीजबाबामधून ('कन्फेशन') 'क्राईम अँड पनिशमेंट' आकाराला येत गेली. हा कबुलीजबाब डोस्टोएवस्कीच्या तुरुंगवासाच्या काळातील आत्मिक अनुभवांमधून स्फुरलेला होता. कारागृहात प्रथमच नैतिकतेच्या चौकटीबाहेर उभ्या असलेल्या आर्लोवसारख्या 'कणखर' व्यक्तीशी त्याची गाठभेट पडली होती. या ठिकाणीच 'त्याच्या मूल्यांच्या पुनर्मूल्यमापना'ला त्यानं प्रारंभ केला होता. औदासिन्यानं आणि आत्मनाशाच्या विचारांनी त्याला घेरलेलं होतं. या दुःसह क्षणी सैद्धांतिक–खुन्याच्या शोकात्म व्यक्तिरेखेचं बीज त्याच्या मनात पडले. पण हे 'गर्भारपण' पुढं सहा वर्षं चाललं.

'क्राईम अँड पनिशमेंट' च्या उपसंहारात वर्णन केलेली तुरुंगामधील परिस्थिती ओम्स्कच्या तुरुंगामधील परिस्थितीहून भिन्न नाही. शिवाय रास्कोल्निकोवच्या आंतरिक जीवनात डोस्टोएवस्कीच्या स्वानुभवाचं प्रतिबिंब लख्खपणे पडलेलं आहे :

'अर्थात् तुरुंगात बऱ्याच गोष्टी त्यानं (रास्कोल्निकोवनं) पाहिलेल्या नव्हत्या आणि पाहायची त्याची इच्छाही नव्हती. नजर जमिनीवर खिळवून तो जगत होता. परंतु अखेरीस बऱ्याच गोष्टींनी त्याला अचंबित केलं आणि ज्या गोष्टींची तत्पूर्वी त्यानं कल्पनाही केली नव्हती अशा बऱ्याच गोष्टी, का कुणास ठाऊक, तो स्वतःहून निरीक्षण करू लागला. त्यातील सर्वात विस्मयकारक, त्याला वाटलं, तो आणि बाकीचे सगळे यांच्यामध्ये पसरलेली रुंद दरी. ते वेगळ्या जमातीतील वाटत होते आणि तो त्यांच्याकडे आणि ते त्याच्याकडे अविश्वासानं आणि शत्रुत्वानं पाहात होते. त्यांच्या एकाकीपणाची कारणं त्याला जाणवली, कळून आली. परंतु ही कारणं एवढ्या खोलवरची असतील हे तोवर त्यानं कधीच मान्य केलं नसतं. त्यांच्यामध्ये पोलीश तडीपार राजबंदी होते. ते बाकीच्या सगळ्यांकडे निर्बुद्ध, गावंढळ म्हणून पाहात असत; परंतु तो त्यांच्याकडे त्या नजरेनं पाहात नव्हता. त्यानं पाहिलं की ही अडाणी माणसं बऱ्याच बाबतीत पोल्सपेक्षाही शहाणी आहेत.... कुणालाही तो आवडत नव्हता, प्रत्येकजण त्याला टाळत होता; शेवटी ते त्याचा तिरस्कारही करू लागले होते – का, ते त्याला ठाऊक नव्हतं. जी माणसं त्याच्याहून कितीतरी पटीनं गुन्हेगार होती ती त्याच्या गुन्ह्यासाठी त्याचा तिरस्कार करत होती आणि त्याला हसत होती.'

'हाऊस ऑफ द डेड' मध्ये कैद्यांचा तिरस्कार पूर्णपणे सामाजिक स्तरावर विशद करण्यात आला आहे. शेतकरी 'जंटलमनां'चा तिरस्कार करतात. पण 'क्राईम आणि पनिशमेंट' मधील कारण अधिक खोलवरचं आहे.

'लेंटच्या दुसऱ्या आठवड्यात तुकडीबरोबर 'सॅक्रेमेंट' घेण्याची रास्कोल्निकोवची पाळी आली. तो चर्चमध्ये गेला आणि इतरांबरोबर त्यानं प्रार्थना केली. एक दिवस भांडण उद्‌भवलं, कसं ते त्यालाही कळलं नाही. चवताळून सर्वजण त्याच्यावर तुटून पडले.

"तू नास्तिक आहेस! परमेश्वरावर तुझा विश्वास नाही!" ते ओरडले, "तुला ठार मारायला पाहिजे."

परमेश्वरासंबंधी वा आपल्या श्रद्धांविषयी तो त्यांच्यापाशी कधीच बोलला नव्हता, तरीही नास्तिक म्हणून त्यांना त्याला जीवे मारायचं होतं.'

लोकांनी व्यक्त केलेला हा निवाडा कादंबरीची 'धार्मिक कल्पना' ध्वनित करतो. रास्कोल्निकोवच्या हृदयात उलथापालथ झाली होती. परमेश्वरावरची त्याची श्रद्धा उडालेली होती. डोस्टोएवस्कीच्या लेखी नास्तिकतेची परिणती अखेर नास्तिक स्वतःला देव समजू लागण्यात होते. 'जर परमेश्वर अस्तित्वात नाही तर मी स्वतः परमेश्वर आहे.' रास्कोल्निकोवनं परमेश्वरापासून स्वतःची सुटका करून घेण्यासाठी धडपड केली आणि त्याला त्यात यशही लाभलं. त्याचं स्वातंत्र्य शाश्वत असल्याचं सिद्ध झालं. पण हे केवळ मृगजळ होतं. त्यात त्याचा विनाश होता. कारण परमेश्वरापासूनची मुक्तता म्हणजे निखळ असुरीपणा. म्हणून ख्रिस्ताला शरण जाण्याव्यतिरिक्त अन्य स्वातंत्र्य नाही. जो कोणी ख्रिस्तावर श्रद्धा ठेवत नाही तो प्रारब्धाचा तावेदार बनतो.

मादाम फोन्विझिना हिला पाठवलेल्या पत्रात तद्वतच 'हाऊस ऑफ द डेड' मध्ये जे पूर्णपणे व्यक्त झालं नव्हतं त्याचा निःसंदेहपणे रास्कोल्निकोव उच्चार करतो.

## आधारभूत ग्रंथ :


SELECTED LETTERS OF DOSTOEVSKY
Ed. Joseph Frank

THE HOUSE OF THE DEAD
F. M. Dostoevsky

DOSTOEVSKY : THE YEARS OF ORDEDAL, 1850-1859
Joseph Frank

DOSTOEVSKY : HIS LIFE AND WORK
Konstantin Mochulsky

# नोंद वही

## प्रमोएद्या व मॅगसेसे पारितोषिक

इंडोनेशियन लेखक प्रमोएद्या यांना, आशिया खंडात वाङ्मयक्षेत्रात सर्वात प्रतिष्ठित असे जे पारितोषिक समजले जाते ते त्यांना नुकतेच मिळाले. मॅनिला या फिलिपाईन्स देशाच्या राजधानीत कचेरी असलेल्या, रामों मागसेसे फाऊंडेशनतर्फे दर वर्षी पाच वेगवेगळी पारितोषिके दिली जातात. सर्व जगात नोबेल पारितोषिकांना जी प्रतिष्ठा आहे तेवढीच प्रचंड प्रतिष्ठा आशिया खंडात या पारितोषिकांना आहे. या वर्षीचे वाङ्मय, पत्रकारिता आणि नवनिर्मिती करणाऱ्या संपर्क कला, या विभागाचे पारितोषिक जुलै १९९५ मध्ये प्रमोएद्या अनंत तोएर यांस देण्यात आले. प्रमोएद्या आज सत्तर वर्षांचे असून ते सध्या नजरकैदेत आहेत. हे पारितोषिक प्रमोएद्या यांना जाहीर झाल्यानंतर, त्याबद्दल निषेध व्यक्त झाला नसता, तरच नवल! गंमत अशी आहे की त्यांना १९६५ ते १९७९ या काळात तुरुंगात ठेवणाऱ्या व सध्या नजरकैत ठेवणाऱ्या इंडोनेशियन सरकारने हा निषेध नोंदविलेला नाही. उलट हा निषेध नोंदविणारात फारच नामवंत व्यक्ती आहेत. इंडोनेशियन पत्रकार मोचतर लुबिस (MOCHTAR LUBIS) हे त्यापैकी एक. यांना १९५८ साली हेच पारितोषिक मिळाले होते. इंडोनेशियन विद्वान एच. बी. जास्सीन (H. B. JASSIN) यांना हे पारितोषिक १९८७ साली मिळाले होते, तेही निषेध नोंदविणारात सामील आहेत. तपशीलच्या पहिल्या अंकात ज्यांचा परिचय करून देण्यात आला होता ते फिलिपिनो लेखक (F. SIONIL JOSE) एफ. सिओनिल जोसे त्यांनीही आपला निषेध नोंदविलेला आहे. जोसे यांना हे पारितोषिक १९८० सालीच मिळालेले आहे.

प्रमोएद्या यांनी लेक्रा या संघटनेत सक्रिय असताना जी कारवाई केली होती, त्याला अनुलक्षून या सर्वांनी त्यांच्यावर प्रखर हल्ला चढविलेला आहे. लेक्रा ही एक इंडोनेशियन कम्युनिस्ट पक्षाच्या नेतृत्वाखाली काम करणारी संघटना होती. १९६० च्या आसपास इंडोनेशियन कम्युनिस्ट पक्षाचा इंडोनेशियन सरकारवर फारच प्रभाव असल्याकारणाने, लेक्रा ही संघटना, साहित्यिक, कलावंत यांच्यावर दबाव आणण्यात यशस्वी ठरत असे. "प्रमोएद्या यांनी कम्युनिस्ट पक्षाला मंजूर नसलेली नवनिर्मिती दडपण्यासाठी नेतृत्व केले होते. ग्रंथावर व संगीताच्या ध्वनिमुद्रिकांवर बंदी घालण्यासाठी प्रोत्साहन दिले होते," अशा अर्थाचे निवेदन सव्वीस (२६) इंडोनेशियन लेखक आणि नाट्यक्षेत्रातील कलावंत या सर्वांनी मिळून केले आहे. या निवेदनात, प्रमोएद्या हे चारित्र्यहनन करणे आणि धाकदपटशा करणारांना पाठिंबा



अनुक्रमणिका

देणे, या कामात अग्रभागी होते असाही आरोप आहे. मॅगसेसे प्रतिष्ठानाने, या आरोपांना उत्तर देताना म्हटले, "हे सारे तीस वर्षापूर्वी घडलेले आहे." दोन्हीही बाजूंनी अतिरेक केला होता असेही ते प्रतिष्ठान सांगते. पुढे जाऊन असेही सांगण्यात आले आहे की "प्रमोएद्या यांना ज्या हालअपेष्टा व मानसिक त्रास सध्या भोगावा लागत आहे, ते लक्षात घेता, या हल्ल्यातली हवाच निघून जाते."

भारतीयांना या अशा प्रकारच्या युक्तिवादात नवीन असे काहीच नाही. श्री. अशोक शहाणे यांनी काही दिवसांपूर्वी आपणास असे सांगितले की मराठी संमेलनाध्यक्ष कविराज सुर्वे आणि इतर नामवंत लेखक मंडळी, आणीबाणीच्या काळात लेखकांचा गळाच दाबायला निघाली होती. त्यासाठी खबरे बनण्याची त्यांची तयारी होती. अशोक शहाण्यांनी पेश केलेली यादी चांगलीच मोठी करता येईल. आणीबाणीच्या पूर्वीच्या काळात जे नेहमी लेखकाच्या स्वातंत्र्याबद्दल व खास हक्काबद्दल तारस्वरात आरडाओरडा करीत ते एकतर आणीबाणीत 'खबरे' बनले अथवा अगदी चिडीचूप होते. कै. नानासाहेब गोऱ्यांनी या साऱ्या प्रकाराचे वर्णन करताना म्हटले होते "इंदिरा गांधींचा चाबूक हवेतच गरगर फिरत होता. कोणाच्याच पाठीवर पडला नव्हता, तो ही पांगापांग." आणीबाणीपूर्व काळातील घाशीराम कोतवालाचे समर्थक व त्यांचे आणीबाणीच्या काळातले वर्तन आठवले म्हणजे मग नानासाहेब गोऱ्यांचे उद्गार किती यथार्थ आहेत हे लक्षात येईल. गमतीची गोष्ट अशी की इंदिरा गांधीप्रणीत आणीबाणीचे अजूनही मठ्ठपणे समर्थन करणारे गृहस्थ आता एका वजनदार दैनिकाचे संपादक आहेत. अनेक लेखकांचा आणि अनेक निरपराध नागरिकांचा गळा घोटणाऱ्या, छळ करणाऱ्या, कत्तल करणाऱ्या स्टॅलिनचे गोडवे गाण्यासाठी या गृहस्थांनी अनेक वर्षे लेखणी झिजवली. संपादक झाल्याबरोबर, लोकशाही मूल्ये, स्वातंत्र्य इत्यादी मूल्यांचे आपणच राखणदार आहोत असा आव ते आणतात. कोण माणूस हुकूमशाही प्रवृत्ती प्रकट करीत आहे याबद्दल लोकांना इषारा देतात. सौ चूहे खाके बिल्ली चली हजको. प्रमोएद्या यांचे असेच वर्तन आहे, असे त्या सव्वीस इंडोनेशियन पत्रक काढणाऱ्यांचे सांगणे आहे. ज्या प्रमोएद्यांनी पूर्वी साहित्यिक आणि कलावंत यांच्यावर दडपशाही करण्यास प्रोत्साहन दिले, ते या दोन्ही क्षेत्रात 'मानवी स्वातंत्र्य' या मूल्याचा प्रसार करू लागले तर ते कोणास पटेल का? असा त्यांचा युक्तिवाद आहे. काही प्रमाणात तो बरोबरही आहे. मॅगसेसे प्रतिष्ठानाने दिलेले उत्तर हे मूळ प्रश्न टाळणारे आहे.

इंडोनेशियन 'मानवी हक्क' या चळवळीचे एक सक्रिय कार्यकर्ते अरिएफ बुडिमन (ARIEF BUDIMAN) हे स्वतः व्यवसायाने वकील आहेत. लेक्रा या संघटनेने केलेल्या दडपशाहीचा त्यांना 'चांगलाच प्रसाद' मिळालेला आहे. साहजिकच ते, प्रमोएद्या यांच्या १९६० सालातील कार्यपद्धतीच्या विरोधात आहेत. तसे असले तरीही प्रमोएद्या यांना हे पारितोषिक मिळाल्याचा त्यांना 'अभिमान व आनंद' आहे. हे देखील अगदी भारतीयांसारखेच आहे. आणीबाणीत देहदंड सोसलेले लोक, अशोक शहाण्यांनी ज्यांना खबऱ्या म्हटले त्या कवी सुर्वे यांच्या दारात ते संमेलनाध्यक्ष

झाल्याबद्दल हार घेऊन उभे होते. हे अशा प्रकारचे निषेध नोंदविल्यामुळे 'लोकशाही संस्कृतीच्या निर्मितीस' मदत होईल'' असे मला वाटत नाही असे बुडिमन म्हणतात. इंडोनेशियातील लुबिस व जास्सीन या दोघांनीही स्वतः पारितोषिक वितरणाच्या समारंभास जाऊन पारितोषिकाचा स्वीकार केला होता. प्रमोएद्या यांना ते नजरकैदेत असल्याकारणाने, अर्थात शक्य होणार नाही यावर एखादी छाया दातारी प्रकृतीची व्यक्ती 'आणखी एक सोल्झेनिसिन' असा लेख तयार करीलही. कोणी सांगावे.

भारतात, आणीबाणीच्या काळात, अस्तन्या सावरून जे लेखक इंदिरा गांधींचे समर्थक होते, त्यांचे जे झाले तेच प्रमोएद्या यांचे झाले. प्रमोएद्या यांना कल्पना नसावी की चीनच्या पाठोपाठ आशिया खंडात तरी प्रबळ समजला जाणारा इंडोनेशियन कम्युनिस्ट पक्ष, इतक्या झटपट निकालात निघेल. आपल्या भारतातही 'सोव्हियट युनियनने' या अशा प्रकारे आत्महत्या का करावी, लेनिनची रीत बरोबर पण उत्तर चुकले, लेनिन हुषार व चाणाक्ष पण त्याची घाई झाली असे सांगणारे अनेक नामवंत लोक आपण पाहातो. म्हणूनच प्रमोएद्या यांनी मनाशी मांडलेला हिशेब चुकीचा असला तरी तो आपणास समजेल.

हे सारे जरी खरे असले, तरी प्रमोएद्या हे एक महान इंडोनेशियन लेखक आहेत, याबद्दल कोणाचेच दुमत नाही. जॉर्ज स्टाईनर या महान समीक्षकाने सेलिनी या प्रख्यात फ्रेंच लेखकाबद्दल सांगताना म्हटले होते, त्यासारखेच हे आहे. 'चांगले साहित्य, चांगले विचार मनात असणाऱ्या, त्यांचा पुरस्कार करणाऱ्या लेखकाकडून निर्माण होते. पण या सर्वसाधारण नियमाला सेलिनी हा अपवाद होता. (त्याचे साहित्य चांगले असले तरी विचार चांगले होतेच असे म्हणता येत नाही.) प्रमोएद्या यांचे तसेच असावे.

*– नाना जोशी*

---

★ आंदोलनांचा मान राखा, शाळांपासून पळ काढा.

★ प्रगतीशिल विज्ञान आणि स्फूर्ती-विज्ञान (Intuitive Science) यात गल्लत करू नका. स्फूर्ती-विज्ञान हेच आपल्या कामाचे.

★ तुम्ही जेव्हा पिटले जात असता, तेव्हा अन्य कोणी बना.

★ लोक अल ब्राउनला म्हणत 'तू काही मुष्टीयोद्धा नाहीस'. यावर तो हसे पण सामना जिंकत असे.

★ तुमच्याबद्दल जो चुकीचा मजकूर छापून येईल त्याचे अवडंबर माजवू नका. तो चुकीचा मजकूर हेच तुमचे संरक्षण आहे.

*– जॉं. कोकटो*
*प्रख्यात फ्रेंच लेखक*

---



अनुक्रमणिका



फ्रांझ काफ्का
(१८८३-१९२४)

जागतिक वाङ्मयात स्वतःचे घराणे निर्माण करणारा
जर्मन कथा-कादंबरीकार.

विसाव्या शतकातील
या महान साहित्यिकाचा परिचय करून देणारा
मराठीमधील पहिला ग्रंथ

# थोडाबहुत काफ्का

शकु नी. कनयाळकर

१८८३-१९१८ या कालखंडातील काफ्काचा जीवनवृत्तांत
'द ट्रायल' या कादंबरीचा संक्षिप्त अनुवाद.

चरित्रपट, वाङ्मयसूची इ. आर्टपेपरवरील ५२ छायाचित्रे
एकूण पृष्ठे २६० + ४ + १६

मूळ किंमत रु. २००
'तपशील' च्या वर्गणीदारांना
सवलतीची किंमत रु. १२०

त्वरित संपर्क साधा
**नाना जोशी**
४ अ, सोमणनगर, क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग, मुंबई ४०००१२

अनुक्रमणिका

